# मुस्लीम मानसीकतेचे अध्ययन

लेखक

हस्सान हतहूत





प्रस्तावना - अहमद जकी यमनी

अमेरिकन ट्रस्ट पब्लिकेशंस, यूएसए

# आभार

शदरील पुस्तकासंबंधी मी सर्वप्रथम आपल्या पालनकर्ता अल्लाहच्या प्रती कृतज्ञता व्यक्त करतो. अतिशय व्यस्त आणि आजारपणात सुद्‌धा व दृढ निश्चय करुनही कदाचित हे कार्य पूर्ण झाले नसते. कुरआनाने म्हटले की,

‘‘जी बाब तुम्हांस पसंत नसण्याची शक्यता असेल, अल्लाह त्यात बरेच चांगले समाविष्ट ङ्केवतो.‘‘ (४-१९) मुहम्मद पैगंबर यांनी म्हटले,

‘‘जो लोकांचे आभार मानत नाही, तो अल्लाहचे सुद्‌धा आभार मानत नाही. म्हणून मी सर्वप्रथम संबल, प्रोत्साहन आणि सहयोगाबद्‌दल आपली धर्मपत्नी ‘सैलोना‘ यांचे आभार मानतो. ५३ वर्षापूर्वी आमचे लग्न झाले आणि तेव्हांपासून ही परंपरा चालु असल्याचे मोङ्के नवल वाटते.

मी आपले भाऊ आणि मित्रांचा सुद्‌धा आभारी आहे. कारण उपयुक्त व्याख्यानांपेक्षा लिखित शब्द दिर्घकालीन असतात हे वास्तव माझ्यासमोर ङ्केवून लिहिण्याची त्यांनी मला प्रेरणा दिली.

अभिन्न आणि आत्मीय मैत्रिण श्रीमती कैरोल डी मार्स यांचेही विशेष आभार मानतो. कारण त्यांनी मोङ्क्या कष्टाने माझ्या कामाची समीक्षा करुन अमोल सल्ले दिले.

आपल्या प्रकाश्काचेही सदैव आभार मानतो. कारण त्यांनी माझे काम सेपे सरळ व सहज केले.

शेवटी माझी सहयोगी कु.हेदब अलतारीफी हिच्या प्रती कृतज्ञता व्यक्त करणे अनिवार्य आहे. तिने पांडुलिपीच्या टंकलेखनावेळी होत असलेल्या सतत फेरबदल होत असताना अतिशय तन्मयतेने काम केले. अल्लाह यां सर्वांनाच त्यांच्या सत्कार्याचे फळ देवो.

- हस्सान हतहूत

# अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

- शेख अहमद जकी यमनी

जगातील इतर सर्वच धर्मांच्या तुलनेत इस्लाम थोडा वेगळाच दिसतो. त्याचे कारण असे की, या धर्माचे नांव कोणत्याही जातीवर किंवा एखाद्या व्यक्ती विशेषावर आधारीत नाही. उदाहरणार्थ ज्यूडीज्म हा ज्यूडिया, ख्रीश्चन हा क्राईस्ट आणि बुद्धीज्म हा गौतम बुद्धच्या नावावर आधारीत आहे. मात्र इस्लाम हे नांव मुहम्मद यांच्या नांवावर आधारीत नाही, हे इस्लामचे वैशिष्ट्य आहे. काही ओरिएंटॅलिस्टांनी इस्लामला 'मुहम्मडंस' असे नाव देण्याचा निष्फळ प्रयत्न केला. मात्र मुस्लिमांनी त्यांचे प्रयत्न निष्प्रभ केले.

इस्लाम या शब्दाची व्युत्पत्ती दोन शब्दांनी झालेली आहे, अर्थात 'तस्लीम' (समर्पण) आणि 'सलाम' (शांती) या दोन शब्दांत 'इस्लाम' चा सार समावलेला आहे. मानव आणि सृष्टीकर्त्यातील अर्थात अल्लाह आणि मानवादरम्यान संबंधांची ही परिपूर्ण व्याख्या होय.

अल्लाह आणि मानवांदरम्यानचे हे संबंध त्या परिपूर्ण संबंधांवर आधारीत आहे, जे या समस्त जगाच्या निर्माता व स्वामी आणि सजीव सृष्टी व प्राणीमात्रांच्या दरम्यान आहेत. 'इस्लाम' या शब्दाचा अर्थच पूर्णपणे समर्पण असा होतो. हा परिपूर्ण अर्थ इस्लामचे पैगंबर मुहम्मद यांच्या द्वे आणलेल्या संदेशापुरताच मयाादित नसून मुहम्मद पैगंबरांपूर्वी आलेल्या अनेक पैगंबरांचा कुरआनात उल्लख आहे, त्यांनी सुद्धा इस्लामचाच संदेश दिला.

मुहम्मद पैगंबरांपूर्वी इब्राहीम पैगंबर आणि इतर पैगंबरांचा धर्म सुद्धा इस्लाम हाच आहे. या संबंधी कुरआनात म्हटले आहे की, ''तुमचे पिता इब्राहीम यांचा धर्म तुमच्यासाङ्गी पसंत करण्यात आला आहे. त्याने (अल्लाहने) यापूर्वी तुमचे नाव मुस्लिम (अज्ञाधारक) असे ङ्केवले होते, ते या उद्देशाने की रसूल (प्रेषित) तुमचा साक्षीदार असावा आणि तुम्ही लोकांवर साक्षीदार असावे.''

(२२-७८)

दुसरीकडे मानवांदरम्यानचे संबंध इस्लामच्या शांती या अर्थाने नियंत्रित होत असतात. यात सहनशीलता आणि कृपा समाविष्ट आहे. मुस्लिम या शब्दाचा अर्थ सांगताना मुहम्मद पैगंबरांनी म्हटले की, ज्याच्या वाणी आणि सामर्थ्याने इतर सर्वच सुरक्षित असतात, त्याला मुस्लिम असे म्हणतात. मुहम्मद पैगंबरांनी सहनशीलता आणि सहनशील माणसाची खूप प्रशंसा केली. सहनशील व संयमी लोकांवर अल्लाहची कृपा असते आणि खरेदी-विक्री करणाऱ्यांतही सहनशीलता दाखविणाऱ्यांवर अल्लाहची कृपा आहे, असे ते म्हणाले.

मुहम्मद पैगंबरांनी युद्धाचे नियम व कायदे सुद्धा दाखविले आणि लष्करासाङ्गी ते महत्वाचे संविधान आहे. मुस्लिमेतरांविरुद्ध उङ्गसुङ्ग लढण्याचा नियमच नाही. जोपर्यंत जीवावर संकट येत नाही, तो पर्यंत कोणतेही प्रावधान नाही. अगदी आत्मसंरक्षणासाङ्गीच मुस्लिमेतरांविरुद्ध लढण्याचे आणि सुद्धा केवळ शत्रुंविरुद्धच लढण्याचे आदेश इस्लामने दिले आहेत. कुरआनाने म्हटले आहे की, अन्याय पीडीतांची हाक अल्लाहने ऐकली आणि निश्चितच अल्लाहमध्ये त्या पामरांचे सहकार्य करण्याचे सामर्थ्य आहे (२२-३९).

सामान्यतः मुस्लिम आणि मुस्लिमेतरांदरम्यानचे संबंध विशेषतः ग्रंथ धारकांशी असलेले संबंध हे बहुआयामी आहेत. हे संबंध परिचर्चेचा विषय नसून यांची ओळख होणे आवश्यक आहे. या प्रसंगी एवढेच की, सहनशीलता व शांती या दोन सिद्धांतांवर हे संबंध नियंत्रित करण्यात येतात. कुरआन आणि हदीस (मुहम्मद पैगंबरांची वचने) मध्ये सुद्धा असेच मार्गदर्शन करण्यात आलेले आहे. या बहुमुल्य मार्गदर्शनाविरुद्ध इतिहासातील ज्या घटना आढळतात, त्यांचा संबंध इस्लामशी नाहीच मुळी.

मानवी इतिहासात अनेक संस्कृतींचे दर्शन घडते. उदाहरणार्थ चीनी, फिरऔनी (फॅरोनिक), ग्रीक, पर्शियन, रोमन वगैरे या संस्कृतीचे अस्तित्व सुद्धा इस्लामी संस्कृतीचे साक्षिदार आहे. इस्लामपूर्वीच्या संस्कृतीत काहींना काही वैशिष्ट्य असे होते, ज्यामुळे ती इतरांपेक्षा वेगळी वाटत असते. उदाहरणार्थ रोमन संस्कृती स्थापत्य कलेमुळे ओळखली जाते, ग्रीक संस्कृती विशेष दर्शनासाङ्गी प्रसिद्ध आहे तर इस्लामी संस्कृतीमध्ये चिकित्सा, विज्ञान, रसायणशास्त्र, गणित आणि भूमितीसह दर्शन शास्त्र आणि स्थापत्य कलेतही प्रसिद्ध आहेच.

शिवाय इतिहासातील सर्वच मुस्लिमेतर संस्कृतीचा आदर इस्लामने सत्याच्या चिकित्सक आधारांवर केला आहे. आपण असे म्हणू शकतो की मुहम्मद पैगंबरांवर सातव्या शतकात ईश्वरीय संदेश अवतरित झाला. मात्र इस्लामी संस्कृतीच्या तुलनेत इतर संस्कृतीची प्रगती होण्यासाठी अनेक शतकांचा अवधी लागला.

सातव्या शतकात मक्कावासी अरबांच्या कल्पनेत आणि स्वप्नातही नसलेली 'ज्ञान' नावाची संस्कृती उदयास आली. या अरबांना अज्ञानाच्या घोर अंधारातून ज्ञानाच्या व विज्ञानाच्या प्रकाशाकडे आणणारी संस्कृती म्हणजे केवळ मुहम्मद पैगंबरांचा संदेशच होता. याच संदेशाने एक प्रखर प्रकाशमान समाजाची निर्मिती केली. याच ईश्वरी संदेशाच्या आधारावर मुहम्मद पैगंबरांनी अज्ञानी अरबांना त्या काळातील प्रत्येक शोध व संशोधनाचा मार्गदीप दिला, सोबतच इतिहासाची एक नविन व्याख्या सुद्धा प्रदान केली.

कुरआन आणि प्रेषित प्रणालीच्या माध्यमाने जुने सर्व नियम वा प्रथा पार बदलून टाकण्याऐवजी इस्लामने त्यात आवश्यक सुधारीत बदल करुन त्यांना नविनरित्या इस्लामी स्वरुपात साचेबद्ध केले.

**ज्या प्रथा इस्लामच्या पूर्णतः** विरुद्ध होत्या, त्यांना चलनबाह्य करण्यात आले. सोबत माणुसकी आणि सत्यास अनुसरुन असलेल्या प्रथा व परंपरा इस्लामशी पूरक व समरुप झाल्या.

संस्कृती नावाचा हा इस्लामचा पैलू इस्लामी विधी नुसार अपरिवर्तनीय नसला तरी प्रत्येक काळात इस्लामी विद्वानांतर्फे या विषयावर मंथन होत गेले. यासाठी पारिवारिक नियमांची एक दोन उदाहरणे देता येतील.

इस्लामपूर्व अरब समाजात पुरुषांना बहुविवाह पत्नींना घटस्फोट देण्याचा एकतर्फी अधिकार प्राप्त होता. एक पुरुष अनेक महिलांशी लग्न करीत असे. शिवाय यांपैकी कोणालाही घटस्फोट वा फारकत देत असे. यावर कोणत्याही प्रकारचे नियंत्रण नसे. मुहम्मद पैगंबरांच्या जीवनाच्या पूर्वाधात हेच सर्व चालत होते. मात्र इस्लामने एकापेक्षा अधिक पत्नी ठेवण्याच्या प्रथेवर अंकुष लावला आणि बहुपत्नीत्वाची प्रथा नियमबाह्य ठरविली. शिवाय पत्नींशी न्यायपूर्ण व्यवहार करणे अनिवार्य ठरविले.

एवढे असून सुद्धा बहूपत्नीत्वाच्या इच्छुकांसाठी इतर नियम सुद्धा कडक

करण्यात आले. उदाहरणार्थ अनाथ मुलांच्या मातांबरोबर लग्न करण्याचे नियम कडक करण्यात आले. यासंबंधी कुरआनाने चेतावणी देत म्हटले की, जे पुरुष अनाथ मुलांची संपत्ती पाहून त्यांच्या मातांशी लग्न करण्याची इच्छा बाळगतात, जे पुरुष अनाथांची संपत्ती अन्यायी मार्गाने खातात, ते आपल्या पोटाची खळगी नरकाग्नीने भरतात. ते निश्चितच अत्यंत भयानक, आगीत पडतील (४-१०).

ज्यांच्या व्यवहारासाङ्गी जैविकशास्त्र पूर्णतः सक्षम स्वरुपात दिशादर्शक नाही, त्या आधारावर आपण मात्र सुपर बायॉलॉजिकल प्राणी आहोत. अत्यंत सहजरितीने व स्वाभाविकपणे व्यक्त करता येणाऱ्या ज्ञान व वासना आपल्यांत आहेत. मात्र आपण मनुष्य ही प्रक्रिया अतिशय जटिल रुपाने प्रस्तुत करतो आणि हे आपल्या प्रजनन प्रक्रियेपासून भिन्न आहे. आपले जैविकशास्त्र हे पशुंच्या जैविक शास्त्रांशी खूप मिळते जुळते आहे. मात्र पशुंच्या कक्षेत मोडण्यासाङ्गी केवळ जैविकशास्त्र पुरेसे नसते हे सुद्‌धा तेवढेच सत्य होय.

इतर प्राण्यांच्या तुलनेत आपण खूप जास्त विकसित आहोत. आपण आदर्श, सिद्‌धांत आणि अध्यात्म सारख्यांबाबी आपल्यात विकसित केल्या. म्हणून या शरीररुपी कंटेनर मध्ये वास करीत असलेले आपण अध्यात्मिक प्राणी आहोत, असे म्हणणे चुकीचे ङ्करणार नाही. जी माणसे केवळ स्वेच्छांपूर्तीस्तव किंवा स्वार्थासाङ्गी जगण्यातच स्वतःला बंदिस्त ङ्केवतात, त्यांच्यात आत्मिकता नसते आणि ते पशुसमान असतात.

मानवांचा अभ्यास करताना असे आढळून आले की, ईश्वराने आपणांत चार महत्वपूर्ण वैशिष्ट्ये ङ्केवली आहेत, पहिले ज्ञान, दुसरे चांगल्या व वाईट बाबींत फरक करणे, निवड स्वातंत्र्य आणि उत्तरदायित्व.

**ज्ञान :-** आपल्याला ज्ञानार्जन आवडते आणि जास्तित जास्त ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करतो. निरिक्षण, कल्पना, तर्कबुद्‌धी, विश्लेषण, प्रयोग आणि परिणाम वगैरेची अफाट क्षमता आपल्यांत आहे. भूतकाळाबरोबरच भविष्य माहित करुन घेण्याची सुद्‌धा आपल्याला खूप तीव्र इच्छा असते तसेच आपल्या सभोवतालच्या प्राकृतिक निरिक्षणातही आपण मग्न असतो. याबरोबरच या बाबींचा आढावा घेऊन ते ज्ञान सुरक्षित ङ्केवून ते व्यक्त करीत राहतो.

**भल्या-बुऱ्याची ओळख** :- सत्याविषयी आकर्षण आणि असत्याविषयी

अनाकर्षणाची आपण आशा करतो. मानवीय जीवनाचा गुंता, मनमस्तिष्काची विचारोत्तेजना आणि सर्वच बाबी तर्कबुद्धीच्या कसोटीवर पारखताना सैतानाद्वारे दुविधा व अडचणी निर्माण करणे हे वास्तविकतेचे चित्र आणखीनच अस्पष्ट करुन टाकते. ही परिस्थिती असूनही भल्या-बुऱ्याची ओळख प्राचीन काळापासूनच आपल्या जीवनाचा अभिन्न भाग आहे.

**निवडस्वातंत्र्य :-** ईश्वराने मानवप्रजातीस जे स्वातंत्र्य प्रदान केलेले आहे, त्यातूनच आपल्याला निवडस्वातंत्र्य मिळालेले आहे. निश्चितच हे स्वातंत्र्य परिपूर्ण नसले तरी अथवा हे स्वातंत्र्य मर्यादित असले तरी हे मानवी जीवनासाङ्गी सर्वात महत्वपूर्ण पैलु होय.

**उत्तरदायित्व**:- निवडस्वातंत्र्य हे मानवाच्या उत्तरदायित्वावर आधारीत आहे. आपल्या कर्माप्रती आपण उत्तरदायी असून ते निवडण्याची जवाबदारी आपलीच आहे, याची जाणिव आपल्याला सदैव असते. एखाद्या नास्तिक व्यवस्थेत सुद्धा सिग्नल तोडण्याचा दंड भरावा लागतो. मात्र धार्मिक बाबतीत वेगळा प्रकार आहे. आपल्याला स्वातंत्र्य नसेल तर धार्मिकरित्या आपली कोणतीही जवाबदारी नसते आणि पारलौकिक जीवनात याचा जाब सुद्धा द्यावा लागणार नाही.

धार्मिक व धर्मनिरपेक्ष दृष्टीकोणाने पाहिल्यास स्वातंत्र्य मानवाचा मूलभूत अधिकार आहे. आपल्या कर्माप्रती जवाबदार आणि प्रतिनिधी लक्षण स्वतंत्र असलेली ही मानवप्रजाती ईश्वराने निर्माण केलेली आहे. आपल्या मर्यादा, निवडस्वातंत्र्य आणि क्षमतेपेक्षा जास्त कर्म हे आपल्या आवाक्याबाहेर असल्याने ते भाग्यांवर आधारीत आहेत. यांमुळे मानव यांविषयी मात्र उत्तरदायी नसणार.

अर्थातच सातत्याने आत्मसंवाद करणे आणि भल्या बुऱ्यांसंबंधी निर्णय घेत जीवन जगणारी प्रजाती म्हणजे मानव. बऱ्याचवेळा भावनेच्या भरात आपण सत्य आणि असत्याची ओळख करु शकत नाही आणि दुष्कर्मात लिप्त होत असतो. याचे दुष्परिणाम भोगावे लागतात. मात्र या आंतरिक द्वंद्वं पासून प्राणी मुक्त आहेत. त्यांना आवडेल तेच ते करतात. शिवाय प्राचीन ग्रंथांत फरिश्ते केवळ सत्कर्मच करतात, दुष्कर्म करण्याची त्यांच्यात क्षमताच नसते, असे सुचविण्यात आलेले आहे.

मानवतेवर प्राणी एका निश्चित कार्यक्रमानुसार कार्य करतात, आपण मात्र

आपल्या आवडी-निवडीनुसार कार्य-कर्म करीत असतो. हा मानवतेचा दुर्लभ आहे. याची पुष्टी प्राचीन ग्रंथांतून सुद्‌धा होते. अल्लाहने आदम यास सजदा करण्याचा फरिश्त्यांना आदेश दिला आणि पापमुक्त असून सुद्‌धा फरिश्त्यांनी आदेशाचे पालन केले.

आता आपण विषयांतर करुन या ब्रह्मांडाविषयी चर्चा करुया. ब्रह्मांडाविषयी आपण वैज्ञानिक रुपाने जेवढी जास्त चर्चा करु तेवढे जास्त आपल्याला असे आढळून येईल की, हे अत्यंत संतुलित असलेले ब्रह्मांड असून ते समिकरणांवर आधारीत आहे. अगदी थोडा नव्हे, किंचितसाही संतुलनाचा फरक पूर्ण ब्रह्मांड नष्ट करु शकतो.

मानवसमाजाकडे पाहिल्यास असे आढळून येते की लोक किती मोठ्‌मोठ्‌या दुष्कर्मात लिप्त आहेत आणि अपराधी जीवन जगत आहेत, अशा ब्रह्मांडात आपण राहतो. असेच जीवन जगण्यात त्यांना आनंद मिळतो, असे वाटते. अशातच ते शेवटी मरण पत्करतात. यांव्यतिरिक्त कांहीजण सत्य आणि न्यायासाठ्ठी संघर्ष करतात, आपल्या आदर्शावर चालतात, सत्यासाठ्ठी बलीदान देतात. जगण्याचे दोन्ही प्रकार आहेत, मात्र दोन्ही प्रकारच्या जगण्याचा अंतिम परिणाम केवळ मृत्यूच आहे काय? आपला अंतरात्मा हे स्वीकारु शकत नाही.

अशा परिस्थितीत माणसाच्या उत्त्तरदायित्वाचा प्रश्न उभा राहतो. जीवनाचा अंत जर मृत्यूच असेल तर मानवाचं हे जीवन निरर्थकच होय. त्यास आपल्या भल्या-बुऱ्या कर्मांचा जाब कोणालाही द्यायची गरज नाही. मात्र खऱ्या अर्थानं जर विचार केला तर मृत्यूनंतर एक जीवन निश्चितच आहे. जीवनाचे संतुलन स्थापन करण्यासाठ्ठी प्रलयाचा दिवस निश्चित करण्यात आलेला असून या दिवशी भल्या-बुऱ्या कर्मांचा जाब द्यावा लागणार आहे आणि कर्माची उचित फळे मिळणार आहे, असे प्राचीन ग्रंथांत नमूद आहे.

अल्लाहने आपल्याला कर्म स्वातंय देऊन आपल्याला उत्त्तरदायित्वाबरोबर बांधलेलं आहे. आपण परिपूर्ण होऊ शकत नाही आणि तशी अपेक्षा देखिल नाही. अडचणी आणि सांसारिक आकर्षणाशी संघर्ष करीत असताना आपल्या सामर्थ्यानुसार उत्तमोत्तम कर्म करीत राहावं, एवढीच अपेक्षा होय. बऱ्याच प्रसंगी आपण सत्यानुसार कर्म करण्यासाठ्ठी सक्षम नसतो. आपलं जीवन सतत संघर्षमय असणं हेच याच कारण होय.

अशा परिस्थितीत हीच बाब तर्कसंगत वाटते की, अल्लाह आपल्या सर्व मानवांच्या सतत संघर्षाचा प्रशंसक असून तो आापल्यावर प्रेम करतो. मानवाला अल्लाहनं मानवाला कर्म-स्वातंत्र्य देऊन सुद्धा मानव हा उत्तरदायित्वाच्या परीक्षेत उत्तीर्ण होतो, याचा त्यास खूप अभिमान आणि आनंद होतो. यासाङ्गी अल्लाहला अंतिम न्यायकर्ता आणि शासकाच्या रुपात आपण सदैव ध्यानी ङ्खेवावयास पाहिजे, एवढचं. आपल्यासाङ्गी भलं काय आणि वाईट काय, हे त्यानं अगोदरच निश्चित करुन ङ्खेवलं. प्रलयाचा अर्थात अंतिम निवाड्याा दिवस निश्चित येणार आहे, हे सदैव ध्यानी ङ्खेवणं अत्यावश्यक होय.

याविषयी उत्तम मार्गदर्शनासाङ्गी मानवांतूनच निवडक मानवांची निवड करण्यात आली. या निवडक मानवांशी अल्लाहनं आपल्या स्वतःच्या पद्धतीनं (सरळ संवाद, लिखित वर्णण आणि फरिश्त्याच्या माध्यमानं) संपर्क करुन मानवसमूहापर्यंत दैवी संदेश पोचविण्याचं कार्य केलं. केवळ अल्लाहचीच पूजा करावी आणि सदैव सत्कर्म करीत राहावं. शैतानी कर्मांपासून दूर असावं. प्रलयाचा अर्थात अंतिम निवाड्याचा दिवस निश्चितच येईल. यादिवशी त्याच्या समोर उपस्थित होऊन आपल्या भल्या बुऱ्या कर्मांचा जाब द्यावा लागणार. हाच संदेश देणे पैगंबरांच्या वा प्रेषितांच्या आगमन-शृंखलेचा एकमेव उद्देश होय.

आजपर्यंतच्या इतिहासात अनेक पैगंबर (अर्थात संदेश वाहक) आले. यांपैकी काही महत्वाच्या पैगंबरांची नावे दैवी ग्रंथांत आहेत. काहींना मार्गदर्शक ग्रंथ प्रदान करण्यात आले आणि काही पैगंबरांना चमत्कार देण्यात आले. यांपैकी ज्यू, इस्लाम आणि ख्रिस्ती धर्मांत इब्राहीम पैगंबरांच्या वंशात तीन महत्वपूर्ण पैगंबरांचा उल्लेख आढळतो.

मुहम्मद (स) पैगंबर हे इब्राहीम (अ) पैगंबरांचे पुत्र इस्माईल (अ) पैगंबरांच्या वंशात असून मूसा (अ) पैगंबर आणि ईसा (अ) पैगंबर हे इब्राहीम (अ) यांचेच दुसरे पुत्र इसहाक (अ) पैगंबरांच्या वंशात जन्मलेले आहेत.

ज्यू धर्मीयांच्या मान्यतेनुसार ज्यू धर्म हाच अंतिम धर्म असून पैगंबरांचे आगमन बंद झााले आहे. म्हणून ईसा (अ) पैगंबर त्यांच्या दृष्टीत मसीहा वा पैगंबर नसून मेरी (अ) सुद्धा पवित्र नारी नाही. अजूनही ज्यू धर्मीय मसीहाची अर्थात मानवतेच्या उद्धारकर्त्याची प्रतिक्षा करीत आहेत. शिवाय ख्रीस्ती धर्म हा दैवी धर्म असल्याचे ते नाकारतात.

अगदी याच प्रमाणे ख्रीस्ती धर्मीयांच्या मान्यतेनुसार पैगंबरांच्या आगमनाच्या शृंखलेत ईसा (अ) हे अंतिम पैगंबर असून आता ही शृंखलाच बंद झालेली आहे. शिवाय ज्यू धर्म हा दैवीधर्म असल्याचे देखिल ते मान्य करतात. आणखीन महत्वाची बाब म्हणजे मुसलमान हे ज्यू आणि ख्रीश्चन हे दोन्ही धर्म दैवीधर्म असल्याचे मान्य करतात, आणि ज्यू व ख्रीस्ती धर्मीय हे इस्लाम धर्मास दैवी धर्म असण्याची मान्यता नाकारत असून सुद्धा इस्लाम मात्र ज्यू व ख्रीस्ती धर्म हे दैवी धर्म असण्याची मान्यता देतो.

मुसलमान हे इस्लाम धर्माच्या अनिवार्य मान्यतेनुसार ज्यू व ख्रीस्ती धर्माच्या तसेच त्यांच्या पूर्वीच्या दैवी धर्मास, त्यां धर्माच्या पैगंबरांस व त्यांच्या धर्म ग्रंथास मान्यता देतात व पूर्णपणे आदर बाळगतात. ही मान्यता प्रत्यक्ष कुरआनाच्या शिकवर्णींतच अनिवार्य ठरविण्यात आलेली आहे व यावर विश्वास ठेवणे प्रत्येक मुसलमानासाठी अनिवार्य आहे.

कुरआनात यासंबंधी स्पष्ट आदेश आहे की, ''त्याने (अल्लाहने) तुमच्यासाठी (मुसलमानांसाठी) तोच धर्म निर्धारीत केला जो त्याने नूद (अ) पैगंबर यांच्यावर अवतरीत केला होता. आणि तो जीवंत आदेश जो आम्ही (अल्लाहने) तुमच्यावर प्रकाश्ति केला आहे आणि जो इब्राहीम (अ) पैगंबर आणि मूसा (अ) व ईसा (अ) या पैगंबरांवर आदेश प्रकाशित केला होता, तो असा की, ''धर्म स्थापित करा आणि त्याविषयी मतभेद करु नका''. (संदर्भ : ४२, १३)

पुढे जाण्यापूर्वी आपल्या सोयीसाठी आपण कुरआनावर संक्षिप्तपणे चर्चा करुया. मुसलमानांची अशी पक्की धारणा व विश्वास अगर श्रद्धापूर्ण मान्यता आहे की आकाशीय ग्रंथ कुरआनाचा एक्न एक शब्द हा स्वयं अल्लाहने मुहम्मद (स) पैगंबर यांच्यावर सर्वश्रेष्ठ फरिश्ता जिब्रील (अ) यांच्या माध्यमाने अवतरीत केला. विभिन्न विषय, मुद्दे आणि घटनांवर छोट-छोट्या भागांत पूर्ण २३ वर्षांच्या कालावधीत कुरआन अवतरित झाले.

कुरआन अवतरित झाल्यावर मुहम्मद (स) पैगंबरांनी अल्लाहच्या आदेशानुसार यास क्रमबद्ध व लिपीबद्ध केले. तेव्हांपासून कुरआन आपल्या अरेबी या मूळ भाषेत जशास तसा सुरक्षित आहे. आकाशीय ग्रंथाच्या स्वरुपात कुरआन अत्यंत अद्भूत व आश्चर्यकारक ग्रंथ आहे. कुरआनाच्या अनुवादित आवृत्तीस कुरआन असे म्हणता येत नसून त्यास सार अथवा टिपणी असे म्हणतात. कारण यात मानवीय प्रयत्नांचा घटक सामिल असतो आणि अल्लाहचे मूळ

शब्द नसतात.

कुरआन अरबी भाषेत असून त्यास अतिशय उत्कृष्ट साहित्यिक रचना असल्याची जागतिक मान्यता प्राप्त आहे. मुहम्मद पैगंबर (स) यांच्या काळातच अरबांना कुरआनाने जाहिर आव्हान दिले होते की कुरआनासारखे काहीतरी तयार करुन दाखवावेच. मात्र आपल्या भाषाशास्त्राच्या ज्ञानाचा अभिमान बाळगणारे आणि साहित्यिक सामर्थ्यावर गर्व करणारे अरब लोक हे आव्हान पेलु शकले नाही आणि कुरआनाच्या अरबी भाषा व रचनांचा ते आदर करु लागले. एवढेच नव्हे तर इस्लामचे काही कट्ट विरोधक कुरआनाचा काही भाग ऐकूनच मुस्लिम झाले.

आज सुद्धा ईश्वरीय कल्पना पाहिजे तेवढी लोकप्रिय नाही. अध्ययन आणि चिंतन-मनन करणारे अमेरिका आणि यूरोपचे माझे अनेक वैज्ञानिक मित्र पूर्वी कम्यनिस्ट नसलेले नसून सुद्धा नास्तिक होते, हे पाहून मला खूपच आश्चर्य वाटते.

कधी काळी नास्तिक होण्याचे मी खूप प्रयत्न केले. दुसऱ्या महायुद्धांतरच्या काळात मी वॉग येथील आपल्या स्वदेशी विद्यापीठ्ठाच्या विद्यार्थ्यांसोबत होतो. मात्र पराकोटीचे प्रयत्न करुन सुद्धा ईश्वराशिवाय या सृष्टीची कल्पना करणे शक्य झाले नाही.

अशातच एके दिवशी एक अडचण आपोआपच नाहीशी झाली. त्या सायंकाळी मी एका शब्दाचा अर्थ पाहण्यासाठ्ठी शब्दकोष उघडला आणि नेमक्या त्याच क्षणी माझ्या डोक्यात एक विचार डोकावला. शमजा कोणी म्हटले की, या शब्दकोषातील व्यवस्थित जमविलेले शब्द हे एखाद्या छापखान्यात घडलेल्या स्फोटाचा परिणाम आहे. या स्फोटातून सगळे शब्द चमकत बाहेर पडले आणि मग आपोआपच व्यवस्थितपणे जमले. मात्र निश्चितच माझ्या मनमस्तिष्कास हे पटणारे नव्हते, पटलेही नाही.

तेव्हा विचार आला की, जर तो परम रचनाकार असेल तर त्याच्यापेक्ष्चा कोणीही महान असु शकत नाही. तरी सुद्धा तो कोणापेक्षा तरी कमी आहेच. त्यास मर्यादा असून असीम व अनंत होण्यात त्याला प्रतिस्पर्धी आहे. तेव्हा तो परम रचनाकार असण्यास समर्थ नाही. कारण परम रचनाकार हा प्रत्येक क्षेत्रात विशेष सामर्थ्य बाळगतो. म्हणूनच त्यास अनंत व असीम सुद्धा म्हटले

जाते.

गणित शास्त्रात तर अनंत हे वैज्ञानिक सत्य असून त्यासाङ्गी एक विशेष चिन्ह आहे. निश्चितच आपण अनंतास पूर्णतः समजु शकत नाही. तरी सुद्धा आपण हे स्वीकारु शकतो की, एखादी दिव्यशक्ती या सृष्टीची निर्माती आहे. कारण आपण सर्वच नश्वर असून आपल्याला मर्यादा आहेत. अशा मर्यादित क्षमता व सामर्थ्यामुळे आपल्याला अनंत समजणे शक्य नाही. मात्र अल्लाहला सर्व काही ज्ञात आहे. त्याच्या निर्मिती आणि त्यातील छुपे संकेत पाहून आपण त्यास समजू शकतो.

गणितीय नियमानुसार सुद्धा अनंतास तीन किंवा चार भागात विभाजित करणे शक्य नाही. म्हणून अल्लाह अथवा ईश्वर एकापेक्षा अधिक होऊ शकत नाही. अर्थात एक अल्लाह ज्यूंचा, एक ख्रीश्चनांचा, एक मुस्लिमांचा असा वेगवेगळा अल्लाह मान्यता करता येत नाही, वगैरे, सारांश असा की, समस्त मानवांचा अल्लाह एकच होय. हाच एकेश्वरवाद इस्लामी आस्थेचा एकमेव आधार आहे आणि हीच मुस्लिमांची आस्था आहे.

आपण अल्लाह साङ्गी सर्वनाम 'तो' वापरतो. मात्र अरबी, उर्दू वा पार्शियन भाषेत यासाङ्गी सर्वनाम 'वह' वापरण्यात येते. यावरुन अल्लाह स्त्री लिंगी आहे की, पुल्लिंगी आहे, हे निश्चित होत नाही. अशा सर्व प्रकारच्या भेदातून अल्लाह मुक्त आहे. मात्र गॉड, ईश्वर सारख्यां शब्दांना वा त्यांच्या सर्वनामांना याप्रकारच्या भेदांतून मुक्ती नाही. ही बाब निश्चितच उल्लेखनिय आहे की, त्या असीम व अनंत सृष्टीकर्त्यास इंग्रजी सहित इतर अनेक भाषांत एका शब्दात व्यक्त करणे शक्य नाही. आणि म्हणूनच इंगजी भाषेत या सृष्टीकर्त्यास व्यक्त करण्यासाङ्गी मानवनिर्मित देवांपासून मुक्त करण्याकरीता 'गॉड' या शब्दाचे 'जी' कॅपिटल म्हणजे मोङ्गे लिहिणे आवश्यक होत असते.

मानवनिर्मित देवतांसाङ्गी 'जी' स्मॉल लिहिण्यात येते. इतर भाषांत त्या सर्व शक्तीमान निर्मात्यासाङ्गी विशेष शब्दांचा वापर करण्यात येतो. अरबी भाषेत मात्र त्यास 'अल्लाह' असे म्हटले गेले. त्याच प्रमाणे इंग्रजीत 'गॉड', फ्रेंच मध्ये 'दियु', हिब्रू मध्ये एदोनाई' असे शब्द वापरण्यात येतात. यात' संभ्रम निर्माण होता कामा नये. व्याख्यानांप्रसंगी बऱ्याच वेळा श्रोत्यांनी मला 'जर तुम्ही 'गॉड' ची पुजा करता तर मग 'अल्लाह' कोण आहे', असा प्रश्न विचारतात.

ही बाब एवढी सरळ सोपी नसते, याचा अनेकदा अनुभव आला. कारण काही सुशिक्षित व विवेकशील लोकांना वाटते की, मुसलमान गॉडची पूजा करीत नाही. त्यांचा 'गॉड' वेगळा आहे. ज्याला ते अल्लाह या नावाने संबोधतात.

मुल्यांकन करुन या दोहोतील घातक ऋटया दाख्वावून दिल्या तसेच हे सुद्धा सिद्ध केले की या दोन्ही व्यवस्था सपशेल अपयशी असून इस्लामची व्यवस्थाच मानवतेला तारु शकते.

साम्यवादाचे अपयश म्हणजे भांडवलशाहीचे प्रबलीकरण असे समिकरण करता येते. या दोन्ही भौतिकवादी व्यवस्था त्रुटीपूर्ण आहेत. या दोघांच्या अपयशाचे प्रमुख कारण असे की, त्या विशिष्ट समुदायांसाङ्गीच मर्यादित असून भौतिकवादी आहेत. या दोन्ही विचारसरणी परस्पर भिन्न असून देखिल व्यक्ती आणि समाज परस्पर संघर्ष करीत असल्याचे या दोन्ही व्यवस्थांच्या दृष्टीत चुकीचे असल्याचे मान्य करण्यात येते. साम्यवादाने समाजासाङ्गी व्यक्तिचा बळी दिला. मुळात एकेक व्यक्ती जोडून तयार झालेले एकक म्हणजेच शेवटी समाज होय. मात्र व्यक्तीच संपली तर संपूर्ण समाजच ध्वस्त झाला.

दुसरीकडे भांडवलशाही व्यक्तीस समाजाच्या आदरर्शापासून विभक्त ङ्केवते. परिणामी लोक स्वार्थी होतात, झाले आणि जेव्हा या भांडवलशाहीने संपूर्ण मानवतेला आपल्या सुंदर बहूपाशात आवळले तेव्हा हिचे अनेक उग्र स्वरुप प्रकट होत गेले. उदाहरणार्थ वर्ग वर्चस्ववाद, कारपोरेटवाद, राष्ट्रवाद, वर्णवाद, जातीवाद, श्रेष्ङ्खत्ववाद, प्रादेशिक वाद, गुलामी आणि साम्राज्यवाद वगैरे भांडवल हे अमर्याद वाढत जावे आणि स्थानिक बाजार कमी पडल्यास तिसऱ्या जगातील बाजारांचा शोध घेतला, जावा, ही भांडवलशाहीची प्रमुख विचारसरणी वा तत्व होय.

भौतिकवादाचे प्रतिनिधित्व करणारी शक्ती म्हणजेच डॉलरच्या स्वरुपातील संपत्ती प्राप्त करण्याचा पिसाळपना हा मुळात मुलभूत गरजां पूर्ण करण्यासाङ्गी नसून स्वैराचार आणि विलासीत जीवन जगण्यासाङ्गी आहे. यासाङ्गी स्त्रोतांचे दहन करुन ते नष्ट करण्यात येतात. यात तिसऱ्या जगातील संसाधनांचे शोषण करण्याची मानसिकता असून विपुल प्रमाणात नैसर्गिक संपदेबरोबरच स्वस्त मजूर सुद्धा उपलब्ध असतात. तिसया जगातून अधिकाधिक कच्चा माल स्वस्तात प्राप्त करुन यापासून तयार झालेले उत्पादन त्यांनाच अत्यंत महाग दराने विकण्याचा प्रयत्न करण्यात येतो. यासाङ्गी अत्यंत योजनाबद्ध

पद्धतीने अशी नीती तयार करण्यात येते की, त्यांना त्यांच्या स्वतःच्या कच्च्या मालापासून स्वतः निर्माण वा उत्पादन करणे शक्य होऊ नये. शिवाय पहिल्या जगातील या भांडवलदारांच्याच उत्पादनांवर निर्भर होण्यास बाध्य करण्यात येते. या शृंखला चक्रामध्ये अथवा चक्रव्यूहात कायमचे बंदिस्त ठेवण्याकरीता आणि त्यांची क्रयशक्ती नष्ट होऊ नये म्हणून त्यांना व्याजावर कर्जाच्या स्वरुपात नविन भांडवल देण्यात येते. दुःख या गोष्टीचे आहे की कर्ज स्वरुपातील हे भांडवल नावापुरतेच गरीबांच्या वाट्याला येते. यावर स्थानिक धनाढ्यांचा वर्ग आणि शासक वर्ग या सनदी अधिकाऱ्यांचा वर्गच डल्ला मारतो. सर्व स्त्रोत यांच मूठभर लोकांच्या ताब्यात असतात, एवढेच नव्हे तर यांवर यांचेच अधिपत्य असते. उग्र स्वरुप धारण करणारे भ्रष्टाचार आणि यासम बाबींविरुद्ध सर्वसामान्यांत जाणिव निर्माण होऊ नये आणि अन्यायाविरुद्ध 'ब्र' काढणे सुद्धा पाप ठरावे अशी व्यवस्था व नियोजन यशस्वीरित्या राबविण्यात येते. शिवाय दोन प्रकारचे विरोधाभास यांत स्पष्ट होतात. प्रथम असे की मध्यपूर्वेतील बऱ्यांच देशांत जेवढा पेसा ओतला जातो, तेवढेच ते कर्जबाजारी होतात. शिवाय जगातील मोठ्या लोकशाही शक्ती या एकाधिकारशहाच्या समर्थनात एकजूट होतात. तेथील लोकशाही वातावरण त्या एकाधिकार शहांच्या समर्थनात निर्माण करण्यात येते. अशां परिस्थितीत स्वायत्ततेसंबंधी सुरु असलेले प्रयत्न हानुन पाडण्यासाठी शक्य तेवढे प्रयत्न करण्यात येतात. वेळप्रसंगी लष्कराचा वापर सुद्धा करण्यात येतो.

पाश्चिमात्य राष्ट्रे जेव्हा दखल देतात, तेव्हा याचा स्पष्ट उद्देश बाह्य भांडवलातील शोषण क्षमता अबाधित ठेवणे आणि तिसऱ्या जगातील लोकांना जास्त कर्ज देऊन त्यांच्यातील कर्ज फेडण्याची क्षमता नष्ट करुपन वेठीस धरणे, एवढाच असतो. याविषयी होणारी आंदोलने बलपूर्वक चिरडण्यात येतात. पाश्चात्य देश अशा प्रकारे आंदोलने चिरडण्याची कृती न्यायपूर्ण ठरवितात. आंदोलनकारी स्वतःचे नुकसान करुन घेत असल्याचा जोरजोरात गवगवा करण्यात येतो. आजपर्यंत अशा आंदोलकांना साम्यवादी असण्याचे नाव देऊन केवळ नाकारण्यात येत असे, मात्र साम्यवादाच्या संपुष्टात आल्यानंतर अशा आंदोलनांना इस्लामी मूलतत्ववादी असे नांव देण्यात आले.

यासंबंधी अतिव्यापक प्रसारमाध्यमे ही मोठ्या भांडवलदारांच्या हाती असून त्यांचा उपयोग जनभावनां प्रभावित करण्यासाठी करण्यात येत असतो. आजपर्यंत पाश्चिमात्य जनता हे प्रलोभन कोणतीही शंका न बाळगता घशाखाली

सोडत आणि यापुढे जाऊन आपल्या दिशाधोरण ङ्करविणाऱ्यांचे समर्थन करीत होती. मात्र ही बाब अजूनही त्यांच्या लक्षात येण्यास बराच उशीर होत आहे की, या भांडवलशाहीच्या क्रूर ध्येयधोरणामुळे केवळ तिसऱ्या जगातील लोकांनाच नव्हे तर त्यांना स्वतःला देखिल प्रचंड नुकसानाची झळ पोचत आहे, नव्हे अक्षरशः होरपळून निघत आहे. भांडवल अधिक वाढवित ङ्केवणे आणि डॉलर आणखीन वाढवित ङ्केवणे एवढाच एकमात्र या भांडवलशाहीचा उद्‌देश होय. यामुळे अमेरिकेत सुद्‌धा बेरोजगारीचे प्रमाण वाढतच आहे. कारण स्वस्तात मिळणारे मजूर ज्या ङ्गिकाणी असतील तेथे कारखाने स्थलांतरीत करण्यात आले आहे. यामुळे त्यांचे उत्पन्नाचे दर कमी होऊन नफयाचे प्रमाण प्रचंड वाढत आहे. स्वतः अमेरिकेमध्येही या स्वस्त दरात तयार झालेला माल वा उत्पादन महागड्या दरांत विकण्यात येत आहे. शिवाय बेरोजगारांना तर हा माल घेण्याची ऐपत नसल्याने शोषणाने ऊग्र स्वरुप धारण केलेले आहे.

अशा प्रकारची बेलगाम आणि स्वैर भांडवलशाही कधीपर्यंत शोषण करीत राहणार, हे सांगता येत नाही. परिणामी एखाद्या दिवशी विध्वंसाचा विनाषकारी स्फोट होणे मात्र निश्‍चित. ही शक्यता आज तरी नजरेआड करण्यात येत आहे. सोन्याची अंडी देणारी कोंबडी म्हणजेच तिसरे जगत सुद्‌धा आटत चालले आहे. याचे भयानक परिणाम संपूर्ण जगालाच भोगावे लागत आहे.

यासाङ्गी केवळ वातावरण निर्मिती पुरेशी नसून ह्‌दय परिवर्तनाची नितांत गरज आहे. जोपर्यंत भौतिक वादाचा प्रभाव असेल तोपर्यंत साधारण उपचाराने काहीही होणार नाही. वेळ निघून जात आहे आणि उत्त्तर विरुद्‌ध दक्षिण, शोषक विरुद्‌ध शोषित, श्रीमंत विरुद्‌ध गरीब, धवल वर्णीय विरुद्‌ध कृष्णवर्णीय आणि मालक विरुद्‌ध नोकर असा संघर्ष पेटलेलाच असणार. अशा पेटत्या परिस्थितीत आणि हा संघर्ष संपेपर्यंत भविष्यातही कोणत्याही पकारची आशा बाळगता येत नाही. शेवटी संपणार सगळेच. या विनाषकारी वादळात गरीब-रीमंत, लहान-मोङ्गा सर्वच संपून जातील.

म्हणे जागतिक स्तरावर राजनितिज्ञ आणि भांडवलदार स्वतःच्या भांडवलशाही धोरणांत अमूलाग्र बदल घडविण्यासाङ्गी आवश्यक दूरदृष्टी आणि विचार शक्ती बाळगतात. मात्र यात मुळीच तथ्य नसून यांची अंधळी लालसा आणि अहंकार मानवतेस भस्म करुनच दम घेईल.

अशा परिस्थितीत इस्लामची भूमिका अत्यंत महत्वपूर्ण आहे. सर्व प्रथम

हा विचार मनातून काढून टाकावयास हवा की माध्यमांनी प्रत्येक इस्लामी विचारवंतावर चढविलेला आतंकवादाचा मुखोटा खरा आहे. इस्लामी विद्वान गेल्या अनेक दशकांपासून वर्तमान समस्यांवर समाधान काढण्याचा विचार करीत आहेत. हे समाधान केवळ मुस्लिमांसाङ्गीच नसून इस्लामी तत्वांनुसार सर्वच मानवजातीसाङ्गी आहे. याची प्रमुख तत्वे खाली देण्यात येताहेत.

**मानवांवरील अधिकार :**

मनुष्य हा स्वतः प्रधान नसून तो एका सर्वशक्तीमान व सर्वव्यापी अल्लाहसमोर उत्तरदायी आहे. त्यास शेवटी आपल्या प्रत्येक कर्माचा जाब द्यावा लागणार आहे. दोस्तोवस्की याने म्हटले आहे की, जर अल्लाह समोर जाब देण्याची जाणिव नष्ट झाली तर प्रत्येक अनैतिक नैतिक होऊन बसेल. माणसास अल्लाहचा विसर पडल्यास तो स्वतःचीच उपासना करीत असतो. खरे पाहता मानव हा अल्लाहचा प्रतिनिधी असून त्याच्या आदेशाचे पालन करणे हा माणसातील स्वभावगुणधर्म आहे. याच आदेशानुसार या जगाचे नेतृत्व करावे आणि वागावे. आपल्या स्वैर इच्छांना जागा देऊ नये. विज्ञान अद्यापही अर्धवट असून अपरिपक्व आहे. यामुळे मानव आपली मनमानी करु शकत नाही.

**वस्तुंचे स्वामित्व :**

जगाचा निर्माता केवळ अल्लाह असून तोच समस्त सृष्टीचा मालक व स्वामी होय. आपली संपत्ती नैतिक आणि वैध स्वरुपात मिळविण्याची व बाळगण्याची आपणास मुभा असली तरी हे विसरता कामा नये की, यासाङ्गी देखील आपण जवाबदार आहोत. संपत्तीत वाढ होण्याबरोबरच ती समाजासाङ्गी खर्च होणे गरजेचे आहे व यासाङ्गी आपण उत्तरदायी आहोत. साम्यवाद आणि भांडवलवाद या दोन्हींच्या विचारसरणीनुसार व्यक्ती व समाजादरम्यान संघर्ष आहे. मात्र इस्लाम हे मान्य करीत नाही. येथे दोघांतील साम्य आणि न्याया दरम्यान संतुलन आहे. हे संतुलन बळाचा वापर करुन स्थापन करण्यात येत नसून अल्लाहची प्रसन्नता मिळविण्याच्या आंतरिक आस्थेने व प्रेरणेने वंशीभूत होऊन करण्यात येते. अल्लाहचे अस्तित्व अविनाशी असून भौतिकवादी दृष्टीकोनानुसार ही बाबच अर्थहिन आहे.

भांडवलदार आणि साम्यवादाच्या ‘माणुस वा व्यक्ती आणि समाजात संघर्ष आहे’ या संयुक्त विचाराला इस्लाममध्ये मुळीच थारा नाही. यांत दोघांत

संतुलन कायम राखून समान रुपाने न्यायपूर्ण भूमिका घेण्यांत आली आहे. हे संतुलन कायद्याचा बडगा उगारुन नव्हे, तर अल्लाहच्या प्रसन्नतेखातर कायम करण्यात येतो आणि यामुळे आंतरिक समाधान प्राप्त होते.

इस्लामची धार्मिक आस्था अशी आहे की, श्रीमंतांच्या संपत्तीत गोरगरीबांचा सुद्धा पूर्ण अधिकार आहे. कारण माणुस श्रीमंत असो की गरीब असो, प्रत्येकजण परावलंबी व परस्पर निर्भरच असतो. समाज बांधणीचा हाच प्रमुख दुवा आहे. मात्र वास्तविक मुल्यरहित, आदर्शविहिन शिकवणी व माध्यमलहरींनी प्रभावित.

द्विीय खलीफा उमर यांनी घोषणापत्र काढले होते की, जर एखादी व्यक्ती जर उपासमारीला बळी पडून मृत्यूमुखी पडली तर त्या वसतीतून बळजबरी टॅक्स वसूल करण्यात येईल आणि असे गृहित धरण्यात येईल की, त्यास त्या वसतीतील सर्वांनी मिळून ङ्कार मारले. मुहम्मद पैगंबरांनी म्हटले की, संपूर्ण समाज एका शरीराप्रमाणे असून एखाद्या अवयवास क्षती पोचली तर पूर्ण शरीर तापाने फणफणते. प्रत्येकास जगण्याचा समान अधिकार असून किमान स्वतःचे भरण-पोषण सहजरित्या होण्यापुरती साधने प्राप्त होणे आवश्यक आहे. भिक्षा मागणे हे अतिशय वाईट असून रोजगार प्राप्ती हा प्रत्येकाचा अधिकार असल्याचे इस्लामने म्हटले आहे. श्रम वाचविणारे तंत्र निश्चितच फायदेशीर असून यामुळे मजूरांच्या श्रमाची बचत सुद्धा होते. मात्र मजूर बेकार होण्यासारखी परिस्थिती निर्माण होण्याइतपत तंत्राचा वापर करता कामा नये. यासंबंधी सार्वजनिक कल्याणाची भूमिका घेणे अनिवार्य ङ्करविण्यात आले आहे. मजूरांची आर्थिक शक्ती एवढी प्रबळ व्हावी की कंपनीचे शेयर्स वा अंश खरेदी करणे त्याच्यासाङ्गी शक्य व्हावे आणि यामुळे भांडवलाचे ध्रुवीकरण होता कामा नये.

इस्लामचे द्विीय तत्व असे की प्रत्यक्ष पैशाने पैसा निर्माण न होता पैसा वृद्धीसाङ्गी तो उद्योगात निवेश करण्यात यावा. म्हणूनच व्याजाचा व्यवहार इस्लामने सक्तीने निषिद्ध ङ्करविले आहे. यावर बरेच प्रयत्न सुरु असून यूरोप आणि अमेरिकेसारख्या देशांत व्याजमुक्त बॅका यशस्वीपणे चालविण्यात येत आहेत.

**शमता, स्वातंत्र्य आणि बंधुत्व :**

जगाच्या पाठीवरील सर्वच मानव एकाच माता-पित्याची (हव्वा आणि आदम) ची संतती असून ते परस्पर समान आहेत. अगदी लहानपणापासूनच हे तथ्य मुलांना शिकविण्यात यावे आणि यातून सर्वजण जन्मतःच समान असण्याची जाणिव निर्माण करावी. दुर्दैवाची बाब अशी की, अमेरिकेमध्ये श्वेतवर्णीयांनी श्वेतवर्णीय श्रेष्ठ असल्याचे पुरावे तयार केले आहेत. हे पुरावे आणि प्रमाण आजच्या आधुनिक काळात निंदनीय आणि मानवाधिकार विरोधी असले तरी शिवाय यास कोणताही वैज्ञानिक वा तार्किक पुरावा नसला तरी गौरवर्णीय वा गोरे लोक यावरच आडून बसलेले आहेत. या प्रमाण व पुराव्यांना ते वारसा अधिकाराचा मुलामा देऊन त्यास धार्मिक किनार सुद्धा देण्यात आलेली आहे. ईसा पैगंबरांचे चित्र दाखवून ते गोरे होते व त्यांचे डोळे निळे होते, असा तर्क मांडून ते वर्णश्रेष्ठत्वाचे जोरजोरात नगारे बडवित आहेत. या उलट पॅलेस्टाइनी नागरीक हे गव्हाळ वर्णीय असल्याने श्वेतवर्णीयांपेक्षा कनिष्ठ असल्याची भूमिका मांडण्यात येत आहे.

यूरोपात वर्ण व वंशवाद असून त्या विरोधात हवे तेवढे प्रयत्न होताना दिसत नाहीत. अमेरिकेत पूर्णपणे गुलाम संपलेली नाही. यामुळे प्रत्येक नागरीकास समान अधिकार प्राप्त नाहीत.

अमेरिकेत एखाद्या गोऱ्याने कोण्या कृष्णवर्णीयाची माफी मागितलेली नाही. वर्णभेदामुळे गौरवर्णीयांची प्रचंड बदनामी होत असूनही ते जुमानत नाहीत. यामुळे प्रचंड तनाव निर्माण होत असून परिणामी लॉस एंजेल्स मध्ये दंगली उसळल्या. ज्या ज्या वेळी अमेरिकेत कृष्णवर्णीयांच्या समर्थनात एखादे आंदोलन उभे राहते, त्या त्या प्रसंगी पाहिजे तसे समर्थन न मिळाल्याने त्यास यश मिळत नाही गोळीबार आणि डॉलरची सुबत्ता हा काही उपाय नसून वैचारिक परिवर्तनाशिवाय ते शक्य नाही.

प्रभावी परिवर्तनासाठी नव उप-निवेशवादी राष्ट्रांना पुनर्शिक्षित करुन तिसऱ्या जगाच्या विकासाशी सांगड घालणे आवश्यक आहे. तिसऱ्या जगातील उपासमारी संपविण्यासाठी आवश्यक असलेल्या राशीपेक्षा कितीतरी जास्त पटीने अमेरिकेत शेतकऱ्यांना अनुदान देण्यात येते. मात्र याकडे हेतुपुरस्सर दुर्लक्ष करण्यात येते.

**आत्म निग्रहाची गरज :**

जागतिक स्तरावर माणसातील आत्मनिग्रहाची प्रवृत्ती तीव्र गतीने कमी होत आहे. माणुस आणि पशुमध्ये मोङ्ग्याप्रमाणात फरक असून सुद्धा माणसाची मानसिक परिस्थिती अतिशय गंभीररित्या खालावली आहे. एकदा एका तरुणाने कार मधील लोकांना गोळया झाडून ङ्गार केले. त्याला अटक केल्यावर याचे कारण विचारले असता 'कोणास तरी ङ्गार करावे असेच वाटत होते', अशां शब्दांत त्याने उत्तर दिले. यासंबंधीचे हे काही एकच उदाहरण नाही. अशी बरीच उदाहरणे आहेत. अर्थात तेथील लोक विध्वंसक प्रवृत्त्वेकउे वळत आहेत. ङ्गोस मानवीय मुल्यांच्या अभावास्वरुपी समाजात विध्वंस माजलेला आहे.

शिक्षण आणि माध्यमांच्या सहकार्याने ही परिस्थिती बदलणे शक्य आहे. यासाङ्गी अल्लाहसमोर जाब देण्याची जाणिव असणे नितांत आवश्यक आहे. यातूनच हिंसा, रक्तपात, मारामाऱ्या, अश्लिलता वगैरे बाबींना उत्तेजन देणाऱ्या माध्यमांवर देखील याची जवाबदारी असून व्यभिचार आणि दृष्कृत्यांप्रती चीड निर्माण करणे आवश्यक होय.

दुर्देवाने काही देश आपल्या तरुण नागरीकांत अश्लिलतेचे आकर्षण निर्माण करुन सभ्यता आणि सुशीलतेचा बळी देत आहेत.

## युद्ध आणि शांती :

इस्लामने युद्धाचे नियम अतिशय स्पष्टपणे दाखविण्यात आले आहेत. स्वतः मुहम्मद पैगंबरांनी या नियमांचे प्रत्यक्ष दर्शन घडविले आहे. या नियमांनुसार आत्मरक्षणात्मक युद्ध असो की अन्यायाचे दमन करणारे युद्ध असो, यांत निष्पाप वा शत्रुपक्षांत सामिल नसलेल्यांना तसेच पर्यावरणाला कोणत्याही प्रकारची क्षती पोचत नाही. अत्याचारांवर आळा घालण्याचा आदेश कुरआनात देण्यात आलेला आहे की, ''जर तुमच्या आपसांत (ईमानधारकांत) दोन गटांत बिनसले असल्यास दोघां दरम्यान तडजोड घडवून आणावी. यानंतर जर एखादा गट वरचढपणा करीत वा अतिरेक करीत असेल तर त्याच्याशी तो न्यायाकडे वळे पर्यंत युद्ध करा आणि तडजोड करा. त्यांच्या दरम्यान न्यायकरा. निश्चितच अल्लाह न्याय करणाऱ्यास पसंत करतो.'' (कुरआन ४९, ०९)

बिंगरमुस्लिमांबरोबर सद्भाना आवश्यक असते, जशी मुहम्मद पैगंबरांनी

मदीनेच्या ज्यूं बरोबर सलोखा निर्माण केला होता. निश्चितच बाहेरील शक्तींविरुद्ध सर्वांनीच एकजूट होणे आवश्यक आहे. इस्लामपूर्वीच्या एका तडजोडीचे उदाहरण सुद्धा आहेच. मुहम्मद पैगंबरांनी तेथील काही कबिल्यांशी करार केला होता की आम्ही शोषितांच्या व उत्पीडीतांच्या सोबत राहणार मुहम्मद पैगंबरांनी असे म्हटले होते की, नंतर देखील अशी परिस्थिती उद्भव्यास आम्ही शोषितांबरोबरच उभे राहणार त्यांनी लष्करास आदेश दिले होते की, केवळ लष्करी जवानांशीच युद्ध करावे. महिलां, मुले आणि वृद्धना थोडा जरी त्रास झाला तर याची शिक्षा देण्यात येईल. जे बिगर मुस्लिम त्यांच्या मङ्ग, विहार वा धार्मिक स्थळात पूजापाङ्ग करीत असतील त्यांना देखिल त्रास देण्यात येणार नाही. वृक्ष आणि पिकांना जाळण्यात वा क्षती पोचविण्यात येणार नाही. वैध अन्न मिळविण्याच्या हेतुशिवाय कोणत्याही प्राण्यास साधी इजाही पोचविली जाणार नाही. या तत्वांची समीक्षा करताना सद्याच्या युद्धया परिस्थितीवर रक्ताचे आश्रु गाळावे लागतात. तीसाव्या दशकातील स्पेनच्या गृहयुद्धात आणि नंतरच्या दुसऱ्या महायुद्धात तसेच कोरिया, विएतनाम आणि नागासाकी व हिरोशिमा संबंधी विचार केला तर शत्रुंपक्षांपेक्षा जास्त निष्पापांना प्राण गमवावे लागले व पर्यावरणाचे प्रचंड नुकसान झाले.

काही जणांना वाटते की इस्लामी आदर्श म्हणजे केवळ कल्पनाविलास असून यास प्रत्यक्षात लागु करणे शक्य नाही. मात्र मुस्लिम जगत काही वेगळाच विचार करीत आहे. कारण युद्ध अत्यंत विनाशकारी झालेले असून युद्धाचा विचारच आता नष्ट व्हावयास हवा. ज्या प्रमाणे गुलामी प्रथेचे उन्मूलन करण्यात आले, नरबळी आणि सतीची प्रथा बंद करण्यात आली, त्याच प्रमाणे युद्धाविषयीचा मुद्दा देखिल इतिहासजमा व्हावा. नविन जागतिक व्यवस्थेची घोषणा सैनिकांच्या मोङ्ग्या प्रामाणातील संपाच्या काळात झाली.

आज एकेविसाव्या शतकात मानव अतिशय प्रगत झाला असून नविन जागतिक व्यवस्थेत युद्धाला मुळीच स्थान नसावे आणि शांती स्थापनेसाङ्गी इतर अनेक प्रकारच्या उपाययोजना येतील हे काही स्वप्न नसून निश्चितच शक्य आहे.

स्वतंत्र न्यायालयांमार्फत आंतरराष्ट्रीय स्तरांवरील सुरु असलेले वाद विवाद सोडविता येण्याची शक्यताही तपासून पाहता येईल. हे ही तेवढेच खरे आहे की युद्धाध्ये चांगले आणि वाईट सर्वच बरोबर समजले जाते. आपले

विध्वंसक शक्तीच्या प्रदर्शनाशिवाय दुसरे काहीही नसते.

शरीयतचे (इस्लामी विधीचे) नियम मानवाची अशी उत्तम प्रकारे सेवा बजावतात की जगातील इतर कोणतेही विधान वा नियम त्यांना पर्याय सिद्ध होऊ शकत नाहीत. मात्र दुर्दैव असे की यांच नियमांचा आधार घेऊन अगर यांतील कडक नियमांना समोर ङ्केवून इस्लाम हा किती क्रूर शिक्षा देतो, हे काही मुस्लिमांच्या प्रवृत्तींचा संदर्भ देऊन सिद्ध करण्याचा आटापीटा सुरु आहे. इस्लामला लागलेल्या या ग्रहणाचे विक्षिप्त परिणाम झाले आणि इस्लामविषयी नको ते गैरसमज निर्माण झाले, करण्यातही आले. शिवाय मुस्लिमांना कोण्या दुसऱ्याच ग्रहावरील परके जीव समजण्यात येत आहे. इस्लाम मानवीय सन्मान व त्याच्या संरक्षणाची भूमिका बजावतो. चोराचे हात कापणे, बलात्काऱ्यास दगडाने ङ्केचून ङ्कार मारणे वगैरे सारख्यां शिक्षांचा गदारोळ माजवून इस्लामच्या या व्यतिरिक्त असलेल्या भूमिकां लपवून विकृतीकरणाची जोदार प्रक्रिया सुरु आहे. या शिक्षा क्रूर नसून कङ्गोर आहेत आणि अपराध्यांत न्यायाचा धाक निर्माण करण्यासाङ्गी आहेत. मात्र या कङ्गोर शिक्षां देण्यापूर्वी एक लांबलचक आणि क्लिष्ट प्रक्रिया पूर्ण करावी लागते. या प्रकरणी आरोपीस अपराधी वा गुन्हेगार सिद्ध करण्यासाङ्गी साक्षीपुरावे जमाकरणे एवढे अवघड होऊन बसते की, अपराध्यास शिक्षा देणे जवळपास दुरापास्त व अशक्य होऊन बसते.

मोङ्ग्या आश्चर्याची बाब अशी की वस्तुतः इस्लामी समाज हा दयाळू आणि सौहार्दपूर्ण आहे, असे मानण्यात येते. उच्च आदर्श असलेली संस्कृती निर्माण करण्यासाङ्गी इस्लामने काही नियम तयार केले आहेत. या नियमांनुसार निर्मित उच्च संस्कृत समाजाचा आवश्यक घटक 'मानव'ङ्करविण्यात आला आहे. करीता या उच्च प्रमाणावर आणि कसोटीवर उतरणारा माणुस व त्यातील माणुसकी निर्माण होणे हेच त्याचा निर्मीता अल्लाहला अभिप्रेत आहे आणि याच प्रवृत्तीवर माणुस निर्माण करण्यात आला व इस्लामच्या माध्यमाने ही माणुसकी निर्माण करण्यात इस्लाम यशस्वी ङ्करला आहे.

या जगात विविध प्रकारची आकर्षणे मुस्लिमांना अल्लाहपासून दूर करण्याचा प्रयत्न करीत असतात. अशा वातावरणात कोणत्याही मुस्लिम व्यक्तीकडून अवास्तव अपेक्षा ङ्केवणे वास्तवास धरुन ङ्करणार नाही. इस्लामचे पूर्णपणे पालन करणाऱ्या काही तुरळक लोकांपैकी डॉ.हस्सान हतहूत हे होय. म्हणून मानसिकतेचे अध्ययन या त्यांच्या पुस्तकाचा परिचय लिहिण्याचे

निमंत्रण मिळताच मला खूप आनंद झाला. त्यांच्या या पुस्तकाचा अभ्यास करण्यापूर्वीपासूनच त्यांचे विचार मला पूर्णपणे माहित आहेत. यातूनच त्यांच्या वास्तविक आदर्शांवरील प्रवासाची सुरुवात करण्यात बहुमोल सहकार्य केले.

# भूमिका

इंग्रजांचा गुलाम असलेल्या इजिप्त मध्ये माझा जनम झाला.  या गुलामीने माझ्या जीवनात अतिशय महत्वपूर्ण भूमिका बजावली.  जुन्या आङ्गवणींत लहानपणाचा सुगावा घेत असताना मला आङ्गवते की माझी आई मला नेहमीच म्हणत, ''तु जेव्हा माझ्या पोटात होतास, तेव्हा मी तुला 'हस्सान' म्हणत असे. इंग्रजांच्या गुलामीतून देश स्वतंत्र करण्यासाङ्गी तुला मी समर्पित केलेले आहे''.

तिच्या या वाक्याचा माझ्या मनावर दूरगामी परिणाम झाला. परिणाम? कसले खेळकर लहानपण आणि कसले वडिलधाऱ्यांचे प्रेम ! एक महान कार्य माझ्या डोळयासमोर होते.  जीवनाचे एक उद्‌दिष्ट होते.

इंग्रजीत पारतंत्र्यातून देश सोडविण्याच्या स्वातंत्र्य संगामात माझी पीढी सुद्‌धा पूर्वजांच्याच पावलांवर पावले ङ्केवून चालत होती.  इंगज आणि त्यांचे सहयोगी शासन, या दोहोंच्या दृष्टीत आम्ही आतंकवादी होतो. मात्र इतर देश आणि जगासाङ्गी आम्ही स्वातंत्र्य सैनिक होतो.

इंग्रज शासनकाळाचा अंत पाहण्याचे सौभाग्य आम्हाला प्राप्त झाले.  त्यानंतर मी अभ्यासास्तव इंग्लंड मध्ये होतो, तेव्हा माझ्यपा मनात ब्रिटिश जनतेविषयी मान सन्मान, आदर आणि प्रेम निर्माण झाले.

आपल्या राजकारण्यांच्या व सत्तधाऱ्यांच्या विदेशनिती पेक्षा ब्रिटिश जनता पूर्णतः वेगळयाच भूमिकेची आहे, हे वास्तव कळाले. बऱ्याच काळानंतर मी अमेरिकेस आलो.  येथे सुद्‌धा हीच परिस्थिती अनुभवावयास मिळाली.

माझ्या विद्यार्थी जीवनातच प्रतिकूल परिस्थितीशी सघर्ष करणे आणि अडचणींना तोंड देणे माझ्या वाट्‌याला आले होते.  प्रसूती विज्ञान आणि स्त्रीरोग विज्ञानाचे शिक्षण घेत जीवनाचा गाडा रेटत होतो. अशातच मी स्कॉटलॅडच्या एडिनब्रा विद्यापीङ्गातून पी.एच.डी. ची पदवी घेऊन शिक्षणाचा दनकट आधार घेतला होता. 'स्टडीज इन नॉर्मल ॲड ॲब्नार्मल ह्‌यूमन एब्रॉयोजेनेसिस' हा माझा संशोधनाचा विषय होता.

विद्यापीठ्ठातील प्रोफेसर आणि विभाग प्रमुख, क्लिनिशियन, वैज्ञानिक आणि अध्यापन कार्याबरोबरच आपल्या व्यावसायिक क्षेत्रात राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्थानापर्यंत मजल मारण्याचे स्वप्न पूर्ण केले.

खरे पाहता हे माझे एकमेव लक्ष्य नव्हते. दोन फुप्फूसांपैकी एकाचे जणु श्वास घेण्यासारखे हे कार्य होते. माझी प्राथमिक पसंत तर स्वतःच्याच नव्हे तर इतरही धर्माचे बारीक अध्ययन होते. इतर धर्माचिकित्सकांप्रमाणे माझे अध्ययन खोल नसले तरी विज्ञान, चिकित्सा आणि शोध वृत्तीमुळे मला शोधदृष्टी प्राप्त झालेली होती. यातून स्वतःच्या धर्माचा चिकित्सक अभ्यास करणे आणि ते इतरांना समजाऊन सांगणे मला शक्य झाले.

द्विभाषी असणे व दोन परस्पर भिन्न संस्कृतींशी संपर्क असल्याने मला या गोष्टींची तीव्र जाणिव झाली की, पाश्चात्य राष्ट्रांत इस्लामची जी ओळख आहे, त्या ओळखीसारखा इस्लाम धर्म नाही. (बऱ्याचवेळा असेही वाटले की स्वतः काही मुस्लिम या विकृतीकरणात सहभागी आहेत). सतत इस्लामची निंदा करीत राहणे, इस्लामची प्रतिमा विकृत करुन मांडणे आणि अशा प्रकारचे इतरही कुकृत्य करणे हे जणु राजकारण्याचे समूह, माध्यमे आणि मनोरंजन जगतात एक चळवळ व करीयरच झाले.

कोणत्याही विषयाचे ज्ञान प्राप्त करणे हा प्रत्येकाचा मूलभूत अधिकार असण्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. याबरोबरच शांती, बंधुत्व आणि सद्भाना व सामंजस्याबरोबरच सर्वच सामाजिक बाबीं यावरच आधारीत आहे. असत्य माहिती आणि पुरानपंथी कथांचा याशी कवडीचाही संबंध नाही. सत्यावर आधारीत माहितीनुसारच लोकांना परस्परांतील वास्तविक साम्य आणि फरक माहित होत असतो. अशा प्रसंगी या मतभेद आणि तफावतीचा आदर करीत त्यांप्रती सहिष्णुता दाखवित जीवन जगावे लागते.

सदरील पुस्तक इस्लाम संबंधी याच दिशेत उचललेले एक पाऊल होय. याच पृथ्वीतलावरील लोकांची आस्था असलेल्या इस्लामप्रती मी प्रेम समर्पित करतो.

प्रेम अल्लाहकडून आणि तिरस्कार सैतानाकडुन.

--हस्सान हतहूत.

## प्रकरण पहिले

# गॉड?

मी माझ्या नातीला विचारलं, ''तुझा गॉडवर विश्वास आहे का?'' ''का नाही !'' ती तात्काळ उत्तरली, मग थोडं थांबून म्हणाली, ''आई असंच म्हणते.'' मग तिचे एक पुस्तक घेऊन तिला विचारलं, ''याचा लेखक कोण ?'' तिने ताबडतोब लेखकाचं नांव वाचून सांगितल, चर्चा सुरुच असते. ''समजा मी या पुस्तकाचं पहिलं पान फाडून टाकतो. याच्यावरच लेखकाचं नांव आहे. आणि सांगतो की, हे पुस्तक अमक्या लेखकाने लिहिल वा तमक्यानं लिहिलं किंवा हे पुस्तक कोणत्याही लेखकानं लिहिलं नाही.  मग तु काय म्हणशील ?'' मी म्हणालो. ''शक्यच नाही.'' ती पूर्ण आत्मविश्वासाने म्हणाली. णग आमच्या तर्कसंगत चर्चेतून सिद्ध झालं की पुस्तक एखाद्या लेखकाच्या अस्तित्वाचा पुरावा आहे आणि याबरोबरच ही सृष्टी देखिल तिच्या सृजनकर्त्याच्या अस्तित्वाचं प्रमाण वा पुरावा आहे.

अगदी सरळ आणि सोप्या भाषेत, मुस्लिम विचारसरणीचा हाच एकमेव आधार आहे, याच समविचारातून कदाचित प्रेषितांचे कुलपिता इब्राहीम (अ) अल्लाहचा शोध घेण्यात मग्न झाले.  ळोकांनी तयार केलेल्या मूर्तीस्वरुपातील खोटया, देव-देवतांनी कंटाळून ते प्रकृतीकडे आकर्षित होत गेले आणि त्यातील विभिन्न रुपांत अल्लाहचा शोध घेऊ लागले.

या शोध पवासात सूर्य, चंद्र आणि ता-यांना ते ईश्वर समजू लागले. मात्र हे सुद्धा कोणाच्या तरी आदेशाने उगवतात आणि मावळतात, असं त्यांच्या लक्षात आलं.  मग आदेश देणा-याविषयी ते चिंतन करु लागले. ही बाब कुरआनाने अतिषय मजेशीर शैलीत वर्णण केली...

''... आणि अशा तऱ्हेने आम्ही इब्राहीम (अ) यास आकाश आणि पृथ्वीत आमची सत्ता दाखवत गेलो.  (जेणे करुन त्यांच्या ज्ञानात भर पडावी)'' आणि हे यासाटी की, त्यांना विश्वास व्हावा.

मग जेव्हा त्यांनी सूर्य तळपत असताना पाहिला, तेव्हा म्हणाले, ''हा माझा पूज्य असु शकतो ! हा तर प्रचंड मोङ्गा आहे.'' मग सूर्य मावळला, तेव्हा म्ळणाले, ''हे लोकांनो, तुम्ही ज्यांना अल्लाहचा भागिदार ङ्करविता, त्यांपासून मी विभक्त आहे.'' (संदर्भ : ६, ७५-७८)

आज सुद्धा ईश्वरीय कल्पना पाहिजे तेवढी लोकप्रिय नाही. अध्ययन आणि चिंतन-मनन करणारे अमेरिका आणि यूरोपचे माझे अनेक वैज्ञानिक मित्र पूर्वी कम्युनिस्ट नसलेले नसून सुद्धा नास्तिक होते, हे पाहून मला खूपच आश्चर्य वाटते.

कधी काळी नास्तिक होण्याचे मी खूप प्रयत्न केले. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात मी वॉग येथील आपल्या स्वदेशी विद्यापीङ्गाच्या विद्यार्थ्यांसोबत होतो. मात्र पराकोटीचे प्रयत्न करुन सुद्धा ईश्वराशिवाय या सृष्टीची कल्पना करणे शक्य झाले नाही.

अशातच एके दिवशी एक अडचण आपोआपच नाहीशी झाली. त्या सायंकाळी मी एका शब्दाचा अर्थ पाहण्यासाङ्गी शब्दकोष उघडला आणि नेमक्या त्याच क्षणी माझ्या डोक्यात एक विचार डोकावला. शमजा कोणी म्हटले की, या शब्दकोषातील व्यवस्थित जमविलेले शब्द हे एखाद्या छापखान्यात घडलेल्या स्फोटाचा परिणाम आहे. या स्फोटातून सगळे शब्द चमकत बाहेर पडले आणि मग आपोआपच व्यवस्थितपणे जमले. मात्र निश्चितच माझ्या मनमस्तिष्कास हे पटणारे नव्हते, पटले ही नाही.

तेव्हा विचार आला की, जर तो परम रचनाकार असेल तर त्याच्यापेक्षा कोणीही महान असु शकत नाही. थरी सुद्धा तो कोणापेक्षा कोणीही महान असु शकत नाही. थरी सुद्धा तो कोणापेक्षातरी कमी आहेच. त्यास मर्यादा असून असीम व अनंत होण्यात त्याला प्रतिस्पर्धी आहे. तेव्हा तो परम रचनाकार असण्यास समर्थ नाही. कारण परम रचनाकार हा प्रत्येक क्षेत्रात विशेष सामर्थ्य बाळगतो. म्हणूनच त्यास अनंत व असीम सुद्धा म्हटले जाते.

गणित शास्त्रात तर अनंत हे वैज्ञानिक सत्य असून त्यासाङ्गी एक विशेष चिन्ह आहे. निश्चितच आपण अनंतास पूर्णतः समजु शकत नाही. थरी सुद्धा आपण हे स्वीकारु शकतो की, एखादी दिव्यशक्ती या सृष्टीची निर्माती आहे. कारण आपण सर्वच नश्वर असून आपल्याला मर्यादा आहेत. अशा मर्यादित

क्षमता व सामर्थ्यामुळे आपल्याला अनंत समजणे शक्य नाही. मात्र अल्लाहला सर्व काही ज्ञात आहे. त्याच्या निर्मिती आणि त्यातील छुपे संकेत पाहून आपण त्यास समजू शकतो.

गणितीय नियमानसार सुद्धा अनंतास तीन किंवा चार भागात विभाजित करणे शक्य नाही. म्हणून अल्लाह अथवा ईश्वर एकापेक्षा अधिक होऊ शकत नाही. अर्थात एक अल्लाह ज्यूंचा, एक ख्रीश्चनांचा, एक मुस्लिमांचा असा वेगवेगळा अल्लाह मान्य करता येत नाही, वगैरे. सारांश असा की, समस्त मानवांचा अल्लाह एकच होय. हाच एकेश्वरवाद इस्लामी आस्थेचा एकमेव आधार आहे आणि हीच मुस्लिमांची आस्था आहे.

आपण अल्लाह साङ्गी सर्वनाम 'तो' वापरतो मात्र अरबी, उर्दू वा पर्शियन भाषेत यासाङ्गी सर्वनाम 'वह' वापरण्यात येते. यावरुन अल्लाह स्त्राी लिंगी आहे की, पुल्लिंगी आहे, हे निश्चित होत नाही. अशा सर्वपकारच्या भेदातून अल्लाह मुक्त आहे मात्र गॉड, ईश्वर सारख्यां शब्दांना वा त्यांच्या सर्वनामांना याप्रकारच्या भेदातून मुक्ती नाही. ही बाब निश्चितच उल्लेखनिय आहे की, त्या असीम व अनंत सृष्टीकर्त्यास इंग्रजी सहित इतर अनेक भाषांत एका शब्दात व्यक्त क रणे शक्य नाही. आणि म्हणूनच इंग्रजी भाषेते या सृष्टीकर्त्यास व्यक्त करण्यासाङ्गी मानवनिर्मित देवांपासून मुक्त करण्याकरीता 'गॉड' या शब्दाचे 'जी' कॅपिटल म्हणजे मोङ्गे लिहिणे आवश्यक होत असते.

मानवनिर्मित देवतांसाङ्गी 'जी' स्मॉल लिहिण्यात येते. इतर भाषांत त्या सर्व शक्तीमान निर्मात्यासाङ्गी विशेष शब्दांचा वापर करण्यात येतो, अरबी भाषेत मात्र त्यास 'अल्लाह' असे म्हटले गेले. त्याचप्रमाणे इंग्रजीत 'गॉड', 'फ्रेच मध्ये' 'दियु' हिब्रू मध्ये 'एदोनाई' असे शब्द वापरण्यात येतात. यांत संभ्रम निर्माण होता कामा नये. व्याख्यानाप्रसंगी बऱ्याच वेळा श्रोत्यांनी मला 'जर तुम्ही गॉड ची' पूजा करता तर मग 'अल्लाह' कोण आहे, असा प्रश्न विचारतात.

ही बाब एवढी सरळ सोपी नसते, याचा अनेकदा अनुभव आला. कारण काही सुशिक्षित व विवेकशील लोकांना वाटते की, मुसलमान गॉडची पूजा करीत नाही त्यांचा 'गॉड' वेगळा आहे, ज्याला ते अल्लाह या नावाने संबोधतात.

### प्रकरण दुसरे

# मुस्लिम संप्रदाय

अल्लाह आहे की नाही, यावर खरेच आपण विचार करतो का? केवळ सुशिक्षित, जिज्ञासु अगर धर्मशास्त्री अथवा दर्शन शास्त्रीच्याच आवडीचा हा मुद्दा आहे का? अल्लाहचे अस्तित्व असण्याचे किंवा नसण्याचे काय औचित्य आहे? याच्या असण्याचा वा नसण्याचा मानवसमाजावर काय प्रभाव पडतो ?

शमजा अल्लाह आहे आणि तोच या सृष्टीचा निर्माणकर्ता सुद्धा आहे. त्याच्या या रचनाकर्मावर आधारीत एका अभ्यासातून असे दिसून आले की, मानवजगत हे सृष्टीच्या इतर निर्मितींपेक्षा भिन्न आहे. कारण आपण अभ्यास करण्यास समर्थ आहोत.  परमाणु पासून ते आकाश गंगेपर्यंत सर्वच त्याच्या आदेशाचे पालन करतात, जो त्यांना नियंत्रित करतो. आपल्या अनुंचे गङ्गन आणि रचना एकाच प्रकारे करण्यात आलेली आहे. आपल्या शरीराची प्रकिया सुद्धा त्याच नियमांचे पालन करते.

जसजशी आपल्या शरीराची क्रिया जटिल होत जाते आणि न्यूक्लिड ॲसिड (स्वनिर्मित अणु, जीवनाचे आधार तत्व) तयार करण्याची प्रक्रिया सुरु करते, तेव्हा रसायनशास्त्राचा संबंध जैवविज्ञानाशी येतो. अश तऱ्हेने आपण आश्चर्यजनकरित्या उच्च दर्जाचे पशु झालो. मी शाळेत असताना मानव हा सजिव सृष्टीचा प्रमुख आहे, असे शिकविण्यात येत. आपली श्वसन व्यवस्था, चयापचन, संवेदन, प्रजनन आणि इतर सर्वच प्रकारच्या व्यवस्थानुसार जैविकविज्ञानात आपण पशुंच्या व्यवस्थानुसार जैविकविज्ञानात आपण पशुंच्या कक्षेतच मोडतो, तरी सुध्दा निदान अद्यापपर्यंत तरी आपण कोणत्याही परिस्थितीत स्वतःला पशु समजायला तयार नाही. कारण आपल्याला चांगल्या रितीने माहित आहे की आपल्याला प्राण्यांच्या परिभाषेत मोडण्यासाङ्गी आवश्यक असलेले जैविक गुणधर्म आपल्यात नाहीत आजपर्यंत जेवढया प्रजातींचा शोध लावण्यात आला, त्यापैकी आपण मात्र वरील श्रेणित नक्कीच मोडतो.

ज्यांच्या व्यवहारासाङ्गी जैविक शास्त्र पूर्णतः सक्षम स्वरुपात दिशादर्शक

नाही, त्या आधारावर आपण मात्र सुपर बायॉलॉजिकल प्राणी आहोत. अत्यंत सहजरितीने व स्वाभाविकपणे व्यक्त करता येणाऱ्या ज्ञान व वासना आपल्यांत आहेत. मात्र आपण मनुष्य ही प्रक्रिया अतिशय जटिल रुपाने प्रस्तुत करतो आणि हे आपल्या प्रजनन प्रक्रियेपासून भिन्न आहे. आपले जैविकशास्त्र हे पशुंच्या जैविक शास्त्राशी खूप मिळते जुळते आहे. मात्र पशुंच्या कक्षेत मोडण्यासाङ्गी केवळ जैविकशास्त्र पुरेसे नसते हे सुद्धा तेवढेच सत्य होय.

इतर प्राण्यांच्या तुलनेत आपण खूप जास्त विकसित आहोत. आपण आदर्श, सिद्धत आणि अध्यात्म सारख्या बाबी आपल्यात विकसित केल्या. म्हणून या शरीररुपी कंटेनर मध्ये वास करीत असलेले आपण अध्यात्मिक प्राणी आहोत, असे म्हणणे चुकीचे ङ्गरणार नाही. जी माणसे केवळ स्वेच्छांपूर्तीस्तव किंवा स्वार्थासाङ्गी जण्यातच स्वतःला बंदिस्त ङ्गेवतात, त्यांच्यात आत्मिकता नसते आणि ते पशुसमान असतात.

मानवांचा अभ्यास करताना असे आढळून आले की, ईश्वराने आपणांत चार महत्वपूर्ण वैशिष्टये ङ्गेवली आहेत, पहिले ज्ञान, दुसरे चांगल्या व वाईट बाबींत फरक करणे, निवडस्वातंत्र्य आणि उत्तरदायित्व.

**ज्ञान :-** आपल्याला ज्ञानार्जन आवडते आणि जास्तित जास्त ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करतो. निरिक्षण, कल्पना, तर्कबुद्धी, विश्लेषण, प्रयोग आणि परिणाम वगैरेची अफाट क्षमता आपल्यांत आहे. भूतकाळाबरोबरच भविष्य माहित करुन घेण्याची सुद्धा आपल्याला खूप तीव्र इच्छा असते तसेच आपल्या सभोवतालच्या प्राकृतिक निरिक्षणातही आपण मग्न असतो. याबरोबरच या बाबींचा आढावा घेऊन ते ज्ञान सुरक्षित ङ्गेवून ते व्यक्त करीत राहतो.

**भल्या-बुऱ्याची ओळख** :- सत्याविषयी आकर्षण आणि असत्या विषयी अनाकर्षणाची आपण आशा करतो, मानवीय जीवनाचा गुंता, मनमस्तिष्काची विचारोत्तेजना आणि सर्वच बाबी तर्कबुद्धीच्या कसोटीवर पारखताना सैतानाद्वो दुविधा व अडचणी निर्माण करणे हे वास्तविकतेचे चित्र आणखीनच अस्पष्ट करुन टाकते. ही परिस्थिती असूनही भल्या-बुऱ्याची ओळख प्राचीन काळापासूनच आपल्या जीवनाचा अभिन्न भाग आहे.

**निवडस्वातंत्र्य :-** ईश्वराने मानवप्रजातीस जे स्वातंत्र्य प्रदान केलेले आहे, त्यातूनच आपल्याला निवडस्वातंत्र्य मिळालेले आहे. निश्चितच हे स्वातंत्र्य

परिपूर्ण नसले तरी अथवा हे स्वातंत्र्य मर्यादित असले तरी हे मानवी जीवनासाङ्गी सर्वात महत्वपूर्ण पैलू होय.

**उत्तदायित्व :-** निवडस्वातंत्र्य हे मानवाच्या उत्तरदायित्वावर आधारीत आहे. आपल्या कर्माप्रती आपण उत्तरदायी असून ते निवडण्याची जवाबदारी आपलीच आहे, याची जाणिव आपल्याला सदैव असते. एखाद्या नास्तिक व्यवस्थेत सुद्धा सिग्नल तोडण्याचा दंड भरावा लागतो. मात्र धार्मिक बाबतीत वेगळा प्रकार आहे. आपल्याला स्वातंत्र्य नसेल तर धार्मिकरित्या आपली कोणतीही जवाबदारी नसते आणि पारलौकिक जीवनात याचा जाब सुद्धा द्यावा लागणार नाही.

धार्मिक व धर्मनिरपेक्ष दृष्टीकोणाने पाहिल्यास स्वातंत्र्य मानवाचा मूलभूत अधिकार आहे. आपल्या कर्मांप्रती जवाबदार आणि प्रतिनिधी लक्षण स्वतंत्र असलेली ही मानवप्रजाती ईश्वराने निर्माण केलेली आहे. आपल्या मर्यादा, निवडस्वातंत्र्य आणि क्षमतेपेक्षा जास्त कर्म हे आपल्या आवाक्याबाहेर असल्याने ते भाग्यांवर आधारीत आहेत. यामुळे मानव यांविषयी मात्र उत्तरदायी नसणार.

अर्थातच सातत्याने आत्मसंवाद करणे आणि भल्या-बुऱ्यांसंबंधी निर्णय घेत जीवन जगणारी प्रजाती म्हणजे मानव. बऱ्याचवेळा भावनेच्या भरात आपण सत्य आणि असत्याची ओळख करु शकत नाही आणि दुष्कर्मात लिप्त होत असतो. याचे दुष्परिणाम भोगावे लागतात. मात्र या आंतरिक द्वंद्वं पासून प्राणी मुक्त आहेत. त्यांना आवडेल तेच ते करतात. शिवाय प्राचीन ग्रंथांत फरिश्ते केवळ सत्कर्मच करतात, दुष्कर्म करण्याची त्यांच्यात क्षमताच नसते, असे सुचविण्यात आलेले आहे.

मानवतेवर प्राणी एका निश्चित कार्यक्रमानुसार कार्य करतात, आपण मात्र आपल्या आवडी-निवडीनुसार कार्य-कर्म करीत असतो. हा मानवतेचा दुर्लभ आहे. याची पुष्टी प्राचीन ग्रंथांतून सुद्धा होते. अल्लाहने आदम यास सजदा करण्याचा फरिश्त्यांना आदेश दिला आणि पापमुक्त असून सुद्धा फरिश्त्यांनी आदेशाचे पालन केले.

आता आपण विषयांतर करुन या ब्रह्मांडाविषयी चर्चा करुया. ब्रह्मडाविषयी आपण वैज्ञानिक रुपाने जेवढी जास्त चर्चा करु तेवढे जास्त आपल्याला असे आढळून येईल की, हे अत्यंत संतुलित असलेले ब्रह्मड असून ते समिकरणांवर

आधारीत आहे. अगदी थोडा नव्हे, किंचितसाही संतुलनाचा फरक पूर्ण ब्रह्मड नष्ट करु शकतो.

मानवसमाजाकडे पाहिल्यास असे आढळून येते की लोक किती मोङ्गमोङ्ग्या दुष्कर्मांत लिप्त आहेत आणि अपराधी जीवन जगत आहेत, अशा ब्रह्मडात आपण राहतो. असेच जीवन जगण्यात त्यांना आनंद मिळतो, असे वाटते. अशातच ते शेवटी मरण पत्करतात. याव्यतिरिक्त काहीजण सत्य आणि न्यायासाङ्गी संघर्ष करतात, आपल्या आदर्शावर चालतात, सत्यासाङ्गी बलीदान देतात. जगण्याचे दोन्ही प्रकार आहेत, मात्र दोन्ही प्रकारच्या जगण्याचा अंतिम परिणाम केवळ मृत्युच आहे काय? आपला अंतरात्मा हे स्वीकारु शकत नाही.

अशा परिस्थितीत माणसाच्या उत्तरदायित्वाचा प्रश्न उभा राहतो. जीवनाचा अंत जर मृत्यूच असेल तर मानवाचं हे जीवन निरर्थकच होय. त्यास आपल्या भल्या-बुऱ्या कर्मांचा जाब कोणालाही द्यायची गरज नाही. मात्र खऱ्या अर्थानं जर विचार केला तर मत्यूनंतर एक जीवन निश्चितच आहे. जीवनाचे संतुलन स्थापन करण्यासाङ्गी प्रलयाचा दिवस निश्चित करण्यात आलेला असून या दिवशी भल्या-बुऱ्या कर्मांचा जाब द्यावालागणार आहे आणि कर्माची उचित फळे मिळणार आहे, असे प्राचीन ग्रंथांत नमूद आहे.

अल्लाहने आपल्याला कर्म स्वातंत्र्य देऊन आपलयाला उत्तरदायित्वाबरोबर बांधलेलं आहे. आपण परिपूर्ण होऊ शकत नाही आणि तशी अपेक्षा देखिल नाही. अडचणीं आणि सांसारिक आकर्षणाशी संघर्ष करीत असताना आपल्या सामर्थ्यानुसार उत्तमोत्तम कर्म करीत राहावं, एवढीच अपेक्षा होय. बऱ्याच प्रसंगी आपण सत्यानुसार कर्म करण्यासाङ्गी सक्षम नसतो. आपलं जीवन सतत संघर्षमय असणं हेच याचं कारण होय.

अशा परिस्थितीत हीच बाब तर्कसंगत वाटते की, अल्लाह आपल्या सर्व मानवांच्या सतत संघर्षाचा प्रशंसक असून तो आपल्यावर प्रेम करतो. मानवाला अल्लाहनं मानवाला कर्म-स्वातंत्र्य देऊन सुद्धा मानव हा उत्तरदायित्वाच्या परीक्षेत उत्तीर्ण होतो, याचा त्यास खूप अभिमान आणि आनंद होतो. यासाङ्गी अल्लाहला अंतिम न्यायकर्ता आणि शासकाच्या रुपात आपण सदैव ध्यानी ङ्खेवावयास पाहिजे, एवढचं आपल्यासाङ्गी भलं काय आणि वाईट काय, हे त्यानं अगोदरच निश्चितच करुन ङ्खेवलं. प्रलयाचा अर्थात अंतिम निवाड्याचा दिवस निश्चितच येणार आहे, हे सदैव ध्यानी ङ्खेवणं अत्यावश्यक होय.

याविषयी उत्तम मार्गदर्शनासाङ्गी मानवांतूनच निवडक मानवांची निवड करण्यात आली. या निवडक मानवांशी अल्लाहनं आपल्या स्वतःच्या पद्धतीनं (सरळ संवाद, लिखित वर्णण आणि फरिश्त्याच्या माध्यमानं) संपर्क करुन मानवसमूहापर्यत दैवी संदेश पोचविण्याचं कार्य केलं. केवळ अल्लाहचीच पूजा करावी आणि सदैव सत्कर्म करीत राहावं. शैतानी कर्मांपासून दूर असावं. प्रलयाचा अर्थात अंतिम निवाड्याचा दिवस निश्चितच येईल. या दिवशी त्याच्या समोर उपस्थित होऊन आपल्या भल्याबुऱ्या कर्मांचा जाब द्यावा लागणार. हाच संदेश देणे हे पैगंबरांच्या वा प्रेषितांच्या आगमन-शृंखलेचा एकमेव उद्देश होय.

आजपर्यंतच्या इतिहासात अनेक पैगंबर (अर्थात संदेश वाहक) आले. यांपैकी काहीं महत्वाच्या पैगंबरांची नावे दैवी ग्रथांत आहेत. रकाहींना मार्गदर्शक ग्रंथ प्रदान करण्यात आले आणि काही पैगंबरांना चमत्कार देण्यात आले. यांपैकी ज्यू, इस्लाम आणि ख्रिस्ती धर्मांत इब्राहीम पैगंबरांच्या वंशात तीन महत्वपूर्ण पैगंबरांचा उल्लेख आढळतो.

मुहम्मद (स) पैगंबर हे इब्राहीम (अ) पैगंबरांचे पुत्र इस्माईल (अ) पैगंबरांच्या वंशात असून मूसा (अ) पैगंबर आणि ईसा (अ) पैगंबर हे इब्राहिम (अ) यांचेच दुसरे पुत्र इसहाक (अ) पैगंबरांच्या वंशात जनमलेले आहेत.

ज्यू धर्मीयांच्या मान्यतेनुसार ज्यू धर्म हाच अंतिम धर्म असून पैगंबरांचे आगमन बंद झाले आहे. म्हणून ईसा (अ) पैगंबर त्यांच्या दृष्टीत मसीहा वा पैगंबर नसून मेरी (अ) सुद्धा पवित्र नारी नाही. अजूनही ज्यू धर्मीय मसीहाची (अर्थात मानवतेच्या उद्धाकर्त्याची प्रतिक्षा करीत आहेत. शिवाय ख्रीस्ती धर्म हा दैवी धर्म असल्याचे ते नाकारतात).

अगदी याचप्रमाणे ख्रीस्तीधर्मीयांच्या मान्यतेनुसार पैगंबरांच्या आगमनाच्या शृंखलेत ईसा (अ) हे अंतिम पैगंबर असून आता ही शृंखलाच बंद झालेली आहे. शिवाय ज्यू धर्म हा दैवीधर्म असल्याचे देखिल ते मान्य करतात. आणखीन महत्वाची बाब म्हणजे मुसलमान हे ज्यू आणि ख्रीश्चन हे दोन्ही धर्म दैवीधर्म असल्याचे मान्य करतात. आणि ज्यू व ख्रीस्त धर्मीय हे इस्लाम धर्मास दैवी धर्म असण्याची मान्यता नाकारत असून सुद्धा इस्लाम मात्र ज्यू व ख्रीस्ती धर्म हे दैवी धर्म असण्याची मान्यता देतो.

मुसलमान हे इस्लाम धर्माच्या अनिवार्य मान्यतेनुसार ज्यू व ख्रीस्ती धर्माच्या

तसेच त्यांच्या पूर्वीच्या दैवी धर्मास, त्या धर्माच्या पैगंबरांस व त्यांच्या धर्म ग्रंथांस मान्यता देतात व पूर्णपणे आदर बाळतात. ही मान्यता प्रत्यक्ष कुरआनाच्या शिकवणींतच अनिवार्य ङ्करविण्यात आलेली आहे व यावर विश्वास ङ्केवणे पत्येक मुसलमानासाङ्गी अनिवार्य आहे.

कुरआनात यासंबंधी स्पष्ट आदेश आहे की, ''त्याने (अल्लाहने) तुमच्यासाङ्गी (मुसलमानांसाङ्गी) तोच धर्म निर्धारित केला जो त्याने नूद (अ) पैगंबर यांच्यावर अवतरीत केला होता. आणि तो जीवंत आदेश जो आम्ही (अल्लाहने) तुमच्यावर प्रकाश्ति केला आहे आणि जो इब्राहीम (अ) पैगंबर आणि मूसा (अ) व ईसा (अ) या पैगंबरांवर आदेश प्रकाश्ति केला होता, तो असा की, ''धर्म स्थापित करा आणि त्याविषयी मतभेद करु नका.'' (संदर्भ : ४२, १३)

पुढे जाण्यापूर्वी आपल्या सोयीसाङ्गी आपण कुरआनावर संक्षिप्तपणे चर्चा करुया. मुसलमानांची अशी पक्की धारणा व विश्वास अगर श्रद्धापूर्ण मान्यता आहे की आकाशीय ग्रंथ कुरआनाचा एकन् एक शब्द हा स्वयं अल्लाहने मुहम्मद (स) पैगंबर यांच्यावर सर्वश्रेष्ङ्क फरिश्ता जिब्रील (अ) याच्या माध्यमाने अवतरीत केला. विभिन्न विषय, मुद्दे आणि घटनांवर छोटा-छोट्या भागांत पूर्ण २३ वर्षांच्या कालावधीत कुरआन अवतरित झाले.

कुरआन अवतरित झाल्यावर मुहम्मद (स) पैगंबरांनी अल्लाहच्या आदेशानुसार यास क्रमबद्ध व लिपीबद्ध केले, तेव्हापासून कुरआन आपल्या अरेबी या मूळ भाषेत जशास तसा सुरक्षित आहे. आकाशीय ग्रंथाच्या स्वरुपात कुरआन अत्यंत अद्भूत व आश्चर्यकारक ग्रंथ आहे. कुरआनाच्या अनुवादित आवृत्तीस कुरआन असे म्हणता येत नसून त्यास सार अथवा टिप्पणी असे म्हणतात. कारण यात मानवीय प्रयत्नांचा घटक सामिल असतो आणि अल्लाहचे मूळ शब्द नसतात.

कुरआन अरबी भाषेत असून त्यास अतिशय उत्कृष्ट साहित्यिक रचना असल्याची जागतिक मान्यता प्राप्त आहे. मुहम्मद पैगंबर (स) यांच्या काळातच अरबांना कुरआनाचे जाहिर आव्हान दिले होते, की कुरआनासारखे काहीतरी तयार करुन दाखवावेच. मात्र आपल्या भाषाशास्त्राच्या ज्ञानाचा अभिमान बाळगणारे आणि साहित्यिक सामर्थ्यावर गर्व करणारे अरब लोक हे आव्हान पेलु शकले नाही आणि कुरआनाच्या अरबी भाषा व रचनांचा ते आदर करु लागले. एवढेच नव्हे तर इस्लामचे काही कट्टर विरोधक कुरआनाचा काही

भाग ऐकूनच मुस्लिम झाले.

## प्रकरण तिसरे

# इस्लाम आणि इतर समुदाय

कुरआनानुसार सृष्टीकर्ताद्वारा प्रत्येकास वंश, उत्पत्ती आणि संप्रदायाच्या माध्यमाने पूर्णतः मानवीय स्वरुप देण्यात आलेले आहे. अल्लाहने कुरआनात म्हटले की, ''आम्ही (स्वयं अल्लाहने) आदमच्या संततीस (समस्त मानवजातीस) श्रेष्ङ्गता प्रदान केली आणि त्यास भूतलावर व पाण्यावर स्वारी प्रदान केली; सोबतच उत्तम आणि पवित्र वस्तुंच्या रुपात उदरनिर्वाहाची साधने प्रदान केली; तसेच आम्ही (अल्लाहने) निर्माण केलेल्या इतर प्राण्यांच्या तुलनेत मानवांस श्रेष्ङ्गता पदान केली'' (१७, ७०)

इस्लाम समस्त मानवजगतास एकच परिवाराच्या दृष्टीकोनातून पाहतो. कुरआनात म्हटले आहे की, ''हे लोकहो ! आपल्या पालनकर्त्याचा आदर आणि भय बाळगा, ज्याने तुम्हास एका जीवापासून निर्माण केले आणि त्यासाङ्गी त्याच जीवापासून एक जोडीदार निर्माण केला मग त्या दोघांपासून अनेक पुरुष आणि स्त्रियां निर्माण केल्या. (०४, ०१) यात प्रत्येकास धर्म स्वातंत्र्याबरोबरच समान मानवाधिकार प्रदान करण्यात आले. इस्लाम धर्माने समस्त इस्लामेतर समुदायांचे अधिकारांच्या रक्षणाची पूर्ण जवाबदारी स्वतः उचललेली आहे. इस्लाम हा काही मनाला न भोवणारा, वेगळाच वा विलक्षण धर्म नसून तो प्रत्येक मानवाच्या आत्म्याचीच साद आहे. कोणत्याही मोङ्ग्या पंडित, पुरोहित वा धर्मशास्त्रीस अल्लाहच्या क्षमा-सीमांच्या अधिकारांत लुडबुड करण्याचा मुळीच अधिकार नाही. शमस्त कर्मांचा न्यायकर्ता एकमेव अल्लाह आहे. निश्चितच तुम्हा सर्वांना आपल्या पालनकर्त्याकडेच परतावे लागणार आहे.'' (०६, १६४)

## ज्यांवर धर्मग्रंथ अवतरित झाले.

(ज्यू आणि ख्रीस्ती)

ज्यू आणि ख्रीस्ती हे मुस्लिमांना जास्त जवळचे आहेत. त्यांना इस्लामने ग्रंथधारक असे म्हटले. कारण यां समुदायांकडे आकाशीय ग्रंथ आवतरलेले आहे. हे दोन्ही समुदाय एकेश्वरवादी आहेत. त्यांच्या पैगंबरांवर मुस्लिम समुदाय विश्वास ङ्केवतो. एवढेच नव्हे तर तीन्ही धर्मांमध्ये नैतिक नियम देखिल समान आहेत. कुरआनात म्हटले आहे की, ''सांगा ! आम्ही ईमान ङ्केवतो अल्लाहवर आणि कुरआनावर आणि इब्राहीम, इस्माईल, इसहाक आणि याकूब या पैगंबरांवर अवतरीत झालेल्या बाबींवर ईमान ङ्केवतो. याबरोबरच मूसा, ईसा आणि सर्वच पैगंबरांवर अवतरीत झालेल्या शिकवणी आणि ग्रंथांवर ईमान (श्रद्‌धा) ङ्केवतो. त्यात जे काही आहे, त्यातून काहीही वेगळे करीत नाही आणि आम्ही केवळ त्याचीच आज्ञा पाळतो.'' (०२ १३६)

'इस्लाम' या शब्दाचा शब्दशः अर्थ 'अल्लाहच्या मर्जीसमोर आत्मसमर्पण करणे' असा होतो.

ग्रंथधारक समुदायाकडून देण्यात आलेले अन्न वा जेवण (जे मदिरा, वराह-मांस सारख्या निषिद्‌ध वस्तुंपासून तयार झालेले नाही, असे) घेण्याची मुस्लिमांना परवानगी देण्यात आली आहे. याबरोबरच मुस्लिम समुदाय आपले अन्न त्यांना देऊ शकतो. कुरआनात म्हटले आहे की, ''आज तुमच्यासाङ्गी चांगल्या व पवित्रा वस्तुं वैध करण्यात आलेल्या आहेत आणि जे ग्रंथधारक आहेत, त्यांच्याकडून देण्यात येणारे जेवण तुमच्यासाङ्गी व तुमच्याकडून देण्यात येणारे जेवण त्यांच्यासाङ्गी वैध आहे (०५.०५) एवढेच नव्हे तर ज्यू आणि ख्रीस्तींच्या (ग्रंथधारकांच्या) महिलांशी मुस्लिम लग्न करु शकतात (०५, ०५)''

धर्माच्या बाबतीत कोणावरही बळजबरी नाही असे कुरआनात (०२, २५६) आदेश देण्यात आलेले असून या आदेशानुसार मुस्लिम पती आपल्या ग्रंथधारक (ज्यू अगर ख्रीस्ती) पत्नीवर इस्लाम धर्म स्वीकारण्यासाङ्गी दबाव टाकु शकत नाही. या महिलांना स्वधर्मानुसार ईश्वराची उपासना करण्याचा अधिकार आहे.

इस्लामी राज्यांत ज्यू व ख्रीस्तींना (ग्रंथधारकांना) समानरुपाने धार्मिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक वगैरे अधिकार पूर्णतः प्राप्त असून त्यांच्याशी पक्षपात वा दूजाभावाचे वर्तन करण्यास मुहम्मद पैगंबरांनी सक्तीने मनाई करीत म्हटले की जो कोणी ग्रंथधारकांस कष्ट देईल, तो मला कष्ट पोचवेल.

अगदी स्थापनेच्या वेळीच इस्लामी समाज एक बहुलवादी समाज होता. मुहम्मद पैगंबरांनी मदीना शहरी आगमनाप्रसंगीच इस्लामी शासन पस्थापित करण्यासाङ्गी विभिन्न ऐक्य प्रस्थापित केले. यात धार्मिक स्वातंत्र्य, समानाधिकार आणि कर्तव्य पालन सुनिश्चित करण्यात आले. या ऐक्यानुसार ज्यू सुद्धा यात सामिल होते.

इस्लाम हा काही आगळा वेगळा धर्म नाही. अरबांचा वा पूर्वेचा धर्म असल्याचे काही विरोधक म्हणतात, तसे सुद्धा नाही. जगाच्या पाङ्गीवरील समस्त मानवजातीस संबोधित करणारा हा विश्व संदेश आहे. ग्रंथधारकांनी इस्लाम न स्वीकारला तरी ते वैरी, शत्रु अगर नास्तिक समजले जात नाही. ग्रंथधारकांपैकी काही लोक सरळमार्गी आहेत, रात्रीच्या वेळी ते अल्लाहची स्तुती करणारे आणि नतमस्तक होणारे आहेत, अशी स्तुती स्वतः कुरआनानेच (०३, ११३) केली आहे. अल्लाहच्या कृपांवर आपलाच आणि केवळ आपलाच अधिकार असल्याचा दावा कोणतीही व्यक्ती विशेष आणि समुदाय मुळीच करु शकत नाही. याबरोबरच अल्लाहच्या कृपा आणि अनुग्रहांपासूनही वंचित सुद्धा करु शकत नाही. सत्य कोङ्गेही असो, इस्लामने नेहमीच त्यास प्रोत्साहन दिले. कुरआनात म्हटले की, ''निश्चितच ईमानधारक (मुस्लिम), ज्यू, ख्रीस्ती आणि साबेई वा इतर कोणीही जे अल्लाहवर ईमान (श्रद्धा) ङ्खेवतात आणि अंतिम दिनावर (अंतिम निवाड्याच्या दिवसावर) विश्वास ङ्खेवतात, चांगले कर्म करतात, अशा लोकांना पालनकर्त्याकडून (अल्लाहकडून) उत्तम मोबदला मिळणार आहे.'' (०२, ६२)

**सैद्धांतिक मतभेद :**

इस्लाम, ख्रीस्तीधर्म आणि ज्यू धर्माविषयी पाश्चिमात्य देशांतील बहुसंख्य लोकांमध्ये विलक्षण व मोङ्ग्या प्रमाणात विचित्र तर्कवितर्क आहेत. मात्र खरे पाहता या तीन्ही धर्मात कमालीचे साम्य आहे. ख्रीस्ती आणि ज्यू धर्माच्या तुलनेत इस्लाम या दोन्ही धर्माच्या खूप जवळ आहे. आकाशीय अवतरणाच्या आधारावर इस्लामने या दोन्ही धर्मांना मान्यता दिलेली आहे. या उलट ज्यू धर्म ख्रीस्ती आणि इस्लामला मान्यता देत नाही.

अशा परिस्थितीत 'ज्यूडो ख्रीश्चियन' हा शब्द केवळ संभ्रम निर्माण करणाराच नसून राजकीय रित्या केवळ मुस्लिमांना वेगळे करणारा आहे, असे वाटणे साहजिक आहे. आपल्या वर्तमान संस्कृतीस 'ज्यूडो-ख्रीश्चियन-इस्लामिक'

असे म्हणणे जास्त योग्य ङ्करेल. कारण हे तीन्ही धर्म इब्राहीम पैगंबर (अ) यांच्याच परंपरेतून उदयास आलेले आहेत. ही इब्राहीम पैगंबरांची पारंपारिक संस्कृती असून मुस्लिम, ज्यू आणि ख्रीस्ती व इतर सर्वच समुदायाचे लोक सहिष्णुतेने, सामंजस्य व बंधुभावाने समाज रुपात सुरक्षा व न्याय प्राप्त करत असलेली ही संस्कृती होय.

इब्राहीमी परंपरेतील धर्म आणि इस्लाम मध्ये अनेक प्रकारे साम्य असु शकते. मात्र यांच्यातील सैद्धतिक मतभेदांवर चर्चा करणे सुद्धा योग्यच ङ्करेल. या चर्चेचा उद्देश इतर धर्मांवर टीका करणे नसून केवळ आवश्यक माहिती पुरविणे एचढाच आहे. याच्या माध्यमाने ज्यू आणि ख्रीस्ती वाचकांना इस्लामशी असलेल्या त्यांच्या संबंधांचे पुनर्मुल्यांकनाची संधी प्राप्त होईल. कारण इस्लामच्या माहिती आणि हकनाक ते इस्लामद्वेषाला बळी पडलेले आहे.

इस्लामच्या अनुसार समस्त वैशिष्ट्यांत अल्लाह अजरामर, शाश्वत, अनंत आणि समस्त प्रकारच्या प्रकटीकरणात विशिष्ट आहे त्यास एखाद्या रुपात, स्वरुपात सादर करण्याची किंवा सीमित करण्याची कल्पना करणे सुद्धा शक्य नाही. तसेच त्याच्यासाङ्गी सन्मानजनक भाषेचा वापर करण्यात येतो.

आणि म्हणूनच मुस्लिमांना बायबल मध्ये असे वाचून खूपच आश्चर्य वाटते की, गॉड ने गॉर्डन ऑफ ईडन मध्ये फेरफटका मारला अथवा त्याने फरिश्त्यांची निर्मिती केलजी व त्यांना आदम संबंधी म्हटले, हे बघा, हा मनुष्य माझ्या सारखा होणार; अथवा त्याने (पूर आल्यानंतर) पश्चात्ताप करीत म्हटले की, मी असे केलेले नाही, असे मला वाटते, किंवा गॉडने सहा दिवस सतत काम करुन सातव्या दिवशी विश्राम केला, किंवा गॉड सोबत कोणीतरी कुश्ती खेळली आणि त्यास चित केले.

अल्लाहने पाङ्गविलेल्या पैगंबरांविषयी मुस्लिमांना विश्वास आहे की, समस्त मानवजातीपर्यंत ईश्वरीय संदेश पोचविण्यासाङ्गी आणि एक आदर्श निर्माण करण्यासाङ्गी अल्लाहने त्यांची निवड केली. ज्या-ज्या प्रसंगी मानवसमाज एकेश्वरवादापासून दूर होतो आणि अनेकेश्वरवाद, मूर्तीपूजा वगैरेकडे वळतो तसेच नैतिक व चारित्रिक पतन होत असते, तेव्हा त्यांच्या सुधारणेसाङ्गी पैगंबरांना पाङ्गविण्यात येते.

हे पैगंबर वा प्रेषित परिपूर्ण मानवतेचे आदर्श उदाहरण ठरतात. अल्लाहने पाठवलेले पैगंबर गंभिर दुष्कर्मात लिप्त असतील, हे मुस्लिम कधीही स्वीकारु शकत नाही. मात्र बायबल मध्ये त्यांना गंभिर अपराध करताना दाखविण्यात आले ही बाब इस्लामी शिकवणींच्या पूर्णतः विरुद्ध आहे. बायबलमधील अशा विडंबणात्मक शिकवणी म्हणजे आकाशीय ग्रंथांत मानवीय हस्तक्षेपाचा परिणाम होय.

## ज्यू (यहुदी)

अनेकदा मुस्लिम ज्यूंना आपले बंधू म्हणतात. कारण इब्राहीम पैगंबर हे त्यांचे सुपुत्र इस्माईल पैगंबरांच्या माध्यमाने मुहम्मद पैगंबरांचे पूर्वज आहेत. त्याचप्रमाणे इस्त्रायल पैगंबर (याकूब पैगंबर) आणि त्यांच्या संततीचे इसहाक पैगंबरांच्या माध्यमाने इब्राहीम पैगंबर पूर्वज आहेत. इब्राहीम पैगंबरांची पत्नी साराह ही वृद्धास्थेपर्यंत निःसंतान होती. नंतर तिच्या पोटी इसहाक जन्मले. मात्र यापूर्वीच इब्राहीम पैगंबरांनी हाजेरा नावाच्या महिलेशी विवाह केला होता. हिच्या पोटी इस्माईल यांचा जन्म झााला. कुरआनानुसार इब्राहीम पैगंबरांची परीक्षा घेण्यासाठी आणि आपली योजना पूर्ण करण्यासाठी अल्लाहने त्यांना इस्माईल पैगंबरांचे बलीदान देण्याचे आदेश दिले. भलीदानाकरीता इब्राहीम पैगंबरांनी जे स्थान निवउले होते, ते स्थान कित्येक शतकांनंतर मक्का शहराच्या रुपात विकसित झाले. याच ठिकाणी अंतिम पैगंबर मुहम्मद यांचा जन्म घेतला. इब्राहीम पैगंबरांनी याच ठिकाणी आपली पत्नी हाजेरा आणि मुलास या ठिकाणी बसविले होते.

अन्नपाणी संपल्यावर इसमाईल या मुलास भूक तहाण लागली तेव्हा हाजेरा पाण्याचा शोध घेत इकडे तिकडे धावत होती आणि लहान मूल पाय घासत होते. याच ठिकाणी पाण्याचा झरा सुरु झाला आणि यालाच जम-जम असे म्हणतात. याच ठिकाणी आपले सुपुत्र इस्माईल यांना सोबत घेऊन इब्राहीम पैगंबरांनी अल्लाहची बंदगी करण्यासाठी जगातील पहिली मस्जिद बांधली. यालाच पवित्र काबा असे म्हणतात. इब्राहीम पैगंबरांची पत्नी सारा ही गर्भवती झाली आणि इसहाक पैगंबर जन्मले इसहाक पैगंबरांचे पुत्र याकूब पैगंबर झाले. यांनाच इस्त्रायल असेही म्हणतात. यांना एकूण बारा पुत्र झाले.

ज्यू आणि ख्रीस्तींचा एक मोठा वर्ग इस्माईल पैगंबरांना इब्राहीम पैगंबरांची वैध संतान मान्य करीत नसल्याने मुस्लिम किंबहुना नाराज आहेत. बायबलवर

आधारीत ग्रंथांमध्ये हाजेरा हिला इब्राहीम पैगंबरांच्या पत्नीबरोबरच साराची दासी म्हटलेले आहे (जेनेसिस १६-३). माझ्याकडे उपलब्ध 'किंग जेम्स वर्जन'१ या शब्दकोषातून इस्माईल पैगंबरांचे नावाच वगळण्यात आलेले दिसते. त्यांना शोधण्यासाङ्गी मला इब्राहीम या शब्दाचा वापर करावा लागला. 'टाइम ॲण्ड अगेन जेनेसिस' (१६-१६, १७-२३, २५, २६, २१-११) मध्ये सुद्धा इस्माईल यांना इब्राहीमचे पुत्र म्हटले गेले असल्याने पिता-पुत्राचे नाते नाकारता येत नाही.

शिवाय इस्त्रायलच्या पुत्रांच्या मातेचा शोध घेतला असता 'जेनेसिस' मध्ये असे आढळून आले की इस्त्रायल यांनी आपल्या नात्यातील दोन बहिणी रशेल आणि लीह यांच्यासह त्यांच्या दोन सहायिका जिल्पाह आणि बिल्हाह बरोबर लग्न केले होते. या चार स्त्रियांपासून एकूण बारा पुत्र झाले. अद्यापपर्यंत तरी निदान कोणत्याही आधारावर कोणीही इस्त्रायल यांच्या बारा पुत्रांच्या पैकी कमी संख्या असण्याचा दावा केला नाही. तेव्हा निश्चितच इस्माईल यांच्याप्रती पक्षपात करण्यात आला.

'जेनेसिस'(२२-२) मध्ये या संबंधी अल्लाहने इब्राहीम पैगंबरांना म्हटले की, आपला हा पुत्र इसहाक घ्या, ज्याशी तुम्ही खूप प्रेम करता. याला तुम्ही मोरयाच्या धरतीवर घेऊन जा आणि अग्नीत याचा बळी द्या. यासंबंधी मुस्लिमांना असे वाटते की या ङ्गिकाणी जाणून बुजून इसहाक यांचेच नांव समोर करण्यात आले. त्यावेळी केवळ इसहाक हेच त्यांचे पुत्र नसून (जेनेसिस १७, २४-२६ नुसार) ते इस्माईल पेक्षा तेरा वर्षांनी लहान होते आणि इब्राहीम पैगंबरांच्या मृत्युवेळी दोघे पुत्र जीवंत होते.

इब्राहीम पैगंबरांचे परीक्षेत सफल होणे, अल्लाहच्या पती पूर्ण समर्पण आणि अल्लाहच्या आदेशावर आपले एकुलते पुत्र इस्माईल यांचे बलीदान देण्यासाङ्गी तयार होण्यास्तव मुस्लिम दरवर्षी समारोहपूर्वक हजच्या स्वरुपात आङ्गवण साजरी करतात. अर्थातच ज्यू आणि ख्रीस्ती धर्मियांपमाणे दूजाभाव न करता इसहाक आणि इस्माईल यां दोन्हींचा समान आदर जगातील मुस्लिम करतात.

कुरआनात जवळपास पन्नास ङ्गिकाणी ज्यूंचा अर्थात इस्त्रायलच्या वंशजांचा उल्लेख करण्यात आलेला आहे. शिवाय मूसा पैगंबरांचा १३७ वेळा उल्लेख करण्यात आलेला असून तौरात ग्रंथाचा १८ वेळा उल्लेख आढळतो. त्यांच्यावर स्तुतींचा वर्षाव करण्यात आलेला असून बऱ्याच ङ्गिकाणी तंबी सुद्धा करण्यात

आलेली आहे. याची खाली उदाहरणे देण्यात आलेली आहेत;

‘हे इस्त्रायलच्या वंशजांनो !’ माझा तो अनुग्रह स्मरण करा जो मी (अल्लाहने) तुम्हास प्रदान केला होता, त्या दिवसाचे भय बाळगा जेव्हा कोणीही कोणाची मदत करु शकणार नाही आणि शिफारसही करु शकणार नाही व ती स्वीकारलीही जाणार नाही. तसेच कोणातर्फेच कोणासाङ्गी अर्थदंड स्वीकारला जाणार नाही; कोणाचीही मदत प्राप्त होऊ शकणार नाही.

‘आङ्गवण करा तो प्रसंग जेंव्हा आम्ही (अल्लाहने) तुम्हास फिर औनी अत्याचारींकडून मुक्ती देवविली, जेथे तुम्हास अत्यंत क्रूर यातनां देत होते; तुमच्या पुत्रांना ङ्घार करीत आणि मुलींना जीवंत ङ्केवीत असे. यात तुमच्या पालनकर्त्या तर्फे कङ्गोर परीक्षा होती. आङ्गवण करा तो प्रसंग’. आङ्गवा तो प्रसंग जेव्हा आम्ही (अल्लाहने) समुद्रात वेगवेगळे रुंद रस्ते तयार करुन तुम्हांस मुक्ती दिली आणि फिरऔन्यांना तुमच्या डोळयांदेखत समुद्रात बुडविले. आङ्गवा तो प्रसंग जेव्हा आम्ही मूसा पैगंबरांना चाळीस रात्रींचा वायदा करुन थांबवून घेतले आणि त्यांच्या अनुपस्थितीत तुम्ही वासराची पूजा करु लागलात, (अशारितीने) तुम्ही अत्याचरी झाले. मग एवढे होऊन सुद्‌धा आम्ही तुम्हांला यासाङ्गी क्षमा केली की तुम्ही कृतज्ञता दाखवाल. (२, ४७-५२)

‘‘आणि आम्ही इस्त्रायलच्या संततीस उत्तम आणि सन्मानजनक ङ्गिकाण दिले व त्यांना चांगली उपजीविका प्रदान केली. मग त्यांनी त्याप्रसंगी विभेद केला, तेही त्यांच्याकडे ज्ञान असून सुद्‌धा. निश्‍चितच तुमचा पालनकर्ता अंतिम निवाड्याच्या दिवशी तुम्ही विभेद करण्यासंबंधी निर्णय देणार.’’ (कुरआन १०, ९३)

ही बाब उल्लेखनीय आहे की, ज्या-ज्या प्रसंगी ज्यू धर्मियांना अल्लाहच्या आदेशाचा अनादर केला, त्या-त्या प्रसंगी कुरआनाने त्यांना तंबी केली. बायबल मध्ये सुद्‌धा (२ किंग्स, १७, ७-२३) ज्यूंना अल्लाहच्या आदेशाची पायमल्ली करणारे असल्याचे म्हटले गेले. ख्वारे पाहता कुरआनाने सामान्य ज्यूं धर्मियांना वा एखाद्या विशेष धार्मिक समुदाय वा वंशाच्या लोकांना कधीही लक्ष्य केलेले नाही. मूर्तीपूजक व विधर्मीयांच्या काळात ज्यूंनी दीर्घकालापर्यंत एकेश्‍वरवादी धर्म पाळला. ख्रीस्ती धर्म आणि इस्लामच्या आगमनानंतर एकेश्‍वरवादावर ज्यूंची एकाधिकारशाही संपुष्टात आला

इस्लाम कोणत्याही एखाद्या विशिष्ट वंश निवडीचे मुळीच समर्थन करीत नाही. कुरआनात अल्लाहने वर्ण वैशिष्ट्य वा विशेष वर्ण श्रेष्ठत्वाचे खंडण करीत म्हटले, ''हे मानवांनो, आम्ही (अल्लाहने) तुम्हांसर्वांना एका पुरुष व एका स्त्री पासून जन्माला घातले आणि मग तुम्हाला विविध बिरादरी व कबिल्यांचे स्वरुप दिले, जेणे करुन तुम्ही परस्परांना ओळखावे. वस्तुतः अल्लाहच्या दृष्टीकोनात सर्वांत जास्त प्रतिष्ठित व्यक्ती ती आहे जी सर्वांतजास्त अल्लाहचे भय बाळगते.'' (कुरआन ४९, १३) चांगल्या वा वाईट कर्मांच्या आधारावर माणुस व समाज चांगला वा वाईट असु शकतो. अर्थातच एखाद्या विशेष परिवारात वा वर्ण व वंशात जन्म घेतल्याने माणुस वा तो समाज श्रेष्ठ होऊ शकत नसून उत्तमोत्तम चारित्र्य, चांगले कर्म, माणुसकी, न्यायनिष्ठा, सत्यसमर्पण यांसारख्या बाबीं माणसाच्या श्रेष्ठत्वाची कसोटी वा खरे पमाण होय. कुरआनात अल्लाहने इब्राहीम पैगंबरांना जे वायदे केलेले आहेत, त्यांपैकी अनेक ठिकाणी म्हटले आहे की, ''आठवा तो प्रसंग जेव्हा इब्राहीमची परीक्षा त्याच्या पालनकर्त्याने घेतली, तेव्हां ते परीक्षेमध्ये उत्तीर्ण झााले. तेव्हा (अल्लाहने) त्यास म्हटले, मी तुला समस्त मानवजातीचा पेशवा बनविणार आहे.'' इब्राहीम पैगंबर म्हणाले, माझी संतती सुद्धा पेशवा असेल का ? अत्याचारींसाठी माझे कोणतेही अश्वासन नाही. (कुरआन ०२, १२४).

अरब आणि इस्त्रायलींदरम्यान पॅलेस्टाइनसंबंधी सुरु असलेला संघर्ष याच दूरस्थ वचनास अत्याधिक महत्व देण्यामुळे निर्माण झालेला आहे, जो बायबल मध्ये अल्लाहने दिलेले आहे की, मी तुला आणि तुझ्या वंशजांना सुद्धा कनानचा हा संपूर्ण प्रदेश, ज्यात तु परदेशी सारखा राहतोस, तो अशा तऱ्हेने प्रदान करणार आहे की, तो प्रदेश युगान युगे पिढयान् पिढ्या त्यांची खाजगी भूमी असेल आणि मी त्यांचा उपासक असेल. (जेनेसिस १७, ८) या अवास्तव समस्येचे मूळ हेच आहे की ज्यू हे इब्राहीम पैगंबरांचे एकमेव वंशज आहेत, असे ज्यू मानतात.

या आधारावर अधिकांश ज्यूं असे मानतात की पॅलेस्टाईन देशात राहण्याचा अधिकार केवळ ज्यूंनाच आहे. मात्र वस्तुस्थिती अशी की गेल्या शंभरवर्षापूर्वीच पॅलेस्टाईन देशात प्रामुख्याने मुस्लिम व ख्रीती राहत व अल्पसंख्येत ज्यूं सुद्धा होते. तेव्हां पूर्ण शांतता होती. नंतरच्या काळात वर्तमान इस्त्रायलची स्थापना करणाऱ्या जॉयोनिस्ट याने बहुसंख्य अरबांना पॅलेस्टाईनच्या बाहेर काढले.२ शिवाय इस्त्रायल पैगंबरांच्या त्या पीढ्या ज्यांनी ख्रीस्ती वा इस्लाम

धर्म स्वीकारला, ते स्वयंमेव सुद्धा इस्त्रायलच्या 'लॉ ऑफ रिटर्न' नुसार पॅलेस्टाईनच्या प्रवाहातून बाहेर झाले. वस्तुतः ते सुद्धा इस्त्रायल पैगंबरांचेच वंशज आहेत. (अर्थातच इसहाक पैगंबरांचे पुत्र आणि इब्राहीम पैगंबरांचे नातु म्हणजे पुत्राचे पुत्र याकूब पैगंबर, अथवा इब्राहीम पैगंबरांचे प्रथम पुत्र इस्माईल यांचे वंशज असून यां मुस्लिमांना व ख्रीस्तींना दुसऱ्या दर्जाचे नागरीक समजण्यात येते अथवा त्यांना पॅलेस्टाईनच्या बाहेर काढण्यात येत आहे).

घोल्डा मायर ने म्हटले की, पॅलेस्टाईनचे मुळातच अस्तित्व नाही.३ तसेच ज्यूइश नॅशनल फंडचे पूर्व प्रमुख जोसेफ वेज याने म्हटले की, आपल्या देशात दोन समूदाय असूच शकत नाही.४ अशा नेत्यांच्या या घोषणां गेल्या अनेक शतकांपासून पॅलेस्टाईन मध्ये राहत असलेल्या मूळ नागरीकांना मान्य होऊ शकत नाही.

मुस्लिमांच्या दृष्टीकोनानुसार पॅलेस्टाईनची समस्या धार्मिक नसून दोन समुदायांदरम्यानचा तिढा आहे. इब्राहीम पैगंबरांच्या पीढ्यतील तीन्ही धर्मांनुसार हा तिढा शांतीपूर्ण सोडविण्याची गरज व्यक्त केली जात आहे. शिवाय दीर्घ कालीन तोडगा काढण्यासाङ्गी न्याय व पारदर्शितेची गरज आहे. एका शक्तीशाली आणि एका अत्यंत दुर्बल पक्षादरम्यान दीर्घ कालीन तोडगा निघणे खूप कङ्गिण आहे. कोणत्याही विशिष्ट प्रकारच्या मानसिकतेच्या अधीन राहून निघणारा तोडगा हा निश्चितच अन्यायकारक असणार आणि हे समजण्यासाङ्गी दूरदृष्टीची गरज आहे.

इब्राहीमी धर्म शृंखलेतील तीन्ही धर्मांशी निगडीत असलेल्या पॅलेस्टाईन नांवाच्या या भूमीवर शांती आणि सौहार्द नांदावे अशी आमची प्रांजळ इच्छा आहे. कोणत्याही प्रकारच्या भेदभाव व अशांतीने मुक्त ही भूमी असावी. थीन्ही धर्मीयांत सहिष्णुता, सहनशीलता आणि एकेश्वरवादाच्या अनुयायांतील असणारे बंधुत्व कायम असावे. सर्वच धर्मीयांनी अल्लाहच्या आवाज अनुभवण्यासाङ्गी आपला आत्मा शुद्धीवर ङ्केवावा.

इतिहासात मुस्लिम आणि ज्यूंच्या दरम्यान अनेकदा संबंध बिघडले आणि चांगले सुद्धा होत गेले. मात्र इस्लामने कधीही ज्यू धर्माप्रती द्वेष बाळगला नाही. शिवाय मुस्लिम शासनकाळात ज्यूंवर अत्याचार झाले नाहीत. या उलट ख्रीस्तीयूरोप मध्ये होलोकास्ट सहित ज्यूंना प्रचंड यातना भोगाव्या लागल्या. ख्रीस्ती धर्माने तर ज्यूंना 'किल्लर्स ऑफ गॉड' ङ्करवून असंख्येवळा त्यांचा

नरसंहार केला. अनेकदा तर मुस्लिम द्वेषापोटी ख्रीस्तींनी ज्यूंना ठार केले.

यूरोप मधील पहिल्या क्रूसेड युद्धाप्रसंगी हजारोंच्या संख्येत ज्यूंना ख्रीस्तींनी ठार केले. यावेळी ज्यूंना मुस्लिमांनीच अश्रय दिला. 'पौवार्त्य भागातील ईश्वराच्या शत्रुंशी लढण्यासाठी आम्ही जबरदस्त तयारी केली असून आमचे शत्रु ज्यू हेच आमचे लक्ष्य आहे. सर्वप्रथम आम्हांस त्यांचा नायनाट करावयाचा आहे,५ अशा भ्रामक तर्कांचा ख्रीस्ती धर्मीयांनी आधार घेऊन ज्यूंच्या रक्ताने पृथ्वी लाल केली.'

इ.सन १४९२ मध्ये फर्डीनेंड व इजाबेला यांनी स्पेनमधील मुस्लिम शासन नष्ट केल्यानंतर ज्यूंना सुद्धा तेथून बाहेर काढण्यात आले. सुरुवातीस दिले गेलेले वचन पायदळी तुडवून मुस्लिमांबरोबरच ज्यूंना धर्माचे पालन करण्यावर बंदी घातली. कॅथोलिक धर्म न स्वीकारल्यास ठार मारण्याची शिक्षा देण्यात येऊ लागली. अशा बिकट परिस्थितीत असंख्य ज्यूंनी तुर्कस्थानात आश्रय घेतला. तुर्कीमध्ये त्यावेळी इस्लामी खिलाफतचे शासन होते.

तुर्कीच्या खलीफाने फर्डीनेंड आणि इजाबेलांची थट्टा उडवली आणि ज्यू शरणार्थींचे स्वागत करीत म्हणाला, ''त्यांनी आपले राज्य दरिद्री बनवून माझा देश समृध्द केला.'' स्पेन मध्ये इस्लामी शासनकाळात ज्यूंनी तेथील संस्कृती खूप समृद्ध केली. याचे सर्वात मोठे उदाहरण मैमोनिउस होय. तो कोरडोवाच्या इस्लामी दर्शन शास्त्रज्ञ 'इब्ने रुश्द' याचा शिष्य होता. नंतर तो इजिपतला पोचला आणि क्रूसेड वॉरचा मुस्लिम नायक सुलतान सलाहुद्दीन याचा निजी चिकित्सक झाला.

इस्त्रायली विचारवंत, इतिहासतज्ञ आणि माजी परराष्ट्र सचिव एब्बा ईबन यांनी त्यांच्या 'माय प्यूपल्स'६ मध्ये (या पुस्तकातील आशय टी.व्ही. च्या कार्यक्रमांत सादर करण्यात आला.) लिहिले की, ज्यूंच्या इतिहासात दोनच प्रसंगी प्रामाणिकपणा दाखविण्याच्या संधी मिळाल्या. प्रथम इस्लामी शासनकाळातील स्पेन आणि दुसरे वर्तमान संयुक्त राज्य अमेरिकेत. इस्लामी राज्यांत वा इस्लामी देशांत गेल्या अनेक शतकांपासून सुरक्षित जीवन जगत आहेत, स्वतःचा विकास करीत आहेत. आजही अनेक इस्लामी देशांत ज्यूंची मोठी संख्या आहे. मात्र त्यांना कोणत्याही प्रकारचा त्रास नाही.

**ख्रीस्ती** :

या ग्रंथात मरयम (मेरी) ची चर्चा करा, जेव्हां ती आपल्या परिवारजनांशी विभक्त होऊन एक पौर्वात्य स्थानाकडे गेली. मग त्यांच्यापासून तिने पर्दा केला. तेव्हा आम्ही (अल्लाहने) तिच्याकडे आपला फरिश्ता पाङ्गविला. थो तिच्या समोर मनुष्याच्या रुपात प्रकट झाला. तेव्हा ती उद्‌गारली, मी तुझ्याकडून सुरक्षित होण्यासाङ्गी अल्लाह रहमानची सुरक्षा इच्छिते. झर तु अल्लाहचा आदेश पालक आहेस तर येथून निघून जाशील. यावर फरिश्ता उत्तरला, ''मला तुझ्या पालनकर्त्याने पाङ्गवले. यासाङ्गी की, तुला नेकी आणि चांगुलपणा लाभलेला पुत्र द्यावा.'' यावर ती उत्तरली, ''मग कोणत्याही पुरुषाने स्पर्ष सुद्‌धा केला नाही, मग मला पुत्रप्राप्ती कशी होईल ?'' ''असेच होईल, तुझ्या पालनकर्त्याने सांगितले, हे माझ्यासाङ्गी सहज आहे असे होण्याचे कारण हे की, अल्लाह या घटनेच्या माध्यमाने लोकांसाङ्गी एक निशानी बनविणार आणि त्याच्याकडून एक दया असेल. या गोष्टीचा निर्णय झालेला आहे.'' मग तिला गर्भ राहिला आणि ती दूर एका अज्ञात स्थळी निघून गेली.

शेवटी तिला प्रसवयातना होऊ लागला आणि ती एका खजूराच्या झाडाखाली गेली, म्हणु लागली, ''मी मेले असते तर बरे झाले असते आणि कोणी माझी आङ्गवण केली नसती.'' तेव्हा तिला साद आली, ''शोक करु नकोस, तुझ्या पालनकर्त्याने तुझ्याजवळच पाण्याचा स्त्रोत प्रवाहित केला. तु खजूराच्या झाडाला हलव. तुला खाण्यासाङ्गी पवित्र खजूरी पडतील.''

आता या खजूरी खा, पाणी पी आणि आत्मा शांत कर. णग जर एखाद्या माणसाने तुला पाहिले तर त्याला सांग, मी तर माझ्या पालनकर्त्याच्या प्रसन्नतेखातर वृत घेतले आहे. म्हणून मी आज कोणाशीच काही बोलणार नाही.'' मग ती आपले मूल घेऊन समाजात परतली. समाजाचे लोक तिला म्हणाले, ''हे मरयम (मेरी)! तु तर मोङ्ग्या नवलाचे कृत्य केलेस, हे हारुनच्या भगिणी, तुझा पिता तर वाईट चारित्र्याचे नव्हते आणि तुझी आई व्यभिचारीनी नव्हती ।''

याप्रसंगी तिने आपल्या अर्भकाकडे बोट दाखविले. लोक म्हणु लागले, ''आम्ही या अर्भकाशी कसे काय बोलु शकणार, ते तर पाळण्यातले छोटेसे अर्भक आहे.'' तेव्हा ते अर्भक बोलु लागले, ''मी अल्लाहचा बंदा (आदेश पालक) आहे. त्याने मला मार्गदर्शक ग्रंथ प्रदान केला आणि मला प्रेशित नियुक्त केले. शिवाय

मला बरकत दिली. णी ज्या ङ्गिकाणी असेल मला नमाज आणि जकातची आज्ञा देण्यात आली, आणि हे मी जीवंत असेपर्यंत असेल. णला त्याने आईचे अधिकार पूर्ण करणाऱ्याच्या स्वरुपात जन्माला घातले आणि मला उद्दाम व द्रोही बनविले नाही. सलाम असो त्या दिवसावर ज्या दिवशी माझा जन्म झाा आणि ज्या दिवशी माझा मृत्यु होईल आणि ज्या दिवशी मला परत जीवित करुन उङ्गविले जाईल''. (कुरआन १९, १६-३३)

अशा स्वरुपात कुरआनात येशु मसीह पैगंबराचे वर्णण कुरआनात आहे. कुरआनात ईसा (येशु) पैगंबरांचा उल्लेख 'जीसस' म्हणून २५ वेळा, 'मसीहा' म्हणून ११ वेळा आणि माता मरयम (मेरी) च्या एकुलते एक पुत्र म्हणून २ वेळा उल्लेख करण्यात आला आहे. शिवाय माता मरयमचा उल्लेख ३४ वेळा आलेला असून आपल्या पावित्र्याचे रक्षण करणारी पवित्र स्त्री म्हणून उल्लेख आलेला आहे.

**मोङ्गमोङ्गे विचारवंत, विशेषज्ञ आणि विशेषतः** ख्रीस्ती पुरोहित व फादर्स जेव्हा इस्लाम आणि मुस्लीमांना ख्रीस्तांचे अर्थात येशु पैगंबरांचे शत्रु व हाडवैरीच्या स्वरुपात दाखवितात, तेव्हा मुस्लिमांच्या आश्चर्याची सीमा उरत नाही. आम्ही मात्र जेंव्हा सर्वसामान्य ख्रीस्तींना सांगितले की, सैदधांतिक मतभेद असून सुद्ध्दा मुसिलम येशू मसीह यांचा किती आदर व सन्मान करतात, तेव्हा त्यांना सुद्धा खूपच नवल वाटले.

इस्लाममध्ये ईसा (येशू) पैगंबरांचा आणि माता मरयम (मेरी) चा किती आदर सन्मान आहे, याची कुरआनातील काही उदाहरणे खाली देत आहोत, तेव्हढी पुरेशी ङ्करतील.

''आङ्गवा तो प्रसंग जेंव्हा फरिश्त्यांनी म्हटे, ''हजे मरयम, अल्लाह तुला एका गोष्टीची शुभवार्ता देत आहे, ती शुभवार्ता म्हणजे मसीह, मरमयपुत्र इसा विषयी होय. तुझा हा पुत्र ऐहिक आणि पारलौकिक जीवनात प्रतिष्ङ्गित आणि अल्लाहच्या निकटवर्तीयांत असेल. (कुरआन, ०३-४५).

मरयम पुत्र हा इतर कोणीही नसून तो केवळ अल्लाहचा रसूल (प्रेषित) आहे. त्याचा एक लिमा आहे, जे मरयम (मेरी) कडे पाङ्गवण्यात आला होता. त्याच्या कडुन एक रुह (अल्लाहचा आदेश) आहे. (कुरआन, ०४-१७१)

आणि ती नारी जिने आपल्या सतीत्वाचे रक्षण केले होते, आम्ही (अल्लाहने)

तिच्यात आपली रुह फुंकली आणि तिला व तिच्या पुत्राला जगासाङ्गी एक निशाणी बनविली. (कुरआन, २१-९१)

ज्यू आणि ख्रीस्तींच्या दरम्यान असलेल्या दृष्टीकोनात मोङ्गी तफावत दिसून येते. या संबंधी मात्र मुस्लिमांची आस्था अशी की येशू मसीह हे सच्चे पैगंबर ज्यूं वंशियात आलेले आहेत. कुरआनात म्हटले आहे की, ''हे ईमानधारकांनो, अल्लाहचे सहाय्यक व्हा, जसे मरयमपुत्र ईसा मसीह पैगंबरांनी त्यांच्या साथिदारांना सांगितले होते, ''अल्लाहकडे लोकांना सादर घालण्यासाङ्गी मला साथ देणारे कोण आहेत.....'' तेव्हा साथीदारांनी प्रतिसाद देत म्हटले, ''आम्ही आहोत अल्लाहचे सहाय्यक''. मग इस्त्रायल यांच्या संततीपैकी एका गटाने ईमान स्वीकारला आणि एका गटाने विद्रोह केला.

ज्या लोकांनी ईसा (येशू) पैगंबरांना नाकारले आणि त्यांच्या मातेवर लांछन लावले, त्यां लोकांना कुरआनाने तंबी केली, ती खालील प्रमाणे.

''त्यांनी नाकारल्यामुळे आणि मरयम (मेरी) यांच्या विरुद्ध लांछनास्पद शब्द वापरल्यामुळे तसेच मरयमपुत्र ईसा मसीह यांना ङ्गार मारल्याचा दावा करणाऱ्यांना आम्ही (अल्लाहने) बजावून सांगितले की, तुम्ही त्यांना ङ्गारही मारले नाही आणि सुळावर सुद्धा चढविले नाही, याउलट त्यांना केवळ संभ्रम झाला, शिवाय याबाबतीत ज्यांचे येणे जाणे होते, यां समस्त बाबींमुळे ते संभ्रमित होते.''

केवळ कल्पना करण्याशिवाय त्यांना पर्याय नव्हता. निश्चितच त्यांनी ईसा मसीह पैगंबरांची हत्या केली नव्हती, त्यांना तर अल्लाहने स्वतःकडे उचलले होते. अल्लाह अत्यंत प्रभुत्वशाली व तत्वदर्शी आहे. (कुरआन, ४, १५६-५८) यावरुन कुरआनाने अर्थातच इस्लामने ज्यूंना ईसा मसीह अर्थातच येशूच्या हत्येच्या पापातून मुक्त केले. ख्रीस्तींच्या एका गटाचा यासंबंधी एक असा दृष्टीकोन प्रचलित आहे की, हत्येच्या प्रसंगी ईसा मसीह यांच्या जागेवर इतर एका माणसास सुळावर चढविण्यात आले. हा दुसरा माणुस कदाचित 'जूडास एस्केरियॉट' हा असावा. ईसा मसीह यांना स्वीकार न केल्याबद्दल कुरआनाने ज्यूंना कडव्या शब्दांत फटकारले,

''आम्ही मूसा पैगंबरांना (मार्गदर्शक) ग्रंथ प्रदान केला. त्यानंतर निरंतर रसूलांना (प्रेषितांना) पाङ्गविण्याचा क्रम सुरु ङ्केवला आणि मरयम पुत्र ईसा

मसीह यांना निशाण्या दिल्या आणि पवित्र आत्म्याद्वारे त्यांना शक्ती प्रदान केली. तेव्हां हेच घडले की, ज्या प्रसंगी एखादा प्रेषित तुमच्याकडे मार्गदर्शन घेऊन येतो, जे तुमच्या मनाला आवडणारे नसते, तेव्हा तुम्ही अहंकाराने आकडून बसता. एका समूदायास तुम्ही नाकारले, खोटे ठरविले तर दुसऱ्यास ठार करीत आले ? (कुरआन १०२-८७)

मुस्लीमांची धारणा व विश्वास असा आहे की ईसा मसीह हे अल्लाहच्या आदेशावर चालत होते. कुरआनाने म्हटले, "जेव्हा अल्लाह म्हणेल, हे मरयमपुत्र ईसा! तुमच्यावर आणि तुमच्या मातेवर आम्ही केलेल्या अनुग्रहाची आठवण करा जेव्हा आम्ही (अल्लाहने) पवित्र आत्म्याच्या माध्यमाने शक्ती प्रदान केली, तुम्ही बालपणी पाळण्यात सुद्ध लोकांशी बोलत होते आणि मोठे झाल्यावर सुद्धा आठवा तो प्रसंग जेव्हा मी तुम्हांस ग्रंथ, ज्ञान आणि तौरात व इंजील प्रदान केले होते."

"आठवा तो प्रसंग जेव्हा माझ्या आज्ञेने तुम्ही मातीचा पक्षी तयार करीत आणि त्यांत फुंकर मारीत व ते पक्षी आमच्या आदेशाने उडत असे. तुम्ही माझ्या आज्ञेने अंध आणि कोडग्रस्तांना चांगले करीत. माझ्या आज्ञेने मृतास जीवंत करीत असे. आठवा तो प्रसंग जेव्हा इस्त्रायली लोकांसमोर तुम्ही माझ्या स्पष्ट निषाण्या घेऊन जात, तेव्हां ते तुम्हाला नाकारत होते, तेव्हां आम्ही तुमचे रक्षण करीत होतो. त्याप्रसंगी ते तुम्हाला म्हणत, हे तर जादू आहे." (कुरआन ०५-११०).

कुरआनाने ईसा मसीह यांच्या सच्च्या अनुयायांची प्रशंसा सुद्धा केली असून यांत मुहम्मद पैगंबरांच्या काळापर्यंतचे अनुयायी सामिल आहेत.

मग तयांच्यानंतर त्यांच्या पदचिन्हांवर आम्ही इतर प्रेषितांना पाठविले व त्यानंतर मरयम (मेरी) यांचे पुत्र ईसा मसीह पैगंबर यांना पाठविले आणि त्यांना इंजील हा ग्रंथ प्रदान केला. ज्या लोकांनी त्याचे अनुसरण केले, त्यांच्या ऱ्हदयात आम्ही (अल्लाहने) करुणा आणि दया निर्माण केली. (कुरआन ५७-२७)

"इमान धारण करणाऱ्यांच्या साठी सर्वात जास्त जवळचे मित्र ते असतील जे 'आम्ही नसारा आहेत' असे म्हणतात. कारण की, त्यांच्यात बरेच जण धर्मज्ञानी आणि संसारत्यागी संत आढळतात म्हणूनच ते अहंकार करीत नाहीत." (कुरआन ०५-८२)

आता आपण मुस्लिम आणि ख्रीस्तींमध्ये असलेल्या मतभेदांवर चर्चा करुया. यांत सर्वात जास्त महत्वपूर्ण हा की मुस्लिम माता मरयम हिला पवित्र आणि कुमारी असल्याचे मान्य करतात. अल्लाहने ईसा मसीह यांना पित्याविना जन्माला घातले आहे.

मुस्लिमांची आस्था आहे की, अल्लाह अशा प्रकारच्या शारीरिक चित्रांकनापासून मुक्त आहे. कुरआनात म्हटले आहे, ''तो अल्लाह निस्पृह, निरपेक्ष व सर्वाधार आहे. त्याने स्वतःच्या शरीराने कोणासही जन्म दिला नाही आणि त्यासही कोणी जन्माला घातले नाही. कोणीही त्याच्या समकक्ष नाही.'' (कुरआन ११२, ०१-०४) ईसा मसीह अर्थात येशु ख्रीस्त हे शारीरिक रुपाने अल्लाहचा पुत्र आहेत, अशी आस्था ङ्केवणे इस्लामला मुळीच मान्य नाही. अलंकारीक भाषेमध्ये आपण असे म्हणू शकतो की, आपण सर्वच अल्लाहची लेकरे आहोत.

मदरमेरी ही गॉडची माता आहे, ख्रीस्ती धर्मातील अशा पकारचा सिद्धांत देखिल इस्लामला मान्य नाही. इस्लामने माता मरयम (माता मेरी) आणि ईसा मसीह (जीजस) यांना खरा सन्मान दिला. जीजस हे पिताविनाच जन्मलेले आहेत हे वास्तव आहे. इस्लामी सिदधांतानुसार जीजस यांना निश्चितच जन्माला घातले,ख्मात्र शारीरिकरित्या नसून केवळ स्वशक्तीने निर्माण केले आहे. कुरआनात म्हटले की, ''निश्चितच अल्लाहच्या दृष्टीत ईसा मसीह पैगंबरांचे उदाहरण आदम पैगंबरांसारखे आहे, ज्यांची निर्मिती अल्लाहने मातीपासून केली, मग म्हटले, निर्मण हो, तेव्हा ते निर्माण होते (कुरआन ०३-५९)

ईसा मसीह (जीजस) यांनी सुद्धा कधीही त्यांच्या मातेबाबत असा दावा केला नाही की त्या पैगंबर आहेत, असे कुरआनाने मत मांडले आहे, ते असे, ''आङ्गवा तो पसंग जेव्हा अल्लाह प्रश्न करील, हे मरयमपुत्र ईसा ! अल्लाहच्या व्यतिरिक आणखीन दोघांची अर्थात तुमची आणि तुमच्या आईची उपासना करावी, असा लोकांना तुम्ही उपदेश केला होता का ?'' तेव्हा ते उत्तरतील, ''तु महिमावान आहेस. असा उपदेश करणे माझ्यासाङ्गी शक्यच नाही, ज्याचा मला मुळीच अधिकार नाही. मी जर असा उपदेश केला असता तर मला तर माहित असते. हे अल्लाह, जे काही माझ्या मनात आहे, ते तुला माहितच आहे. मात्र जे तुला माहित आहे, ते मला नाही. गुप्त बाबींचे निःसंदेह तुला पूर्ण ज्ञान आहे, ज्या गोष्टींचा तु आदेश दिला, केवळ त्यांच गोष्टींचा मी

उपदेश केला की, अल्लाहची बंदगी करा, जो माझाही पालनकर्ता आहे आणि तुमचाही पालनकर्ता आहे.''

जोपर्यंत मी त्यांच्यात होतो, त्यांची खबरगिरी करीत होतो. मग मला (जगातून) तु उचललेस तेव्हा नंतरच्या काळात तूच त्यांचा निरिक्षक होता. तु प्रत्येक बाबीचा साक्षिदार आहेस. झर त्यांना यातना द्यायच्या असतील तर दे, शेवटी ते तुझे बंदेच तर आहेत आणि जर क्षमा करशील तर तु निश्चितच प्रभुत्वशाली व तत्वदर्शी आहेस.'' (कुरआन, ०५, ११६-१८)

अशा बाबतीत मुस्लिम ईसा पैगंबरांच्या हवाल्याने न्यु टेस्टामेंट मधील आयतींचा उल्लेख करुन भूमिका मांडतात की, ईसा मसीह पैगंबरांनी त्यांना म्हटले, 'मला चांगला का म्हणता? ईश्वराव्यतिरिक्त कोणीही चांगला नाही.'' (मार्क, १०,१८)

न्यु टेस्टामेंटनुसार जेव्हा ईसा मसीह (जीजस) हे सुळावर होते, तेव्हा त्यांनी प्रार्थना केली होती, ''एलोई-एलोई, लामा सबाखतानी?'' अर्थात, माय गॉड, माय गॉड, तु मला का त्यागलेस ? (मार्क, १५, ३४). निश्चितच ते स्वतः व्यतिरिक इतर कोणाविषयी चर्चा करीत होते.

अशा पकारे तीन गॉड संबंधीच्या धारणेस इस्लाममध्ये कोणतेही स्थान नाही ... तीन म्हणू नका, अशा गोष्टींपासून परावृत्त व्हा. अल्लाह तर केवळ एकमेव पूज्य आहे. (तीन म्हणणे) हे तर त्याच्या महानतेच्या विरुध्द आहे, त्याचा कोणीही पुत्र नाही. आकाश आणि धरतीमध्ये जे काही आहे, ते सर्व त्याच्याच मालकीचे आहे. (कुरआन ०४, १७१). निश्चितच अल्लाहची शाश्वत सत्ता तीन भागात विभाजित व्हावी, हे मुस्लिमांना मुळीच पटणारे नाही किंवा ईसा मसीह (जीजस) हे दैवी रुप आहे, हे सुद्धा पटणारे नाही. मुस्लिमांना वाटते की, जीजसने असे कधीही म्हटले नाही की, एका ईश्वरीय सत्तेमध्ये तीन दैवी व्यक्तित्व सामिल आहेत.

त्यांनी तो सदैव आपल्या पूर्वापार येत असलेल्या पैगंबरांप्रमाणेच ईसा मसीह यांनाही पैगंबर मानतात आणि त्यांच्या शिकवणीनुसार एकाच अल्लाहची बंदगी (उपासना) करण्याची शिकवण दिली. याशिवाय ट्रिनिटीच्या धारणेच्या प्रारंभिक काळातील ख्रीस्तीधर्म सुद्धा ईसा मसीह (येशू) च्या अनुयायांना माहित नव्हता. ट्रिनिटीची धारणा असलेला नंतरचा म्हणजेच आजच्या

काळातील ख्रीस्ती धर्म इ.सन ३२५ मध्ये सम्राट कॉस्टेनटाइल याच्या काळात कॉग्रेस ऑफ निकेयाने आदेश देऊन रोमन साम्राज्यात प्रस्थापित केला. दि न्यू कॅथॉलिक इनसायक्लोपीडीया८ मध्ये आहे की, चौथ्या शतकापूर्वी अर्थातच या काळापूर्वी तीन जणांचा गॉड हे सुत्र ख्रीस्ती धर्मातही नव्हते व त्याकाळातील ख्रीस्ती धर्मीयांतही नव्हते. याचा अर्थ ट्रिनिटीची धारणा ईसा मसीह (जीजस) यांच्या नंतर तब्बल ३२५ वर्षानंतर ख्रीस्तीधर्मात निर्माण झाली तोपर्यंत ही धारण आस्थेशी संबंधीत नव्हती.

या दोनही समूदायांत 'ओरिजिनल सिन' विषयी देखिल मतभेद आहे. बायबलनुसार सैतानाने हव्वाला वर्जित फळ खाण्यासाङ्गी फूस लावली आणि मग हव्वाने आदम यांना फूस लावली आणि मग पाप घडले. या पापाची शिक्षा म्हणून त्यांना स्वर्गातून बाहेर काढण्यात आले आणि पृथ्वीवर पाङ्गविण्यात आले.

बायबलच्या या कथनानुसार माता हव्वाला या घटनेची प्रमुख अपराधी ङ्करविण्यात आलेले आहे. जेनेसिस (३, १६) मध्ये म्हटले गेले की, ''मग तो स्त्रीला म्हणाला, मी तुला गर्भवती होण्याची यातना देऊन तुझे दुःख वाढवणार बाळंतपणाच्या प्रसंगी तुलजा असह्य पसववेदना देईन, तेव्हा कुङ्के तुला मूल जन्मेल. तसेच तु पतीकडे आकर्षित होशील आणि त्याचे मात्र तुझ्यावर प्रभुत्व असेल.'' यानुसार ख्रीस्ती धर्मीय भूमिका अशी आहे की, सर्वच मानव या पापात भागिदार आहेत आणि प्रत्येक नवजात पाप घेऊनच जन्माला येतो.

या संबंधी कुरआनाने अशी भूमिका मांडली की, सैतानाने आदम आणि हव्वा या दोघांना फूस लावली आणि दोघांनीही चूक केली. त्यावर त्यांना खूप पश्चात्ताप झाला. त्यावर दोघांनाही अल्लाहने क्षमा केली. हाच 'ओरिजिनल सिन' चा शेवट होय. (कुरआन, ०७-२०, ०२-३७)

झगातील प्रथम पुरुष आदम (याच शब्दापासून आदमी हा शब्द निर्माण झाला आहे) यांना अल्लाहने पैगंबरी (प्रेषितत्व) बहाल केली आणि याबरोबरच या जगामध्ये आदम यांना अल्लाहने आपला नायब (प्रतिनिधी) म्हणून नियुक्त केले. यामुळे सैतानाने मानवाला पाप-कर्मामध्ये लिप्त करण्याची शपथ घेतली. मात्र अल्लाहने सुद्धा निश्चय केला की, जे लोक माझ्या आदेशाने विमुख होणार नाही, त्यांना मार्गदर्शन देण्यात येईल आणि नेहमी सैतानाच्या कुरापतींपासून सतर्क करण्यात येईल. प्रत्येक माणुस पापमुक्त जन्माला येत असतो. मात्र नंतर

जीवनामध्ये माणुस चांगले वा वाईट कर्म करतो. हीच कुरआनाची भूमिका असून असेही म्हटले गेले की, पाप हा काही परंपरागत वारसा नसतो. माणुस हा निर्दोष आणि स्वतंत्र व आपले अधिकार घेऊन जन्माला येतो.

प्रत्येकास आपल्या कर्माचा जाब द्यावा लागणार आहे आि जो सरळ मार्गावर असेल, तो यशस्वी होईल आणि वाईट मार्गावर असेल तर त्याला शिक्षा नक्कीच होईल. त्यास इतर कोणीही जवाबदार नसेल आणि त्याच्या पापाचे ओझे इतर कोणीही उचलु शकणार नाही. शिवाय मार्गदर्शक पाङ्गविल्याशिवाय अल्लाह कोणालाही जवाबदार ङ्खरवून यातना देत नाही. (कुरआर १७-१५)

ईसा मसीह (जीजस) यांना इतर जणांच्या वाईट कर्माची शिक्षा मिळाल्याचा ख्रीस्तींचा दावा इस्लामने फेटाळून लावलेला असून इस्लाम इतरांच्या पापांची शिक्षा दुसऱ्यास देण्याच्या भूमिकेस नाकारतो. पापांपासून मुक्त होण्यासाङ्गी इस्लामने कङ्गोर प्रायश्चित्त आणि पुण्य कर्म व अधिकारांच्या जोपासनेचा मार्ग निवडला आहे. यातून अल्लाहची प्रसन्नता लाभते आणि माणुस पापमुक्त होतो. यासाङ्गी कोणालाही रक्त सांडण्याची कवडीमात्र गरज नसते. मात्र जे लोक सर्रास अपराध करतात आणि यावर त्यांना पश्चात्ताप होतो व अल्लाहच्या प्रसन्नतेसाङ्गी ते परत अपराध न करण्याचा पक्का निश्चय करतात व अल्लाहसमोर स्वतःला समर्पित करुन क्षमा याचना करीत म्हणतात, अल्लाह शिवाय कोण आहे जो आमचे अपराध माफ करील आणि आपल्या अपराधी वृत्तीवर हट्ट अडून बसत नाहीत (कुरआन, ०३-१३५)

इस्लामने अशी भूमिका मांडली की, कोणताही अपराध हा अल्लाहच्या दयेपेक्षा मोङ्गा नसतो. कुरआनात म्हटले आहे की, ''हे माझ्या बंद्यांनो (उपासकांनो) ! ज्यांनी स्वतःवर अत्याचार केले, त्यांनी अल्लाहच्या दयेपासून निराश होऊ नये निश्चितच अल्लाह क्षमादाता आहे. (कुरआन, ३९-५३) मुहम्मद पैगंबरांनी म्हटले की, ''अल्लाहने म्हटले, तुम्ही आदमची संतती असून तुम्ही पाप करुन माझ्याकडे येतात, मग पश्चात्ताप करता आणि मला साद घालता, माझ्याबरोबर इतर कोणासही सामिल करीत नाही, तेव्हा मी तुम्हांस माफ करतो. तेव्हा मी तुमच्याशी तुम्हाला क्षमा देण्याकरीता जवळीक साधतो.

ईसा मसीह (जीजस) यांच्या रक्ताने आपण केलेल्या पापाचे प्रायश्चित्त करणे आणि मग विशेष निवडलेल्या वा चयनित समूदायात स्वतःला सामिल करणे (अर्थात गॉड कडून विशेष सवलती प्राप्त करणे) असे विचार इस्लामला

मान्य नसून क्षमाप्राप्ती करीता मुस्लिम केवळ अल्लाहवरच अवलंबून आहेत. क्षमाशील होणे हा सर्वोत्तम गुणधर्म आहे. हा इस्लामचा मूळ स्वभाव गुणधर्म आहे. एवढेच नव्हे तर दोन पक्षांदरम्यान न्याय करताना एका पक्षाला जेव्हा कायद्याने शिक्षेचा निर्णय देतो, तेव्हा सुद्धा इस्लामने क्षमाशीलतेस महत्व दिले. कुरआनात म्हटले आहे की, ''वाईट कर्माला शिक्षा व्हायलाच पाहिजे मात्र जर त्यास शिक्षेऐवजी क्षमा केली आणि पापीस चांगले जीवन जगण्याची संधी दिली तर याचा उत्तम मोबदला अल्लाह कडून मिळेल. (कुरआन, २४-२२)

''शिक्षेची मागणी करण्याऐवजी क्षमा करावी आणि झालेली चूक माफ करावी. याच्या मोबदल्यात अल्लाहने तुम्हाला क्षमा करावी अशी तुमची इच्छा नाही का ?'' (कुरआन, २४-२२)

इस्लामने शिकवण दिली की, कोणतीही व्यक्ती, कोणत्याही प्रसंगी क्षमा योचनेसाङ्गी अल्लाहशी सरळ संपर्क साधु शकेल. यासाङ्गी तिला कोणाच्याही मध्यस्थीची गरज नसतेच मुळी. प्रत्येकजण मग स्त्री असो की पुरुष, आपल्या निर्मात्याशी संपर्कात असून ज्या ज्या प्रसंगी क्षमाप्राप्तीसाङ्गी तो याचना करतो, तेव्हा अल्लाह त्यास प्रतिसाद देतो आणि क्षमा करतो.

आपल्या पापांचा स्वीकार करण्यासाङ्गी आणि त्याचे प्रायश्चित्त करण्यासाङ्गी माणसाला कोणत्याही विशिष्ट स्थळावर जाण्याची गरज नाही. 'जा पुत्रा ! मी तुला माफ करतो !' अशा शब्दांना इस्लाम मध्ये कोणतेही स्थान नाही. क्षमाशीलता वा क्षमादानावर अल्लाहचा एकमेव अधिकार आहे, अर्थात एकाधिकार आहे. या अधिकारावर इतर कोणासही कोणतीही भूमिका घेण्याचा, व्यक्त करण्याचा अधिकार नाही. मुळात इस्लाममध्ये कोणत्याही प्रकारच्या पुरोहितवादी संस्थेला मुळीच वाव नाही. यात धर्मवेत्ते असले तरी पुरोहित नसतात. अल्लाहची कृपा अपार असून तो निश्चितच न्यायदाता व कृपाशील आहे, याची प्रत्येकालाच आशा असावी.

पाप, चुका आणि अपराधांवर आपल्याला घोर पश्चात्ताप व आत्मक्लेष व्हावा आणि स्वच्छ व निर्मळ अंतःकरणाने पाप वा दुष्कर्म परत न करण्याचा पक्का निश्चय करावा. केवळ क्षमा याचना करुन चालणार नाही. नसता माणुस पाप करीत राहील आणि परत क्षमा मागतच राहिल व हे सुरुच राहणार. कोणी तुमचे जर पैसे चोरले आणि परत करण्यास नकार देऊन अल्लाहकडे क्षमा

याचना करीत असेल, एकदा नव्हे, लाखोवेळा माफी मागत असेल आणि म्हणत असेल की अल्लाह मला माफ कर तर ते कसे शक्य होईल ?

हे सैद्धांतिक मतभेद क्षुल्लक नसून कानाडोळा करण्यासारखी ही बाब नाहीच. मात्र या विषयावर हमरीतुमरीवर येणे आणि परस्पर द्वेष बाळगणे सुद्धा मुर्खपणाचे ङ्घरेल. धार्मिक आस्था व मान्यतांशी संबंधीत चर्चा आणि वाद विवाद करताना उच्च दर्जाची नैतिकता व सहिष्णुता असणे अत्यावश्यक असते. या विषयी कुरआनाने म्हटले की, ''आपण (दोन्ही पक्ष) अशां गोष्टीवर ईमान (आस्था) वा विश्वास ङ्धेवतो जी तुमच्यावरही अवतरित झाली आणि आमच्यावरही अवतरित झाली. तसेच तुमचा आणि आमचा अर्थात आपणा दोहोंचा पूज्य एकच आहे व आपण सर्व त्याचेच आज्ञाधारक आहोत.'' (कुरआन, ०३-६४)

ख्रीस्तीधर्मीय आणि मुस्लिमांमध्ये गंभीर मतभेद असले तरी या दोन्ही धर्मात असलेल्या समान बाबींच्या आधारांवर दोन्ही पक्षांनी या दोनही धर्मीयांनी सहिष्णुतापूर्ण आणि बंधुत्वाच्या वातावरणात एकमेकांशी ऐक्य प्रस्थापित करावे, अशीच इस्लामची तीव्र व प्रांजळ इच्छा आहे. कुरआनाने म्हटले, ''हे ग्रंथधारकांनो ! एका अशा विषयाकडे या जो तुमच्या व आमच्या दरम्यान समान मान्यताप्राप्त आहे, तो विषय असा की आपण अल्लाहच्या व्यतिरिक्त इतर कोणाचीही उपासना करु नये आणि त्याच्याबरोबर कोणासही भागिदार ङ्घरवू नये तसेच आपल्यापैकी कोणीही अल्लाह व्यतिरिक्त कोणासही आपला पालनकर्ता स्वीकारु नये.'' (कुरआन, ०३-६४)

वरील मजकूरात आपण दोन्ही धर्मांत सैद्धांतिक मतभेदांवर चर्चा केली. यानंतर मुस्लिम आणि ख्रीस्तींच्या भौगोलिक आणि राजकीय इतिहासावर सुद्धा थोडक्यात आढावा घेणे योग्यच होईल. अंतिम पैगंबर मुहम्मद यांच्या काळात जगात दोन महाशक्तीं अस्तित्वात होत्या. पूर्वेस पर्शियन साम्राज्य आणि पश्चिमेस रोमन साम्राज्य. पर्शियन हे अग्निपूजक तर रोमन हे ख्रीस्ती होते. तेव्हा स्वाभाविकरित्या मुस्लिमांची सहानुभूती ख्रीस्तींबरोबर होती. दोन्ही महाशक्ती दरम्यान होत असलेल्या भयंकर युद्धरम्यानच्या काळात उदयास येत असलेल्या इस्लामने ख्रीस्तींचा दारुण पराभव पाहिला. मात्र कुरआनाने ख्रीस्तींच्या विजयाची भविष्यवाणी करताना म्हटले, ''ते (ख्रीस्ती) झालेल्या पराभवातून लवकरच उभे राहतील, अगदी अवघ्या काही वर्षांतच. आदेश

तर पूर्वीही आणि नंतरही केवळ अल्लाहचाच आहे. त्या दिवशी ईमानधारक (ख्रीस्ती) अल्लाहच्या मदतीने प्रसन्न होतील. (कुरआन, ३०, ०२-०५) कुरआनाची ही भविष्यवाणी तंतोतंत खरी ठ्ठरली.

बऱ्याच वर्षानंतर या दोन्ही महाशक्तींच्या पार्श्वमध्ये इस्लामने अरबप्रायद्वीप मध्ये एका सशक्त राज्याच्या रुपात राजकीय शक्ती निर्माण केली. दोन्ही महाशक्तींना हे मोठ्ठे संकट वाटू लागले. ही शक्ती दुबळी करण्यासाठ्ठी आपल्या शासित अरबांना या शक्तींविरुद्ध भडकाऊ लागल्या. ऩंतर प्रचंड मोठ्ठे लष्कर तयार करुन अतिषय ऊग्र स्वरुपाचे सशस्त्र युद्ध इस्लामी शासनाविरुद्ध छेडले. शस्त्र आणि लष्करीबळ कमी असून सुद्धा इस्लामी सत्तेने या दोन्ही महाशक्तींना धूळ चारली.

पूर्वेतील पर्शियन साम्राज्याचा अस्त होत गेला आणि तेथील जवळपास सर्वच जनतेने न्यायनिष्ठ्ठा पाहून इस्लामची छत्रछाया स्वीकारली. याबरोबरच पश्चिमेत रोमन साम्राज्याच्या सीमा अकुंचन पावत गेल्या आणि एका शतकापेक्षाही कमी कालावधीत एक बहुलवादी इस्लामी साम्राज्य जवळपास निम्म्या जगावर स्थापित झाले. आपल्या सीमा सतत विस्तारीत जाणाऱ्या इस्लामी साम्राज्याने इस्लामी सभ्यतेचे उत्कृष्ट दर्शन घडविले आणि केले. ग्रीक बौद्धिक संपदेवर होणाऱ्या चर्चच्या विध्वंसकारी हल्ल्यापासून रक्षण केले. इस्लामी संस्कृती व सभ्यतेने ज्ञान-विज्ञानाच्या असंख्य क्षेत्रांत कमालीची प्रगती केली. यात वैद्यकीय शास्त्र, रसायन शास्त्र, भौतिक शास्त्र, गणित, बिजगणित, अलजेब्रा (अलीजेब्रा हा अरेबी शब्द असून याचा सर्वप्रथम शोध मुस्लिमांनीच लावला) संगित, दर्शनशास्त्राचा समावेष आहे. याच बरोबर धर्मशास्त्र, भाषाशास्त्र, साहित्य वगैरे क्षेत्रातही महत्वपूर्ण कार्य केले. विशेषबाब अशी की या सभ्यता व संस्कृतीच्या डोळे दिपावणाऱ्या विकासात जात, वंश वा प्रादेश्किता सारख्यां आधारांवरील असणारे कोणतेही मतभेद नव्हते आणि सर्वांचाच सहभाग होता.

अत्यंत अंधकारमय असलेल्या युगातून बाहेर येत असलेल्या तत्कालीन यूरोपला त्यावेळी मोठ्ठा धक्का बसला जेव्हां त्याने पाहिले की ही नवोदित इस्लामी संस्कृती मानवीय मस्तिष्कावर कोणत्याही प्रकारच्या (धार्मिक अगर इतर कोणत्याही प्रकारच्या) सेंसरशिपशिवाय सतत प्रगती पथावर होती. विज्ञानाची भाषा अरेबी होती. तत्कालीन विद्यापीठ्ठांमध्ये मुस्लिम प्राध्यापक होते. पुढील अनेक शतकांपर्यंत तेथे मुस्लिम लेखकांच्या ग्रंथांचे अध्यापन

होत होते. ग्रीक दर्शन शास्त्रज्ञांच्या माध्यमाने यूरोपचा परिचय सुद्धा अरेबी भाषेतील अनुवादातून झाला. ऩंतर छपाईतंत्र विकसित झाले आणि त्याकाळातील बहुसंख्य प्रकाशने अरेबीतून अनुवादित होत असे.

मुस्लिम साम्राज्याला जेव्हा उतरती कळा लागली तेव्हा प्रतिशोधाच्या अग्नीत पूर्वीपासूनच होरपळत असलेल्या यूरोपने पलटवार केला. पौर्वात्य देशांत कूसेड वॉर आणि पाश्चिमात्य देशांत फर्डिनेंड व इसाबेलाच्या इस्लामी स्पेन वर विजय मिळवून यूरोपने आपली जुनी प्रतिशोधाची आग थंड करण्याचा प्रयत्न केला. ख्रीस्ती धर्मीयांनी चर्चवर विश्वास न ङ्घेवणाऱ्यांविरुद्ध सरळ सरळ मोहीम उघडली आणि यानुसार स्पेनमधून मुस्लिमांना व ज्यूंना संपविले. अशा तऱ्हेने नविन विश्वाचा शोध लावण्याच्या मार्गात मोङ्गा अडसर निर्माण करण्यात आला आणि विजेत्यांनी राजसत्तेच्या छत्रछाये खाली दासप्रथेची स्थापना केली.

कूसेड वॉर हे सरळ सरळ महत्वपूर्ण इस्लामी स्थानांवर ताबा मिळविण्यासाङ्गी होते. मात्र याला धार्मिक निमित्त असे देण्यात आले की, ख्रीस्तीधर्मीयांचे पवित्र स्थळ येरुशलेमला मुस्लिमांच्या ताब्यातून मुक्त करावयाचे आहे. हे युद्ध दोन शतकांपेक्षाही जास्त काळापर्यंत सुरु होते. या कूसेड वॉरने एका नविन धार्मिक उन्मादास जन्म दिला. हाच द्वेषो भरलेला उन्माद आजही पाश्चिमात्य देशांच्या मानगुटीवर बसलेला आहे. बऱ्याच प्रमाणात आजही पाश्चात्य संस्कृती या विद्वेषाने प्रभावित आहे. मुख्य प्रवाहातील ख्रीस्ती मात्र आजकाल याचा विरोध करताना दिसतात. हे केवळ भांडवलशहांची मोङ्गी कुरापत आहे, असे त्यांना वाटते. या कुरापतीच्या कचाट्यात ख्रीस्ती धर्म सापडला असून लांछनास्पद कृत्ये धडत आहेत, याची त्यांना जाणिव आहे.

'कूसेड' हा शब्द (क्रिया आणि संज्ञेनुसार) एका अद्भूत शब्दाप्रमाणे भाषेत स्थापित झाला आणि भावनांच्या तळाशी लागला. पुरोहीत आणि सामान्य प्रकारचे देखिल अनेक ख्रीस्ती धर्मीय व त्यांच्याबरोबरच आपण सुद्धा हे मान्य करतो की, आत्म शोध व स्वसन्मानासाङ्गी कूसेड विषयी ख्रीस्ती धर्माने पुनर्विचार करावयास हवा. कारण यापूर्वी सुध्दा स्पेन मधून मुस्लिमांना संपविण्याविषयी आणि जर्मन होलोकास्ट संबंधी पुनर्विचाराचा भूमिका घेण्यात आलेली आहे. कूसेड युद्धासंबंधीचे वास्तव बाहेर काढणे हे जागतिक व्यवस्था स्थापन करण्याच्या दिशेने एक क्रांतीकारक पाऊल सिद्ध होईल. दोन्ही धर्मीयांच्या जवळपास प्रत्येकी शंभर कोटींच्या समुदायांत परस्पर सामंजस्य

निर्माण होईल. शिवाय या क्रांतीकारी पाऊल उचलल्याने धर्मयुद्धासारख्या छद्म धार्मिक आवरणामागून होणारे हल्ले सुद्धा बंद होतील.

धर्मयुद्धासंबंधी चर्चा करण्याची माझी मुळीच इच्छा नाही. यांऐवजी मी काही ख्रीस्ती लेखकांची उदाहरणे सादर करणे पसंत करतो. यांपैकी येरुशलेमवर ताबा मिळविण्यासाठी झालेल्या प्रथम धर्मयुद्धाचा अहवाल खूप बोलका आहे. एका धर्मयोद्ध्याच्या अहवालात त्याने म्हटले, ''नंग्या तलवारी घेऊन आमचे शिपायी पूर्ण शहरात हौदोस घालत होते. जीवाचा आकांत करीत दयेची भीक मागणाऱ्यांना सुद्धा लष्कराने मोठ्या क्रूरतेने ठार केले. तुम्ही तेथे असता तर पायाच्या घोट्यापर्यंत रक्तात बुडालेले असता. यापेक्षा आणखीन काय सांगता येईल ! येरुशलेमवासीयांपैकी कोणासही जीवंत सोडण्याची परवानगी नव्हती. सैन्याने निष्पाप लहान मुले आणि महिलांना सुद्धा जीवंत सोडले नाही. ज्यां घोड्यांवर स्वार होऊन आम्ही नरसंहार करीत होतो, त्या घोड्यांचे पाय गुढग्यापर्यंत रक्ताने माखलेले होते. हा 'गॉड' चा अद्भूत न्याय होता.'' हा अहवाल १५ जुलै १०९९ रोजीचा आहे.

याच्या एका शतकानंतर १२०२ साली चौथे क्रूड वेनिस युद्ध सुरु झाले. रस्त्यात ख्रीस्तींचे क्षेत्र कॉन्टॅनटिनोपाल लागले. या शहरास धर्मयोद्ध्यांनी पूर्णतः उदध्वस्तकरुन टाकले. हा विध्वंस एवढ्या ऊग्र स्वरुपाचा होता की, स्वतः पोपने लष्कराला फटकारले आणि संदेश पाठविला की, ज्यांचे तुम्ही रक्त सांडले ते तुमचे शत्रु नसून ख्रीस्ती बंधू होते. हे शहर येरुशलेम नसून कॉन्स्टॅटिनोपाल होते आणि यावरच तुम्ही विध्वंसाची तलवार उगारली. तुमच्या मनमस्तिष्कावर स्वार असलेल्या हा स्वर्गाचा मार्ग नव्हता, हा तर केवळ धरतीवरचा रस्ता होता. हा विध्वंस तुमच्या धर्मानुसार पुण्यकर्म मुळीच नव्हता. तुम्ही विवाहित महिलां, विधवा आणि नन्सना सुद्धा जीवंत सोडले नाही. तुम्ही चर्च सारख्या सुरक्षित स्थळांना क्षती पोचविली, पवित्र वस्तुं चोरल्या, संतांच्या असंख्य प्रतिमा आणि चित्रे नष्ट केली. हे अत्यंत आश्चर्यकारकच आहे की ग्रीकचर्चला तुमच्यात सैतानाचे दर्शन घडले.'' विध्वंसाचे हे नग्न तांडव धर्मयोद्ध्यांनी ख्रीस्ती कॉन्स्टॅटिनोपाल मध्ये माजविले. जेव्हा स्वधर्मीयांबरोबर एवढे क्रौर्य या धर्मयोद्ध्यांनी दाखविले, तेव्हा मुस्लिम 'विधर्मीयांबरोबर' त्यांनी काय केले असेल, याची केवळ कल्पनाच काळजाचे तुकडे करते.

मुस्लिमांसंबंधीचा ख्रीस्तींचा दृष्टीकोन बदलत असल्याचा आधूनिक संकेत

अतिशय महत्वपूर्ण ठ्ठरेल. मुस्लिम आणि ख्रीस्तीदरम्यान सामंजस्य निर्माण होण्यात हा दृष्टीकोन खूपच आशादायक आहे. कारण पूर्वी धर्मयुद्धया प्रारंभाची घोषणा करणारा पोप अरबन पवित्र द्वीतीय याने १०९५ साली मुस्लिमांना 'ईश्वरविहिन लोक, मूर्तीपूजक, येशूचे वैरी, कुत्रे, नरकाग्नीचे इंधन' सारख्या शिव्या दिलेल्या आहेत. यावरुन याचे गांभिर्य लक्षात येते.

दुसरीकडे पोप पॉल क्र.६ यांच्या अधीनस्थ इन्सायक्लिकल 'नोस्ट्रा एटेट' (१९६५) हे मुस्लिमांना मात्र वेगवेगळया दृष्टीने पाहतात. त्यांनी लिहिले की, ''मुस्लिमांना सुद्धा चर्च सन्मानाच्या दृष्टीने पाहतो'' पुढे त्यांनी हे देखिल स्पष्ट केले की, ''मुस्लिम हे एका अल्लाहची उपासना करतात, अर्थात त्याच अल्लाहची जो इब्राहीम पैगंबरांचा उपास्य होता. त्यांच्याशी संबंधीत इस्लामी आस्था प्रसन्न आहे. ते अल्लाहच्या उपासनेबरोबरच प्रार्थना आणि दान धर्म सुद्धा करतात. या सोबत ते जीजस आणि त्यांच्या कुमारीमातेचा आदर करतात आणि जीजस यांना अल्लाहचा पैगंबर (संदेशवाहक) मानतात.''

युरोपीयन देशांच्या उपनिवेशवादी धोरणांमुळे धर्मयुद्धांतर यूरोज आणि मुस्लिमांचे संबंध बिघडले आणि प्रथम जागतिक युद्धांतर अनेक इस्लामी देश यूरोपीय उपनिवेशवाद्यांच्या जोखडात सापडले. एका मोठ्ठ्या संघर्षानंतर त्यांना राजकीय स्वातंत्र्य मिळाले आहे. मात्र उपनिवेशवादाने संयुक्त राज्य अमेरिकेच्या नेतृत्वात आता नव उपनिवेशवादाचे घेतलेले सोंग बदलले आहेत. ती (अमेरिका) लष्करी अधिकार मिळविण्या ऐवजी आर्थिक रुपाने ताबा मिळवित आहे.

## संदर्भ :


१. प्रामाणिक किंग जेम्स वर्शन, गेट ब्रीटेन : कोलिंस वर्ल्ड, १९७५.

२. यासंबंधी जीवंत आठ्ठवणीसाठ्ठी चोसर यांचे पुस्तक 'ब्लड ब्रदर्स' (ग्रांड रेपिड्स् : चूज़न (निवडक) बुक्स, १९८४) वाचावे.

३. संडे टाइम्स् (लंदन) १५ जून १९६९, आर गरौडी यांचे पुस्तक 'दि केस ऑफ इजराइल (शॉरॉडक इंटरनॅशनल, लंडन येथून प्रकाशित, १९८३)' पृष्ठ ३७.

४. डावर (इस्त्राईल); २९ डिसेंबर १९६७.

५. 'दि परसूट ऑफ दि मिलेनियम, नॉर्मन कोन्ह; बैम्बर गॅसकोइन यांचा 'दि क्रिश्चियंस' मध्ये समावेश (लंदन, जोनाथन कॅप १९७७) पृष्ठ ११३.

६. एब्बन अब्बा, 'माय प्यपिल', न्यूयॉर्क बेहरमैन, १९६८.

७. ईसा पैगंबरांवर अवतारित झालेला मूळ ग्रंथ 'इंजील', मात्र सध्या हे उपलब्ध नाही. याचे काही भाग 'गोस्पेल' या न्यू टेस्टामेंट मध्ये उपलब्ध आहेत, संपादक.

८. न्यू कॅथॉलिक इंसायक्लोपिडिया, एसवी, दि होली ट्रिनिटी.

९. कोन्ह, नॉर्मन, दि पर्सूट ऑफ दि मिलेनियम बॅबर गॅसकॉइन द्वारे लिखित 'दि क्रिश्चियन्स', लंडन जोनाथन कॅप, ११३.

१०. बॅबर गॅसकॉइन द्वारे लिखित 'दि क्रिश्चियन्स', लंडन जोनाथन कॅप, १७७, ११९.

**प्रकरण चौथे**

# इस्लामचे स्तंभ

इस्लाम एक व्यापक धर्म असून याची परिपूर्ण व्याख्या देशांतील प्रचलित शब्द 'रिलीजन' या शब्दांत सामावू शकत नाही. कारण की इस्लाम धर्म मानवीय जीवनाच्या प्रत्येक प्रभावकारी आहे, मग ते वैयक्तिक असो की सामुदायिक जीवनाशी संबंधीत असो. आपल्या अनुयायांना तो पूर्णरुपाने संबोधीत करतो. यालाच 'शरीयत' असे म्हणतात. शरीयतचे तीन भागांत विभाजन करण्यात आले आहे.... १)इबादत (उपासना), २) नैतिक विधान आणि ३) यांत अनेक प्रावधान ऐच्छिक आहेत. मात्र या तीन्हींदरम्यान कमालीचे गहीरे संबंध आहेत. उदाहरणार्थ सामान्य माणसासाङ्गी जे नैतिक नियम प्रतिपादित करण्यात आले आहेत, तेच नियम सामुहिक नैतिकता सुद्धा असु शकते आणि नैतिकतेचे अस्तित्व कधीही वैधानिक शुण्यात नसते, अर्थात नैतिकतेबरोबर वैधानिक प्रावधान आवश्यक आहे. मानवाचे अंतःकरण आणि बाह्याकरण (कर्म आणि व्यवहार) हे परस्पर विरोधी न होता एकरुप असावे. इबादत करण्याची पदधतच व्यक्तिस घडविते आणि इस्लामच्या वास्तवाचे ज्ञान प्रदान करते.

## शरीयतची सामान्य रुपरेखा

शरीयतचे स्त्रोत

शरीयतचा प्रथम उगमस्त्रोत कुरआन असून हे अल्लाहची वाणी आहे. कुरआनाने समस्त पैलुंवर प्रकाश टाकला आहे. यात असे सिदधांत देण्यात आले आहेत, जे सुरुवातीच्या रांगेपासून सुरु होऊन समूदायाची प्रस्थापना करतात.११ यात उच्चतम नैतिक आदर्शाबरोबरच योग्य व अयोग्य (वर्जित) बाबींची परिभाषा देण्यात आलेली आहे. या आधारावर इबादत (उपासना) चे सिद्धांत आणि संपूर्ण वैधानिक प्रणालीचे स्वरुप स्पष्ट होतो. यांत कौटुंबिक पद्धतीचे कायदे, आर्थिक नियमावली, दंड विधान, सामाजिक व्यवहार,

युद्ध, तह आणि शांततेच्या काळातील नैतिकता, शासन व प्रशासनाच्या स्वभावगुणधर्माचा उल्लेख आहे. हे इस्लामी लोकतंत्राच्या शृंखलेची पहिली पायरी आहे. याबरोबरच शरीयतच्या प्रावधानांमध्ये मानवाधिकार, इतर राष्ट्र आणि धर्मांशी संबंध, उत्तराधिकार, करप्रणाली वगैरे सहित मानवजीनाच्या प्रत्येक पैलुंवर प्रकाश टाकण्यात आला आहे. अर्थातच मानवी जीवनाचा कोणताही पैलु सुटलेला नाही.

कुरआनाने इस्लामी नियमावलीची एक मूलभूत संकल्पना सादर केली. यात आस्था, इबादत (उपासना), कर्म व व्यवहार (आचार-विचार) वगैरेंशी संबंधीत सिद्धांत सादर करण्यात आलेले आहेत. यात अपवादस्वरुप अगदी थोड्या प्रमाणात परिवर्तनासाङ्गी लवचिकता देखिल आहे. परस्पर व्यवहारासंबंधी इस्लामी न्यायशास्त्र अतिशय सहज सोपे असल्याने न्यायशास्त्र अत्यंत प्रगत आहे.

शरीयतचे क्रमांक दोनचे स्त्रोत हे मुहम्मद पैगंबर यांची सुन्नत आहे. यात त्यांचे आदेश व नियम, निषेधात्मक निर्देश, सूचना आणि पैगंबर या नात्याने त्यांनी केलेले कार्य अथवा ज्या कर्म व कार्यास त्यांनी स्वकृती, मंजूरी व परवानगी दिली, त्यास अरेबी भाषेत 'सुन्नत' असे म्हणतात. अनेकवेळा कुरआनातील काही अथवा बऱ्यांच शिकवणींचे ध्येय वा उद्दिष्ट हे सुन्नतच्या आधारावर लक्षात येतात. सुन्नतचे शास्त्र सुदृढ स्वरुपात बहुप्रामाणिक असून यांत मुहम्मद पैगंबरांच्या कथनांचे प्रमाणिकीकरण करण्यात मोङ्गे कष्ट घेण्यात आलेले आहे. हे कार्य तर इतिहासातील एकमेव उदाहरण असावे, विलक्षण स्वरुपाचे उदाहरण असावे, असे जगातील समस्त शास्त्रज्ञांचे मत आहे. यांत निवेदनकर्त्यांपासून ते संवाददात्यांपर्यंत प्रत्येकाची एका विशिष्ट कसोटीवर पारख करण्यात आलेली आहे. विशेषतः हे पाहण्यात आलेले आहे की या सुन्नतचा मजकूर कुरआनाशी सुसंगत आहे की नाही तसेच सामान्य बुद्धीला पटणारे आहे की नाही. अशा प्रकारे 'सुन्नत' च्या शास्त्रास अतिसूक्ष्मता प्रदान करण्यात आलेली आहे.

शरीयतचा तिसरा स्त्रोत हा कुरआन अथवा सुन्नत मध्ये विशिष्ट रुपाने उपलब्ध नसलेल्या बाबी होय. यामध्ये अशां मुद्यांवर चर्चा करण्यात येते ज्यांविषयी कुरआन व सुन्नतमध्ये स्पष्ट मार्गदर्शन उपलब्ध नसते, मात्र मार्गदर्शनाचे सुत्र उपलब्ध असते. यां सुत्रांवरुन मार्गदर्शन मिळविण्यासाङ्गी विवेक व साकल्यपूर्ण

विचाराच्या आधारावर समस्येवर तोडगा काढण्यात येतो. याला 'इज्तिहाद' असे म्हणतात. कुरआन आणि सुन्नतच्या कूळ सुत्राच्या आधारावर धार्मिक, वैज्ञानिक, सांख्यिकी व सामाजिक परिस्थितीनुरुप नियम निश्चित करण्यात येतात. या प्रसंगी सुद्धा कुरआन व सुन्नतशी अनुकूलता तपासण्यात येते.

शरीयतमध्ये मानवहितासाङ्गी वेळप्रसंगी हराम (निषिद्ध) बाबी वैध होत असतात. उदाहरणार्थ एखादा प्रवासी मरुस्थळी, रानावनात भटकलेला असेल किंवा अशा ङ्गिकाणी अडकलेला असेल जेथे अन्नावाचून त्याचा मृत्यू उदभवण्याची शक्यता असेल. तसेच तेथे केवळ वराहाचे मांसच उपलब्ध असेल तर अशा नाजूक प्रसंगी हराम ङ्खरविण्यात आलेले कमीत कमी एवढे मांस खाणे आवश्यक ङ्खरते, ज्यामुळे प्राण वाचु शकतील नसता त्याचा मृत्य हराम (निषिद्ध) ङ्खरेल. या स्वरुपाची आणखीनही बरीच उदाहरणे देता येतील. कारण संकटसमयी माणुसकीचे रक्षण करण्यास शरीयतमध्ये प्राथमिकता देण्यात आलेली आहे. याबाबतीत आणखीन असे की वैयक्तिक हितापेक्षा जनहितास जास्त महत्व देण्यात आलेले आहे. कोणत्याही वैयक्कि असोकी जनहिताचे कार्य असो, ते अल्लाहच्या नेमून दिलेल्या कायद्यानुसारच अर्थात शरीयतनुसारच व्हावे.

## शरीयतचे उद्दिष्ट

सार्वजनिक कल्याण हेच शरीयतचे प्रमुख उद्दिष्ट असून ऐहिक जीवनापासून ते मरणोपरांत पारलौकिक जीवनापर्यंत याचा लाभ मिळत असतो. यासाङ्गी गरजांचे वर्गीकरण अत्यावश्यक गरजा (मूलभूत गरजा) आणि ऐच्छिक गरजां या दोन भागात करण्यात आलेले आहे. शरीयत मध्ये एकूण पांच अनिवार्य आदर्श घालून देण्यात आलेले आहेत ज्याचे प्रमुख उद्दिष्ट मानवजीवनाचे रक्षण होय ते १) जीवन, २) मनमस्तिष्क, ३) धर्म, ४) मालकी व ताबा आणि ५) संतती उत्पत्ती व त्याचे रक्षण. या समस्त बाबींच्या अनेक शाखा निर्माण करण्यात आल्या आहेत. यांचे सूक्ष्म वर्णण सुद्धा देण्यात आले आहे. प्रत्येकासंबंधी उचित नैतिक व वैधानिक नियम सुद्धा देण्यात आलेले आहेत. या गूढ विषयाच्या विभिन्न बिंदुंच्या खोलवर जाण्याऐवजी आपण प्रत्येकी काही आवश्यक उदाहरणांवर चर्चा करुया.

**जीवनाचे रक्षण**

यात सुरक्षापूर्ण जगण्याचा अधिकार देण्यात आलेला असून हकनाक कोणाचे जीवन नष्ट करणे निषिद्ध ङ्करविण्यात आलेली आहे. याबरोबरच धर्मयुद्धात शत्रुपक्षाचे लष्करी जवान वा न्यायिक मृत्यूदंड यास अपवाद ङ्करविण्यात आलेला आहे. रोगावर उपचार करणे, रोगापासून स्वरक्षणाचे उपाय, खानपानाचे नियम, स्वास्थ्य रक्षण, स्वच्छता व शूचिर्भूतता ही यात सामिल आहे. व्यक्तिची आणि शहरातील व रस्त्यासहित वातावरणाची सफाई देखिल इस्लामी सेवा आहे. मुहम्मद पैगंबरांनी म्हटले आहे की, जगात एकही आजार वा रोग असाध्य नसून प्रत्येक रोगाचा इलाज जगात उपलब्ध आहे. ज्या आजारांवर उपचारार्थ संशोधन झालेले नसेल त्यावर संशोधन करण्याचा आदेश देण्यात आलेला आहे. संसर्गजन्य रोगाचा संसर्ग रोखण्यासाङ्गी रोग्यास इतरांपासून दूर ङ्केवण्याचा तसेच महामारीच्या ङ्किकाणच्या लोकांना त्या स्थानापासून इतरत्र स्थलांतर न करण्याचा आदेश देण्यात आलेला आहे.

शरीयतने कृषी विकासाला प्रोत्साहन दिले असून मुहम्मद पैगंबरांनी म्हटले की, १) जर प्रलयाचा प्रसंग असेल आणि हातात झाड लावण्याचे बेणे असले तरी ते झाड लावलेच पाहिजे. प्रलयास घाबरुन झाडे लावणे बंद करु नये. २) शेतीतून उत्पन्न होणारे अन्न माणुस खावो अथवा चोर अगर पशू पक्षी खावो, त्याचे पुण्य शेतकऱ्यास लाभले, ३) युद्धप्रसंगी शेती, वृक्ष आणि पिकांना क्षती पोचविता कामा नये. मुहम्मद पैगंबरांच्या उपरोक्त वचनांमुळे शेती व पर्यावरणाचे महत्व शरीयतमध्ये अधोरेखित होतात. याकरीता पर्यावरणाचे शास्त्र देखिल उद्घृत करण्यात आले असून कुरआनात जलचक्राचा उल्लेख आहे. तसेच पर्यावरणाच्या रक्षणासाङ्गी व प्रदूषण नष्ट करण्यासाङ्गी मुहम्मद पैगंबरांनी (स.) विशेष आदेश दिले आहेत. कोणत्याही प्राण्यास वा पक्ष्यास आहाराच्या गरजेव्यतिरिक्त मारण्याची निषिद्धता सुद्धा याचाच भाग आहे. पशू-पक्ष्यांशी दयापूर्ण व्यवहार करणे आणि त्यांच्या क्षमतेपेक्षा जास्त ओझे त्यांच्यावर लादू नये, ही सुद्धा शिकवण देण्यात आलेली आहे.

**मनमस्तिष्काचे रक्षण**

मानवाचे मनमस्तिष्क हे अत्यंत महत्वपूर्ण आहे. यामुळेच आपल्याला कोणत्याही बाबतीत सत्य-असत्य, योग्य-अयोग्य अगर भल्या-बुऱ्याची ओळख करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. कुरआनाने आपल्या बुद्धीचा वापर न करणाऱ्यांविषयी

नापसंती दर्शविली आहे.

इस्लामनुसार ज्ञानप्राप्ती व संशोधन हे केवळ माणसाचे अधिकारच नसून त्याचे कर्तव्य आहे. मुळामध्ये कुरआनाच्या अवतरणाची सुरुवातच 'वद' या शब्दापासून झालेली आहे. कुरआनाने म्हटले आहे की, ''ज्ञानी व अज्ञानी समान असु शकत नाही.'' तसेच ''अल्लाहचे ते नेक बंदे जानतात आणि ज्ञान प्राप्त करतात. तेच (ज्ञानी) त्याच्या (अल्लाह) कडे ध्यान अधिक ध्यान लावतात.'' वैज्ञानिक अनुसंधान आणि न्यायिक शब्दावली सुद्धा अल्लाहकडूनच अवतरित झाली असल्याचे मानण्यात आले आहे. आणि जे ज्ञानी आहेत, त्यांना अनुसंधानाचे कार्य कर्तव्याच्या स्वरुपात सोपविण्यात आले आहे. या अनुषंगाने वैचारिकतेवर वा बुदधीवर बंधन लावण्यास मनाई करण्यात आलेली असून विचार स्वातंत्र्य देण्यात आलेले आहे. माणसाच्या मन मस्तिष्क आणि विचार क्षमतेवर दबाव वा तनाव आणता कामा नये. मनमस्तिष्कास सुन्न करणाऱ्यां वस्तुं अर्थात मादक पदार्थ, दारु, गांजा वगैरे पदार्थाचे सेवन करणे यासाङ्गीच सक्तीने निषिद्ध करण्यात आलेले आहे.

## धर्म स्वातंत्र्य

इस्लाममध्ये धर्मस्वातंत्र्यास प्राथमिकता देण्यात आलेली आहे. मात्र हे सुद्धा सत्य आहे की, मानसिक एकाग्रता नसेल तर धर्म-कर्तव्ये पार पाडणे शक्य नसते. धर्म स्वातंत्र्य हे केवळ मुस्लिमांनाच नसून बिगर इस्लामी समूदायांना सुद्धा याचे समानाधिकार देण्यात आलेले आहेत. कुरआनाने ही बाब स्पष्ट करताना म्हटले आहे की, ''धर्माच्या बाबतीत कोणावरही कोणतीही बळजबरी नाही.'' (कुरआन, २-२५६) मुस्लिम आणि मुस्लिमेतरांच्या प्रार्थनास्थळ वा पूजास्थहांच्या निर्माणाची इस्लामने सर्वांनाच पूर्ण परवानगी दिली असून त्यात ढवळा-ढवळ करुन वा कुरापती काढून निर्माणात अडसर निर्माण करण्यास इस्लामने अपराध ङ्गरवित मनाई केली आहे.(१२) शिवाय धर्मावर आक्रमण करणाऱ्यास सर्वांनाच स्वसंरक्षणाचा व स्वधर्म संरक्षणाचा समान अधिकार आहे.

## वैयक्तिक मालमत्तेचे वा संपत्तीचे रक्षण

इस्लाममध्ये वैयक्कि मालमत्तेचे रक्षण करण्याचा प्रत्येकास पूर्ण अधिकार आहे. वैध मार्गाने संपत्ती कमावण्याचा सर्वांना अधिकार असून अवैध मार्गाने

अर्थात व्याजाच्या माध्यमाने, चोरी करुन वा लबाडीने संपत्ती प्राप्त करणे निषिद्ध ठरविण्यात आले आहे. व्यापार-वाणिज्य पारदर्शकपणे करुन संपत्ती कमाविण्याचा अधिकार असला तरी यातून 'जकात' म्हणजेच जन-कल्याण निधी देणे अनिवार्य ठरविण्यात आले आहे. वर्षभरातील प्राप्त संपत्तीतून अडिच टक्के जकात देणे अनिवार्य आहे. शिवाय कृषी-उत्पन्न, पशु-पालनातील उत्पन्न रियल इस्टेट वा उद्योगातील उत्पन्नातून जकातीचे वेगवेगळे मानांकन ठरविण्यात आले आहे. प्रत्येक व्यक्तीला आर्थिक स्वातंत्र्य प्रदान करुन त्याचे कल्याण करणे ही सामुदायिक जवाबदारी ठरविण्यात आलेली आहे. समुदायापासून विभक्त होऊन सामुदायिक, कल्याणापासून पळ काढता येणे शक्य नाही.

**वंशाचे संरक्षण**

विधीवत विवाह करुन पीढी जन्माला घालण्याचा वा वंश पुढे सुरु ठेवण्याचा अधिकार व याचे रक्षण करण्याचा अधिकार इस्लामी शरीयत दिला आहे. शिवाय विवाहापासून ते वंशापर्यंत याची नोंदणी करणे सुद्धा अनिवार्य आहे. विवाहपूर्व वा विवाहेतर शरीर संबंध ठेवणाऱ्यास कठोर शिक्षेची तरतूद करण्यात आलेली आहे. कुटुंब नियोजनाची परवानगी असली तरी भ्रूण हत्या केल्यास कठोर शिक्षेची तरतूद इस्लामने केलेली आहे. कारण प्रत्येक जन्म घेणाऱ्या मुलां-मुलींना जगण्याचा पूर्ण अधिकार असून आई-वडिलांच्या संपत्तीत त्यांना वारसा हक्काने वाटा प्राप्त आहे. मूल जन्माला घालणे आणि वंध्यत्व निवारणाचा प्रत्येकास अधिकार आहे. मूल कमीत कमी दोन वर्षाचे होई पर्यंत त्यास स्तनपान आवश्यक आहे.

पाश्चात्य देशांतील रुढ पद्धतीनुसार दत्तक घेण्याची परवानगी इस्लामने सपशेल नाकारली आहे. मात्र अनाथ मुलांच्या पालन-पोषण, शिक्षण व प्रशिक्षणाची जवाबदारी उचलणे सुद्धा अनिवार्य आहे. यानुसार त्यां मुलांना त्यांच्या खऱ्या आई-वडिलांची माहिती देणे अनिवार्य आहे. मात्र हे पारिवारिक बंधनासाठी आवश्यक सुद्धा नाही. जर ही मुले रक्ताच्या नात्याने सख्खे भाऊ-बहिण नसतील तर त्यांच्या परस्पर संमतीने त्यांचे लग्न सुद्धा करावे लागते.

पती-पत्नी, पालक व मुलांचे अधिकार आणि कर्तव्याची विस्ताराने माहिती इस्लामने दिली आहे. कौटुंबिक जवाबदाऱ्या आणि व्यवहार, उत्तराधिकाराचे

सविस्तर नियम, कुटुंबाचे रक्षण, पती-पत्नीच्या जवाबदाऱ्या, पत्नीचे उत्तरदायित्व याचे सविस्तर नियम ङ्करविण्यात आलेले आहेत. महिलांना संपत्ती कमावण्याचा स्वतंत्र अधिकार देण्यात आलेला आहे. तिला आई-वडिलांच्या तसेच सगे-सोयऱ्यांच्या संपत्तीत अनिवार्य वाटा निश्चित करण्यात आलेला असून याबरोबरच शिक्षण व ज्ञानप्राप्तीचा महिलांना पूर्ण अधिकार इस्लामने दिला आहे. इस्लाममध्ये स्त्री व पुरुष समान असून दोघांसाङ्गी कर्म व कृतीसंबंधी शरीयतचे नियम समान आहेत. शिवाय महिलांना बऱ्यांच नियमांतून पुरुषांच्या तुलनेत अतिरिक्त सवलत देण्यात आलेली आहे.

## धर्म सत्त आणि राज्य सत्त

यूरोप मध्ये युद्धाच्या काळात चर्च अर्थात धर्म सत्त आणि राज्यसत्ता परस्पर वेगळया करण्यात आल्या. पाचीन चर्च व्यवस्थेने तेथील जनजीवन कमालीचे प्रभावीत होते. चर्च व्यवस्थेने सर्वसामान्यांना सळो की पळो करुन सोडले होते. वैचारिक स्वातंत्र्य आणि वैज्ञानिक प्रगतीमध्ये धर्मसत्तेने अर्थात चर्चने मोङ्गे अडसर निर्माण केले होते. याची अर्थातच धार्मिक गुलामगीरीची अनेक उदाहरणे इतिहासात उपलब्ध आहेत. मात्र अमेरिकेने नंतरच्या काळात यूरोपातील परंपरागत चर्चची धर्मसत्ता झुगारुन लावली. धर्म आणि आस्थेच्या नावावर लादण्यात आलेल्या गुलामीच्या बेड्या तोडून टाकल्या आणि वैचारिक स्वातंत्र्याचे वातावरण देशात निर्माण केले. यूरोपीयन ख्रीस्तीधर्माच्या अतिरेकास वैतागलेल्या अनेक स्वातंत्र्य व विचार प्रेमी लोकांनी तेथून पळ काढला आणि अमेरिकेत आश्रय घेतला.

चर्च (धर्मसत्ता) आणि राज्यसत्ता परस्पर विभक्त ङ्केवणे ही ख्रीस्ती धर्माची अनिवार्यता आहे, हे आपणां सर्वांनाच माहित आहे. मानव-आत्म्याचे शुद्धीकरण हे उद्दिष्ट यामागे असल्याचे सांगितले जाते. न्यू टेस्टामेंटच्या मते ईसा मसीह यांनी या ऐहिक जीवनाची सत्ता-संपत्ती त्यागून दिलेली आहे, असेही त्यामागील कारण आहे.

एकदा त्यांना प्रश्न करण्यात आला की, सम्राट सीझर याचा सन्मान आवश्यक आहे काय ? यावर ईसा मसीह यांनी सम्राट सीझर याचे चित्र असलेले नाणे पाहून म्हटले की, सीझरला त्याचा अधिकार द्या आणि अल्लाहला त्याचा अधिकार द्या.

अमेरिकेतील मुस्लिम नागरीक सुद्धा धार्मिक स्वातंत्र्य आणि सामाजिक ऐक्याबरोबरच इतर व्यवहारिक लोकांप्रमाणे धर्मांधतेच्या दबावास सहन करीत नाहीत. ही इस्लामची शिकवण सुद्धा आहे.

या ठिकाणी अमेरिकी मुस्लिम, ख्रीस्ती व ज्यूंना भेडसावणाऱ्या समस्येचा उल्लेख करणे सुद्धा येथे गरजेचे आहे. जेव्हापासून धर्म सत्ता आणि राज्यसत्ता पृथक झाले, तेव्हा पासून अमेरिका आणि पाश्चिमात्य मूल्य व व्यवहारामध्ये बदल झाला आहे, असे त्यांना वाटते. याचा दुरुपयोग करुन जागतिक अवमूल्यन करण्यात येत असून सामान्य जनतेच्या जीवनात आवश्यक असलेली धार्मिक व नैतिक मूल्ये नष्ट होत आहेते. गेल्या चार दशकांपासून अमेरिकी माध्यमांमध्ये गॉड मेला की काय, याच मुद्यावर जोरदार चर्चा सुरु आहे. यामुळे अनेकजन प्रभावित झाले. गॉड जीवंत आहे, असे मानणाऱ्यांना वाटते की, गॉडच्याच आदेशाने आपण जीवंत असून त्याच्याच आदेशावर आपला मृत्यू होणार आहे. मग असे असल्याने आपले जीवन आणि राष्ट्राचे आपण काय करणार? पोर्नोग्राफी, अश्लील साहित्य आणि सामाजिक विकृती हा धर्मसत्ता म्हणजे चर्च आणि राजसत्ता हे परस्पर पृथक होण्याचाच परिणाम असल्याचा निष्कर्ष काढण्यात येत आहे. गॉडच्या छत्रछायेत एक राष्ट्र आणि गॉडवर आमचा विश्वास आहे असे ब्रीदवाक्ये आता निरर्थक वाटू लागली. खाही दिवसांत यांचा पूर्णपणे विसर पडेल, असे दिसते.

इस्लामी देशांतील मुस्लिम हे निश्चितच इस्लामी विधीनुसार जीवन जगु इच्छितात. मात्र या बाबीचा पाश्चात्त्यांना खूप हेवा आणि संताप आहे. याचाच परिणामस्वरुपी चर्च आणि राज्यसत्ता पृथक झाल्या असे त्यांना वाटत असते. चर्चा वा धर्माचा प्रभाव वा दबाव सहन न झाल्यानेच यूरोपने धर्मातून पळ काढला आणि स्वैरजीवनाचा मार्ग मोकळा करुन घेतला. मात्र इस्लाम आणि ख्रीस्ती धर्मातील नैतिक व्यवस्थेत मोठ्ठा फरक असल्याने इस्लामी देशात असे घडण्याची सूतराम शक्यता नाही. यासाठ्ठी आपण इस्लामी व्यवस्थेचा आवर्जून अभ्यास केलाच पाहिजे.

इस्लामचा अभ्यास केला तर आपल्या लक्षात येईलच की इस्लाममध्ये धर्म आणि राज्य अर्थात धर्मसत्त आणि राज्यसत्ता परस्पर पृथक करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. तसे नियम सुद्धा इस्लाममध्ये नसून धर्मसत्त आणि राज्यसत्ता ह्या दोन भिन्न बाबीं असण्याचा प्रकारच इस्लाम मध्ये नाही.

त्याचे कारण असे की, ख्रीस्ती धर्मात राज्यसत्तेची कल्पनाच नाही. यामुळे एकदुसऱ्यांवर लादण्यात येणारी, बळजबरी थोपविण्यात येणारी कोणतीही बाब इस्लाममध्ये नाहीच. इस्लाम मध्ये वद्‌वत्ता असली तरी पुरोहितवाद मुळीच नाही. इस्लामच्या विद्‌वानांच्या विशेष पोषाखाला पाहून त्यांचा महिमा जास्त आहे, असे समजण्याची गरज नाही. इस्लामच्या सुरुवातीच्या काळात विशेष पोषाख नव्हते. हे केवळ गुरुजनांची ओळख व्हावी म्हणून नंतरच्या काळात ही प्रथा रुढ झाली. मुळात उच्च विद्याविभूषित असलेल्या एखाद्या व्यक्तिच्या पोषाखाला अगर विशिष्ट पेहरावाला पाहून सामान्य मुस्लिम कधीही प्रभावित हात नसून साधा पोषाख वापरणाऱ्या कोणत्याही व्यक्तिच्या नैतिक आचरण आणि विद्येला तपासून प्रभावित होण्याची मानसिकता इस्लामनेच मुस्लिमांमध्ये निर्माण केली, हे विशेष. धर्माचे ज्ञान मिळविण्यासाङ्गी कोणत्याही विशिष्ट समूदायास विशेष अधिकार इस्लामने दिलेला नाही वा ज्ञानप्राप्तीवर कोणत्याही विशेष व्यक्ति वा समूदायाची ङ्केकेदारी वा एकाधिकारशाही इस्लामने पायाखाली तुडवून समूळ नष्ट केलेली आहे. ज्ञानप्राप्तीवर प्रत्येकास समान अधिकार इस्लामने प्रदान केलेला असून यातूनच पुरोहितवादाच्या आणि पुरोहितांकडून होणाऱ्या धार्मिक व मानसिक शोषणाचा समूळ नायनाट करणे केवळ इस्लामलाच शक्य झाले आहे.

मात्र एवढे असून सुद्‌धा केवळ धार्मिक ज्ञान सत्ता चालविण्यासाङ्गी पुरेसे नसते. या ज्ञानाबरोबरच आधूनिक तंत्र आणि प्रशससनिक जवाबदाऱ्यांचे ज्ञान सत्त चालविण्यासाङ्गी निश्चितच गरजेचे आहे. यावरुन ही बाबही लक्षात घेण्यासारखी आहे की, सत्तेची सुत्रे ही केवळ धार्मिक ज्ञान असल्याच्या आधारावर मुल्ला पंडितांच्या हातात येण्याची शक्यता जवळपास नसतेच.

इस्लामी तत्वांवर नजर टाकल्यास असे स्पष्ट होते की इस्लामी विधान हे विविध कायद्यांचा आधार वा आत्मा आहे. ख्रीस्ती धर्मात धर्मनिरपेक्षतेला अजिबात स्थान नाही. मात्र इस्लाममध्ये यास कमालीचे महत्व आहे. इस्लाम आणि ख्रीस्ती धर्मात सैद्‌धांतिक मतभेद असले तरी इस्लामने ख्रीस्ती धर्मासहित सर्वच धर्मांचे स्वातंत्र्य अबाधित व सुरक्षित ङ्केवले आहेत.

इस्लामी राष्ट्र असो की ख्रीस्ती राष्ट्र असो, आपले विचार व सिद्‌धत इतर धर्मीयांवर बळजरी थोपविण्याचा कोणासही अधिकार नसतो. तरी देखील यूरोप मध्ये असे कहाी दिसत नाही. तेथे मुस्लिमांना स्वतःच्या धर्माचे पालन

करण्याच्या मार्गात अनेक अडचणी निर्माण करण्यात येतात व याचे समर्थन धर्मनिरपेक्ष तानाशाही व धार्मिक तानाशाही दोघेही करतात. स्वतःला इस्लामी अधिकार आणि मानवाधिकाराचे रक्षक असल्याचे शिरोमणी मिरवित असतात तर दुसरीकडे इस्लामी आचरणाच्या मार्गात कुरापती करीत असतात. स्त्री पुरुषांना आधारभूत स्वातंत्र्य देणे आणि लोकांचे सरकार लोकांसाङ्गी चालविणे हीच इस्लामी शासनाची खरी ओळख आहे. मात्र अशा स्वरुपाचे सध्यातरी कोङ्गेही सरकार अस्तित्वात दिसत नाही, ज्यात इस्लामचा प्रतिनिधी शासनाच्या रुपात सादर करता येणे शक्य व्हावे. ज्या-ज्या प्रसंगी एखाद्या देशात कधीतरी लोकशाही मार्गाने इस्लामी विचारसरणीवर आधारीत पक्षाला विजय मिळतो, त्या-त्या प्रसंगी मोङ्ग्या लोकशाही देशांची अभद्रयुती अस्तित्वात येते आणि क्षणार्धातच तेथील तानाशाही शासन ही लोकशाही प्रक्रिया संपुष्टात आणते. ळोकांनी निवडून दिलेल्या या इस्लामी पक्षाला स्वतःची बाजू मांडण्याची संधी सुद्धा दिली जात नाही. प्रजातांत्रिक देश सुद्धा आपल्या देशाची परिस्थिती सुधारण्याच्या विरुध्द दिसून येतात हे मोङ्गे दुर्दैवच म्हणावे.

इस्लामी देशांत सुद्धा तेथील नागरीक इस्लामी सिदधांतांवर शसन चालविण्याची जेव्हा मागणी करतात, तेव्हा त्या विरुद्ध ख्रीस्ती आणि ज्यूंच्या अल्पसंख्याकत्वाचा मुद्दा उकरुन प्रश्न उपस्थित करण्यात येतो.

हा प्रश्न माध्यमे आणि राजकारण्यांच्या परस्पर युतीतून उपस्थित करण्यात येतो. खरे पाहता ही बाब वास्तवाला धरुन नाहीच. या दोन्ही (माध्यमे व राजकारण्यांनी) मिळून वैचारीक पातळीवर अशी परिस्थिती निर्माण केली की, सर्वसामान्यांना ही वास्तविकता माहित होऊच नये की इस्लामी शासनात संविधानाच्या व मानवाधिकारांच्या सीमारेषांच्या आंत प्रत्येक धर्माच्या अनुयायांना समान धर्मस्वातंत्र्य प्राप्त आहे. एवढेच नव्हे तर आपले न्यायिक व्यवहार सुदधा आपापल्या धर्माच्या विधीनुसार निश्चित करण्याचा इस्लामी शासनाने अधिकार दिलेला आहे. वस्तुतः अशा व्यवहारापैकी विवाह, घटस्फोट, वारसाहक्कांशी संबंधीत मुद्देच जास्त असतात.

शरीयतची व्यवस्था लागु करण्यासंबंधी आणखीनही काही बाबींचा उल्लेख केल्याशिवाय पर्याय नाही. कारण बऱ्याचदा असे प्रयत्न केवळ सुविचार होऊन राहिले. काही अतिउत्साही तरुणांनी यास इतर धर्मीयांविरुद्ध संघर्षाचे स्वरुप दिले. खरे पाहता शरीयतची व्यवस्था लागु करण्यासाङ्गी माध्यमांनी

आणि राजकारण्यांनी मिळून लोकांच्या मनांत उभा केलेला इस्लामविषयीचा बागुलबुवा नष्ट करुन शरीयत नुसार आचरणाचा नैतिक आदर्श निर्माण करावा लागेल.

याव्यतिरिक्त लोकशाही मार्गावर चालणाऱ्यां इस्लामी राजकीय पक्षांना सुद्धा मार्गदर्शनाची गरज आहे. हे पक्ष इस्लामचा आकर्षक झेंडा हाती घेऊन निवडणुकांच्या रणांगनात उतरतात, तेव्हा त्यांनी सामान्यांसमोर इस्लामचे विस्तारीत व व्यवहारिक स्वरुप सादर करावयास पाहिजे. इस्लाम म्हणजे काही जादूची छडी नाही, ज्यामुळे एका क्षणातच सामाजिक, राजकीय, आर्थिक व इतर प्रकारच्या सर्वच समस्यांचे निराकरण होईल. यासाङ्गी उत्तम योजना आणि शरीयतच्या नियमांनुसार धोरण तयार करुन हे कार्य करावे लागेल.

दिंलेली अश्वासने पूर्ण करणे आणि व्यवहारात पारदर्शकता असणे सुद्धा नितांत गरजेचे आहे. अश्वासन पूर्ण न झाल्यास आणि व्यवहारातील पारदर्शकता नष्ट झाल्यास लोक इस्लामचे अपयश समजतात आणि गमावलेला विश्वास परत मिळविण्यासाङ्गी खूप मोङ्गा संघर्ष करावा लागतो. या संघर्षातून लोक प्रबळ विरोधकाी भूमिका घेतात; इस्लामी आंदोलन चिरडण्यासाङ्गी तानाशाही धोरणाचा अवलंब करतात. तरी सुद्ध अद्यापपर्यंत असे विपरित काही घडलेले नाही.  एखादी बाब घडण्यापूर्वीच पूर्वानुमान लावणे देखिल योग्य होणार नाही. त्यांना एखादी संधी तर देऊन पहा !

जनतेच्या इच्छेविना सत्ता काबिज करणाऱ्यां इस्लामी पक्षांना अपयशाची धूळ चाखावी लागली. त्यांना आपला हेतु कधीही साध्य करता आला नाही. जातील मोङ्ग्या लोकतांत्रिक देशांनी त्यांना सहकार्य करण्याबाबत नकार दिला. आजही एखादा इस्लामी पक्ष सत्तेवर आला तर त्यांना आमचा प्रामाणिक सल्ला आहे की त्यांनी इस्लामी चारित्र्य आणि पारदर्शकतेचा आदर्श सादर करावा. काही प्रसिद्ध उदाहरणे अशी आहेत जेथे इस्लामी शरीयतनुसार शासन चालविण्याची फुशारकी मारण्यात येते मात्र या दिव्याखाली घोर अंधार दिसतो. प्रामाणिकपणा, इस्लामी चारित्र्य आणि पारदर्शकतेबरोबरच शरीयतच्या गहन ज्ञानाचा प्रचंड अभाव दिसून येतो.

शरीयतचा कायदा पूर्णपणे लागु न करता काही छोट्या-मोट्या प्रकरणापुरताच कायदा लागु करणे आणि मोङ्गमोङ्ग्या भ्रष्टाचाऱ्यांना पाङ्गीशी घालणे तसेच राष्ट्रीय संसाधनांचा स्वार्थासाङ्गी वापर करणाऱ्यां बड्या धेंड्यांना सोडून

लहान-लहान तुरळक अपराधांवर कङ्गोर शिक्षा देऊन फुशारकी मिरविणे, हा सुद्धा इस्लामच्या प्रति अपराध असून जनतेस धोका देण्याचा अघोरी प्रकार होय.

इस्लामच्या दृष्टीमध्ये शासक हा शासक नसून तो जनतेचा सेवक असतो, राष्ट्राच्या प्रति तो उत्तरदायी असतो. तसेच सर्वसामान्यांवर कायद्याचा बडगा उगारुन त्यांना सळो की पळो करुन सोडायचे आणि प्रभावशाली वर्गाला पाङ्गीशी घालायचे, हे तर इस्लामच्या पूर्णतः विरुद्ध आणि अपराध ङ्करविण्यात आलेला आहे. इस्लामी शरीयतने अगोदर प्रतिष्ङ्गित आणि प्रभावशाली व सक्षम लोकांना कायद्याच्या सीमेत घेतले आणि समाजाच्या दुर्बलांवर दया करण्याचे आदेश दिले आहेत. अपराध निर्मूलनासाङ्गी इस्लामने त्रिस्तरीय व्यवस्थ स्थापन केलेली असून शिक्षण, मार्गदर्शन व प्रबोधनाच्या माध्यमातून जनतेस इस्लामी चेतना जागविणे आणि अपराधी प्रवृत्तीस जन्म देणाऱ्या आर्थिक व सामाजिक समस्या सोडविणे आणि यानंतर जर अपराध घडला तर त्यावर शिक्षा निश्चितच करणे, या क्रमानुसार व्यवस्था चालविणे इस्लामी शासनाचे कर्तव्य ङ्करविण्यात आले आहे.

**लोकतंत्र**

या काळात, विशेषतः राजकीय उलथापालथीच्या व राजकीय अस्वस्थेच्या प्रसंगी इस्लाम मध्ये लोकतंत्राला स्थानच नसल्याचे ढोल जोरजोरात बडविण्यात येत आहेत. बरेच असे गट आहेत जे कोणाबरोबरच येण्यासाङ्गी तयार नाहीत व सहमतही नाहीत. पाश्चात्य देशांतील भांडवलशाही धोरणांवर पूर्वी मोहित असलेल्या आणि त्याचे अंधानुकरण करण्याचा सल्ला देणाऱ्या मुस्लिम विद्वानांच्या गटांप्रमाणेच यांचे धोरण व स्वरुप आहे. आता कोङ्गे पाश्चात्य देशांतील नैतिक आणि चारित्र्यिक पतन व याबरोबरच राजकीय अन्याय व शोषण पाहून पाश्चात्य धोरणाच्या मोहिनीची भुरळ विरजून गेलजी आणि या मोहिनीच्या अत्याचारी व क्रूर बाहुपाशातून स्वतःच्या मुक्ततेसाङ्गी धडपड करीत आहेत. इस्लामी राष्ट्रांचे एकाधिकारशाह वा तानाशाह लोकशाहीला इस्लामविरुद्ध असल्याचा गैरसमज निर्माण करीत आहेत.

इस्लामी पोषाख घालून इस्लामी शासकाचे सोंग घेऊन स्वतःला इस्लामी घोषित करणाऱ्या तानाशाहांनी राजकीय स्वार्थासाङ्गी जगभर असा प्रचार चालविला आहे की, इस्लाममध्ये लोकशाहीला मुळीच स्थान नाही. शिवाय राजदरबारी

आश्रयास असलेल्या व या तानाशहांच्या मेहरबानीवर जगणाऱ्या लोभी धार्मिक विद्‌वान सुद्‌धा यांचे समर्थन करतात.

पाश्चात्यदेशांतील राजकीय गट सुद्‌धा माध्यमांसोबत 'इस्लाममध्ये लोकशाहीला स्थान नाही' असा सतत दुष्प्रचार करीत असतात. इस्लामी राज्यांतील प्रजातंत्र विरोधी दांभिक तानाशहांनी त्यांच्या हातात आयते कोलित दिले. त्यांचा उद्‌देशच पाश्चात्य जनमानसास वा सार्वजनिक विचार शक्तीला इस्लामच्या खऱ्या स्वरुपाचे दर्शन घडविण्यापासून दूर ठेवणे होय, जेणे करुन त्यांच्या शासनांद्‌वारे मुस्लिमांसोबत करण्यात येणाऱ्या अमानुष भेदभाव आणि अन्यायाविरुद्‌ध कोणीही आवाज उठविण्याचा विचार करु नये. मात्र याबरोबरच ते ही बाब हेतूपुरस्सर लपवितात की अशा तानाशहांना पाश्चात्य लोकतांत्रिक देशांतर्फे देण्यात येणाऱ्या भरपूर समर्थनामुळेच मध्यपूर्व देशांतील लोकशाही समर्थकांचा आवाज दाबण्यात येतो.

सातव्या शतकातील इस्लामी व्यवस्थेची तुलना इस्लामच्या कित्येक वर्षानंतर जन्मास आलेल्या पाश्चात्य लोकतांत्रिक व्यवस्थेशी करणे योग्य होणार नाही. तसे पाहता पाश्चात्य देशांतील लोकशाही व्यवस्था देखील परस्पर विरोधी असून केवळ लोकशही विचारांपर्यंतच त्यांची मर्यादा आहे. तब्बल चौदाशे वर्षांपूर्वी इस्लामने सल्लागार परिषदेची संकल्पना सादर केली होती. यानुसारच देशातील संपूर्ण व्यवहार आणि निर्णय सल्लागार परिषदेत परस्पर सल्लामसलतीने होत असे. मुहम्मद पैगंबर आणि त्यांच्या पश्चात खलीफांनी सल्लागार समिती वा परिषदेत चर्चा करुनच स्वतःस प्रजातंत्राचे अग्रदूत असल्याचे जगाला दाखवून दिले.

मुहम्मद पैगंबरांनी स्वतःला सामान्य माणसाच्या स्वरुपात सादर केले. अल्लाहकडून मिळणारे आदेश सामान्यांपर्यंत पोचविण्यासह आणि त्यानुसार लोकांना प्रशिक्षित करण्यासह त्यांनी हे स्पष्ट केले की ते सामान्यांपैकीच आहेत. त्यांनी कधीही विशिष्ट व्यक्तिमत्व असल्याचे दाखविले नाही. एक दोन घटनेची उदाहरणे पाहिल्यास ही बाब सहज आपल्या लक्षात येईल. बद्रच्या युद्‌धापूर्वी मुहम्मद पैगंबरांनी युद्‌धाची रणनीती आपल्या मूठभर सैन्यांसमोर सादर करीत योजना जाहिर केली. एका सवंगड्याने विचारले, "ही योजना अल्लाहतर्फे अवतरली असेल तर आम्ही हिचे पालन करण्यासाठी प्रतिज्ञाबद्‌ध आहोत. मात्र आम्हाला हे स्पष्ट करा की ही योजना रणनीतीचा भाग तर नाही

ना ?'' मुहम्मद पैगंबरांनी त्याच्या दुसऱ्या क्रमांकाच्या प्रश्नावर होकार दिला. यावर त्या सवंगडयाने रणनीतीची दुसरीच योजना सादर केली. मुहम्मद पैगंबरांनी त्याची योजना स्वीकार केली. याच योजनेवर युद्धात विजय प्राप्त झाला.

नंतर बऱ्याच वर्षानंतर इस्लाम द्रोहीनी मदीना शहरावर हल्ला करण्याची योजना तयार केली. मुहम्मदांचा विचार होता की, शत्रूला मदीना शहरापर्यंत पोचू द्यावे आणि येथेच त्यांचा सामना करावा. मात्र सल्लामसलतीनंतर मदीनापासून दूर असलेल्या उहद पर्वताजवळ शत्रूचा सामना करावा. सल्लागार समितीच्या निर्देशांचे पालन करीत मुहम्मदांनी हुमताचे समर्थन केले. यावेळी सुरुवातीस इसलामी सैन्य विजयी होऊ लागले, मात्र येथे नंतर पराभव पत्करावा लागला.

अशारितीने प्रत्येक ङ्गिकाणी सल्लागार परिषदेचा प्रभाव आहे. प्रश्न छोटा असो की मोङ्गा, तो परस्पर सल्ला मसलतीनेच सोडविण्याचा आदेश देण्यात आला. अगदी मुलाच्या स्तनपानाच्या मुदतीविषयी सुद्धा सल्लामसलतीने निर्णय घेण्याचा आदेश आहे.

मुहम्मद पैगंबरांवर पैगंबरांच्या अवतरणाच्या परंपरेला पूर्ण विराम लागला ते अंतिम पैगंबर असून आता पैगंबर येणार नाही. या पैगंबरी नियमांची व्यवस्था लागु करण्यासाङ्गी सल्लागार परिषदेच्या निर्णयाने प्रतिनिधी अर्थात खलीफाची नियुक्ती करण्यात येण्याचे आदेश देण्यात आलेले आहेत. मुहम्मद पैगंबरांनंतर सर्व संमतीने पैगंबरी नियमांचे सर्वात मोङ्गे तज्ञ आणि त्यांचे निकटवर्तीय तसेच इसलामसाङ्गी सर्वात जासत बलीदान देणारे अबुबकर सिद्दीक यांना खलीफा नियुक्त करण्यात आले. त्यांनी इस्लामी सिद्धांत लागु केले. ही निवडप्रणाली आणि मुस्लिम समूदायात त्यांची भूमिका, याविषयी थोडक्यात माहिती खाली देण्यात येत आहे.

१. खलीफाची निवड जनादेशद्वारे करण्यात यावी.

२. ही निवड अटीं व शर्तीच्या आधारांवर असते. (खलीफाने घोषणा केली की, 'माझ्याप्रमाणेच तुम्ही सुद्धा अल्लाहच्या आदेशाचे पालन करावे').

३. खलीफाची निवड करणाऱ्या परिषदेस खलीफास पायउतार करण्याचा अधिकार सुद्धा असतो. (स्वतः खलीफा अबुबकर यांनी घोषणा केली की जर मी अल्लाहच्या आदेशाचे पालन केले नाही वा आदेशा विरुद्ध

वागलो तर लोकांनी सुद्‌धा माझ्या आदेशाचे पालन करु नये).

४. खलीफा हा शासक वा मालक नसतो. तो जनतेचा सेवक असतो. आपले कर्तव्य पूर्ण करण्यासाङ्गी तो बाध्य असतो.

५. खलीफा हा विशेष हित बाळगणाऱ्या विशिष्ट समुह, विशेष वर्ग वा कोणत्याही वर्गाच्या प्रभावातून मुक्त असेल. खलीफा अबुबकर म्हणाले, तुमच्यातील दुर्बल व्यक्ती माझ्या दृष्टीत प्रबळ आहे. त्याच्या अधिकारांचे रक्षण करणे अनिवार्य आहे. तसेच समृद्‌ध व्यक्ती व्यक्ती माझ्यासाङ्गी दुर्बल असते, राज्याचे त्याच्यावर असलेले अधिकार मिळविणे अनिवार्य आहे.

थोडक्यात असे की आज इस्लामी राष्ट्रांत जे काही सुरु आहे, ते वर दाखविण्यात आलेल्या नियमांच्या पूर्ण विरुद्‌ध आहे. यात शंकाच नाही की इस्लामी आदर्शांवर जर लोकशाही व्यवस्था स्थापन करण्यात आली तर केवळ इस्लामी साम्राज्याचाच विस्तार होणार नसून इस्लामी सभ्यतेचा व संस्कृतीचा देखील विकास होईल. समस्त अपराधी वृत्तींपासून मुक्त आणि सर्वत्र शांती व समृदधीने पुरेपूर वातावरण निर्माण होइल. अशा रितीने ही सर्वोत्तम प्रजातांत्रिक व्यवस्था असेल.

नंतरच्या काळात या व्यवस्थेने उच्च पतिमान स्थापन केले. द्‌वीय खलीफा उमर यांनी प्रथम तर समस्त राष्ट्रालाच उद्‌देशून एक शासनादेश जारी केला की, जर त्यांनी उत्तम रितीने (स्वतः खलीफानेच) व्यवस्था सांभाळली नाही आणि न्याय केला नाही तर त्यांना लोकांनी पदच्यूत करावे. यावर एकाने प्रतिक्रिया दिली की, खलीफा उमर यांनी सरळ कार्य केले नाही तर आम्ही तलवारीच्या बळावर त्यांना सरळ करु. यावर खलीफा उमर म्हणाले, यामुळेच तुम्ही चांगले लोक आहात आणि तुमची भूमिका स्वीकारली नसती तर मी चांगला नसतो.

दुर्दैवाने खलीफांचीही स्वर्णीम परंपरा नंतरच्या काळात एका अत्यंत दुःखद घटनेमुळे संपुष्टात आली. तृतीय खलीफा उस्मान गनी यांची क्रूर हत्या झाली. त्यानंतर मुहम्मद पैगंबरांचे जावई अली हे चौथे खलीफा नियुक्त झाले. मात्र सीरिया येथील राज्यपाल माविया यांनी बंड केले आणि न्यायालयीन प्रक्रिया पूर्ण होण्याची वाट न पाहता तृतीय खलीफा उस्मान यांच्या खुन्यास देहदंडाची

शिक्षा देण्याची मागणी उचलून धरत अली विरुद्ध युद्ध केले. या युद्धात खलीफा अली यांना विजयी मिळाला, मात्र उस्मान गनी यांच्याच कुळातील अर्थात बनु उमैया कुळातील माविया हे अतिशय प्रभावशाली होते आणि यांच्या हाताखालील बरेचजन क्रूर स्वभावाचे होते. त्यांनी षडयंत्र रचून माविया आणि अली या दोघांवर आक्रमण के आणि पैकी अली हुतात्मा झाले. या घटनेने पूर्ण इस्लामी साम्राज्यास जबर धक्का बसला. यानंतर अलीचे ज्येष्ङ्ग पुत्र हसन यांना सर्वानुमते खलीफा नियुक्त करण्यात आले. मात्र त्यांनी रक्तपात टाळण्यासाङ्गी खिलाफतचा त्याग केला आणि मावियांच्या स्वाधीन केली.

यानंतर काही काळातच प्रभावशाली माविया यांनी जनतेस हतप्रभ करीत आपला पुत्र यजीद याला आपला उत्तराधिकारी घोषित करण्यासाङ्गी दबाव टाकण्यास सुरुवात केली. मात्र हुतात्मा अलीचे द्वितीय पुत्र हुसेन यांनी खिलाफत मध्ये उत्त्राधिकारी घोषित करणे हे अवैध असल्याने यजीद याच्या विरुद्ध मोर्चे बांधणी केली. माविया आणि हसन या दोघांच्या मृत्युनंतर यजीद या अवैध शासकाविरुद्ध हुसैन यांना प्रचंड मोङ्गा जनाधार मिळाला मात्र यजीद याच्या क्रौर्यामुळे घाबरुन हा जनाधार मूर्त स्वरुप मिळु शकले नाही. शेवटी लोकशाहीवर आधारित खिलाफतच्या व्यवस्थेच्या समर्थनाचा झेंडा हाती घेऊन हुसैन हे बळजबरी अवैधरित्या ताबा मिळविलेल्या यजीद याच्या विरुद्ध मूङ्गभर लोकांना घेऊन निघाले. कर्बलाच्या मैदानावर यजीद या क्रूर शासकाच्या मोङ्गया लष्कराशी शौर्याने लढत हुतात्मा झाले. नंतरच्या काळात हा संघर्ष दोन शतकांवर व्याप्त उमैया साम्राज्याला संपुष्टात आणण्यात यशस्वी ङ्करला.

या समस्त घटना-घडामोडीत सुद्धा मुस्लिम संस्कृती प्रगत होत गेली. कारण राजकीय उलथापालथीच्या काळात सुद्धा एक वर्ग सदैव ज्ञानप्राप्ती, विज्ञान आणि संशोधन प्रक्रियेतून इस्लामी संस्कृतीमध्ये प्रगती साधत होता. या वर्गाकडून जो पर्यंत जनाधिकारासंबंधी अगर न्याय व्यवस्थेसंबंधी भूमिका घेण्यात येत नसे, तोपर्यंत शासक वर्गातर्फे या वर्गाचा आदर करण्यात येत. मात्र जनतेच्या शोषण आणि अन्यायासंबंधी जर या वर्गाने ब्र काढला तर त्याची गय करण्यात येत नसे.

लोकशाही विरुद्ध कारस्थान करणाऱ्या मुस्लिम बंधूंना माझा सल्ला आहे की, लोकशाहीमुळे इस्लाम राष्ट्रांच्या अस्तित्वास मुळीच धोका नसून लोकशाही हा

इस्लामचा आत्माच आहे. मात्र दुर्दैवाने इस्लामी राष्ट्रे एकाधिकारशाही आणि तानाशाहीने नेहमीच पीडित राहिलेले आहे, हा काळा इतिहास नाकारता येत नाही. शिवाय एकाधिकार शाहीच्या समर्थकांनीच इस्लाम धर्मास लोकशाही विरुद्ध असल्याचे दाखवून सत्ता अबाधित ठेवली आहे.

वर्तमान इस्लामी पुनरुत्थान अतिशय प्रचारीत अतिवादी, हिंसक प्रतिक्रियावादी, तानाशाही धर्मनिरपेक्ष आणि अर्ध धार्मिक शासनांच्या स्वरुपाची कात टाकत आहे. एका सहिष्णुतापूर्ण व उजळ मनाने अगर विस्तारीत बुद्धी व खुल्या विचाराने आलोकित मुख्य प्रवाह धार्मिक सत्य प्राप्त करुन इतिहासातील झालेल्या चुकांपासून बोध घेऊन आपली नवी दिशा निश्चित करीत आहे.

आज हा विचार प्रवाह इतरांच्या विरुद्ध भडकाऊ भाष्य करीत नाही. तर उलट तथ्यात्मक आधारावर सुधारणेचे कार्य करीत आहे. कारण गेल्या दीर्घ काळापासून इस्लामी विद्वान गंभीरपणे विचार करीत आहेत की, न्यायवादी व्यवस्थेवर आधारीत एक बिगर इस्लामी राज्य हे अन्यायी व जुल्मी असलेल्या इस्लामी राज्यापेक्षा उत्तमच आहे.

## आंतरिक चेतना

### इस्लामचे पाच स्तंभ :

प्रथम व द्वितीय क्रमांकाच्या प्रकरणांत अल्लाह विषयी असणाऱ्या आस्थेसंबंधी वर्णण करण्यात आले. याविषयी मुहम्मद पैगंबरांनी म्हटले, ‘‘तुम्ही अल्लाहवर विश्वास ठेवा, त्याच्या फरिश्त्यांवर, त्याच्या ग्रंथांवर, त्याच्या पैगंबरांवर, महाप्रलयाच्या दिवशी होणाऱ्या अंतिम निवाड्याच्या दिवसावर आणि नशीबावर, जे स्वयं अल्लाहने निश्चित केलेले आहे. याला आपण भाग्य विधान सुद्धा म्हणू शकतो. या बाबी आम्ही प्रांजळपणे व्यक्त केल्या. यांना तथ्यांचा आधार दिला. आम्ही कोणतेही तर्क मान्य करण्यासाठी कोणावरही बळजबरी करीत नाही.

अल्लाह केवळ एकच आहे, ही इस्लामी आस्था इब्राहीमी धर्मात अर्थात ख्रीस्ती व ज्यू धर्मातही आहे. इस्लामने म्हटले की, अल्लाहने जेवढे पैगंबर अर्थात प्रेषित पाठविले, ते आणि त्यांचे अनुयायी हे इस्लाममध्ये विश्वास ठेवणारेच अर्थात मुस्लिमच आहेत. कारण इस्लामच अर्थच अल्लाहच्या आदेशांसमोर आत्मसमर्पन करणे होय. या अध्यायात इस्लाम आणि त्याच्या शरीयत (विधी)

संबंधी चर्चा करुया.

**इसलाममध्ये पांच प्रकारच्या उपासना अनिवार्य आहेत**. मुहम्मद पैगंबरांनी म्हटले, ''इस्लामचे पांच स्तंभ आहेत. प्रथम अशी घोषणा करणे की इल्लाहशिवाय कोणीही उपास्य नाही. द्वितीय नमाज कायम करणे, तृतीय जकात देणे, चतुर्थ रमजान महिन्याचे रोजे पूर्ण करणे आणि पंचम आर्थिक सुबत्ता असेल तर हज करणे. हे तर प्रमुख स्तंभ होय. मात्र इमारतीसाङ्गी केवळ स्तंभच नसतात, ते इमारत स्थिर ङ्केवण्याची प्रमुख भूमिका बजावतात. इस्लामला केवळ उपासना आणि पूजा व कर्मकांडापर्यंत मर्यादित ङ्केवू इच्छिणारे वैचारिक पातळीवर गैरसमज करुन घेतात. त्यांना इस्लामची प्रवृत्ती वा स्वभावाची जाण नाही. या अनिवार्य उपासनांचा उद्देश उपासकाच्या चारित्र्यास अल्लाहच्या मर्जीनुसार स्वरुप उपासकाच्या चारित्र्यास अल्लाहच्या मर्जीनुसार स्वरुप देणे हा होय. मुळात अल्लाहच्या खऱ्या आणि सच्च्या उपासकाचे स्वरुप प्राप्त करण्यासाङ्गी आवश्यक असलेली कसोटी म्हणजे या पाच अनिवार्य उपासना आहेत. अल्लाहची प्रसन्नता मिळविण्यासाङ्गी नियमानुसार कोणतेही पुण्यकर्म, कल्याणकारी कार्य, दानधर्म ही उपासनाच होय.

लोकांशी हसत खेळत बंधूभावपूर्ण व्यवहार करणे, रस्त्यावरील अडसर दूर करणे वगैरे सारखे कर्म सुद्धा मुहम्मद पैगंबरांनी केले आणि याला सुद्धा उपासनाच म्हटले. नेकी अर्थात पुण्य कार्यासाङ्गी आंतरिक इच्छेने प्रेरित होऊन केलेल्या कार्यालयाच इबादत (उपासना) म्हणतात. आता आपण थोडक्यात इस्लामच्या पांच स्तंभांविषयी चर्चा करु.

१. **एकेश्वरवादाची घोषणाः** मी घोषणा करतो की, अल्लाहच्या शिवाय कोणीही उपास्य नाही आणि मुहम्मद हे अल्लाहचे पैगंबर (संदेश वाहक) आहेत. कमीत कमी दोन जनांसमक्ष ही घोषणा करणे इस्लामची स्वीकारण्याची औपचारिक घोषणा आहे. यालाच इस्लामच्या परिभाषेत कलिमा असे म्हणतात. या घोषणेचा वा कलिम्याचा अर्थ असा की घोषणाकर्ता हा त्या सर्वशक्तीमान अल्लाहला आपल्या जीवनाचा मूळ स्वामी आणि जीवनदाता व जीवनास आकार देणारा व मार्गदर्शक स्वीकार करणे होय. यासोबतच अल्लाहच्या व्यतिरिक्त इतर कोणाचाही (लोकांचा, वस्तुंचा, आंतरिक इच्छा वा भावनांचा) प्रभाव हा अल्लाहच्या मर्जीच्या अधीन असावा. मुहम्मद हे अल्लाहचे पैगंबर

(प्रेषित वा संदेश वाहक) असल्याची घोषणा करणे म्हणजे मुहम्मदांच्या शिकवणी व मार्गदर्शनानुसार जीवन जगण्याची शपथ घेणे होय.

२. **नमाज :** नमाज इस्लामचा धार्मिक संस्कार असून सर्व इबादत (उपासनां) मध्ये प्रमुख स्थानावर आहे.  बंद्याला (उपासकाला) अल्लाहशी प्रत्यक्ष संवाद करण्याची ही प्रक्रिया असून कोणत्याही ङ्गिकाणी, कोणत्याही काळात आपल्या स्वामी व पालनकर्त्यासमोर नमाज अदा केली जाऊ शकते.  या द्वारे अल्लाहकडून दिशा निर्देशाची याचना व क्षमा याचना करण्यात येते. नमाज अदा करण्याचे आदेश कुरआनात देण्यात आले आहेत.

नमाज अदा करण्यासाङ्गी माणुस पवित्र, शूचिर्भूत असणे अनिवार्य आहे. यासाङ्गी वजू करणे अर्थात चेहरा, हात-पाय धुणे, नाक साफ करणे आवश्यक होय.

प्रत्येक नमाज ही अल्लाह समक्ष हजर राहणे होय.  इब्राहीम व त्यांचे पुत्र इस्माईल यां दोघां पैगंबरांनी मिळून अल्लाहचे पहिले घर म्हणजेच काबा होय. याच काबाच्या दिशेला चेहरा करुन नमाज अदा करण्यात येते.

अल्लाहु अकबर (अल्लाहच महान आहे) अशी घोषणा करीत नमाज सुरु केली जाते. याचा अर्थ असा की इबादत (उपासना) करणारी व्यक्ती जगातील प्रत्येक गोष्टीला पाङ्ग दाखवून आपले पूर्ण ध्यान एकमेव अल्लाहकडे लावण्यात येते. यात कुरआनाचा पहिला अध्याय पङ्गण करणे अनिवार्य असते. या अध्यायात प्रशंसा केवळ अल्लाहसाङ्गीच आहे, जो समस्त विश्वाचा पालनकर्ता आहे.  तु परम कृपाशील व दयाशील आहे.  आम्ही केवळ तुझीच उपासना करतो आणि तुझीच मदत इच्छितो.  आम्हास सत्मार्गावर चालव त्या लोकांच्या मार्गावर चालव ज्यांच्यावर तुझी कृपा झाली आणि त्यांच्या मार्गावर चालवू नकोस ज्यांच्यावर तुझा प्रकोप झाला आणि जे मार्गभ्रष्ट झाले. अशा आशयाची सूरह पङ्गण करण्यात येते. यालाच सूरह-ए-फातिहा (कुरआन, १, १-७) असे म्हणतात. यानंतर कुरआनाच्या इतर सूरहचे पङ्गण करण्यात येते.  यानंतर सुकुअ व सजदा आणि कायदा होतो.

नमाज ही अनिवार्य असो की ऐच्छिक असो, दोन्हीही अध्यात्मिक स्वरुपातील अपरिमित खजिना आहे. याच्या माध्यमाने आत्मिक शांती, पवित्र भाव आणि

आत्मिक समाधान लाभते. अल्लाहशी जवळिक निर्माण होते. जीवनातील अस्थिरता कमी होते. निश्चित वेळेवर दिवसभरात पांचवेळा अनिवार्य नमाज अदा करावी लागते.

**जकात :** मानवांचे मूलभूत अधिकार त्यांना प्राप्त व्हावे आणि स्वाभिमानपूर्ण जीवन सर्वांनाच जगणे शक्य व्हावे आणि यासह सर्वत्र समृद्धी नांदावी म्हणून आपल्या उत्पन्नातून वा संपत्तीतून इतरांसाङ्गी खर्च करणे अनिवार्य ङ्करविण्यात आले. यालाच जकात असे म्हणतात. झकात देणे हे काही ऐच्छिक पुण्यकर्म नसून अनिवार्य कर्म होय. शिवाय भांडवल आणि संपत्ती निष्क्रिय न होणे व काही मूङ्गभर लोकांच्या हाती केंद्रित न होणे, हा देखिल यामागचा उद्देश आहे. अर्थशास्त्राचा हा नियमच आहे की, संपत्ती जर निष्क्रिय झाली तर ४० वर्षाच्या मुदतीत ती नष्ट होते. यासाङ्गी नियमित रुपाने वर्षभरात हिशेब लाऊन जमा-पूंजी आणि समस्त प्रकारच्या संपत्तीतून अडिच टक्के भाग आर्थिक दुर्बलांना देणे अनिवार्य आहे. याशिवाय उद्योग धंदे, कृषी, पशुपालन, व्यापार वगैरेतून प्राप्त संपत्तीतून जकातीचे वेगवेगळे नियम आहेत.

जकात देणे म्हणजे ऐच्छिक कल्याणकारी कार्य वा दानशूरता नसून श्रीमंतांच्या संपत्तीतील आर्थिक दुर्बलांचा संवैधानिक हक्काचा वाटा आहे. इस्लामी शासनात जकात ही कराच्या स्वरुपात नसूल करण्यात येते. ही रक्कम जनहितार्थ चालविण्यात येणाऱ्या संस्थांना सुद्धा देता येते. शिवाय इस्लामी शासन नसलेल्या ङ्किकाणी जकातीची रक्कम थेट गरजवंतांपर्यंत घरपोच करण्यात येते. यामध्ये मुस्लिमेतर गोर-गरीबांना सुद्धा लाभान्वित करण्यात येते.

समाजात परस्पर दृढ संबंध स्थापन व्हावे आणि समृद्धी, सुख व शांतता प्रस्थापित व्हावी म्हणून 'जकात' ही अनिवार्य उपासना घोषित करण्यात आलेली आहे. यासंबंधी मुहम्मद पैगंबरांनी म्हटले, शरीराच्या एका अवयवास क्षती पोचली तर पूर्ण शरीर तापाने फणफणते, अरबी भाषेतील 'जकात' या शब्दाचा अर्थ 'पवित्र करणे' असा असून गोर गरीब, वंचित व गरजवंतांना जकातीच्या माध्यमातून पैसा देणे, या अनिवार्य कर्मामुळे संपत्ती पवित्र करण्यात येते. जकात देणाऱ्या व्यक्तिस यामुळे आत्मसमाधान मिळते.

**रमजानचे रोजे :** चांद व्यवस्थेवर आधारीत इस्लामी कालनिर्णयानुसार नववा महिना हा 'रमजान' या नावाने ओळखला जातो. ग्रॅगरी कॅलेंडरपेक्षा हे इस्लामी

वर्ष अर्थात हिजरी वर्ष अकरा दिवसांनी लहान असल्याने दरवर्षी रमजानचा महिना अकरा दिवस लवकर सुरु होतो. यामुळे दरवर्षी ऋतुबदल होत प्रत्येक ऋतुमध्ये रोजे ड्ढेवण्याची संधी मिळते. रोज्यामध्ये सूर्योदयापूर्वी पासून ते सूर्यास्तापर्यंत अन्नपाणी त्याग करावे लागते आणि शारीरिक सुद्धा करता येत नाही. रोजाचे पावित्र्य अबाधित ड्ढेवण्यासाङ्गी रोजेदाराने क्रोध आणि दुर्व्यवहारापासूनही दूर राहावयास हवे असे निर्देश देण्यात आलेले आहे.

रमजान म्हणजे केवळ अन्न पाणी त्याग करण्याचे नाव नसून सूर्यास्तानंतर खाण्या-पिण्याची पूर्ण परवानगी आहे. शिवाय प्रवास करणाऱ्यांवर आणि वृद्ध, आजारी, लहान मुले आणि स्तनपान करणाऱ्या महिलांना रोजा ड्ढेवणे बंधनकारक नाही.

रोजाच्या काळात दररोजच्या जेवणपाण्याची सवय बदलून भूक व तहाण नियंत्रणाचा उत्तम सराव होतो. यामुळे जबरदस्त आत्मनियंत्रण व प्रबळ इच्छाशक्ती निर्माण होऊन नैतिक समाज-निर्मितीस्तव आवश्यक गुणधर्म निर्माण होते. माणुस भौतिक गरजांपासून विमुख होतो आणि अध्यात्मिक स्तरावर संपन्न होतो. वर्षभर स्वैर इच्छांची मागणी पूर्ण करीत आत्म्यावर चढलेला गंज पार नष्ट होतो. शिवाय दान-धर्म केल्याने एक नविनच चकाकी येते. यानंतर ईदची नामज विशिष्ट विधीनुसार होतो. याप्रसंगी मित्र व संबंधीतां सोबत ईदचा आनंद अतिशय नैतिक पद्धीने साजरा करण्यात येतो.

**हज :** पैगंबर इब्राहीम यांच्या एकेश्वरवादी आंदोलनाचा गहिरा संबंध असल्याने इस्लामने या आंदोलनास आणि इब्राहीम पैगंबरांच्या आज्ञाकारीतेस मान देऊन यास हजचे नाव देऊन उपासनेत रूपांतरित केले आहे. या उपासनेस इस्लामचा पाचवा स्तंभ घोषित केले आहे. इब्राहीम पैगंबरांनी त्यांच्या जीवनात अल्लाहच्या आज्ञापालनाच्या अनेक कङ्गोर परीक्षा मोङ्ग्या भक्ती भावाने पार केल्या. अशाच एका परीक्षेत अल्लाहच्या आदेशावर त्यांनी आपली पत्नी हाजेरा आणि मुलगा इस्माईल यांना दक्षिण पश्चिमी अरबच्या उजाड प्रदेशात आणून सोडले होते. त्यांना पूर्ण विश्वास होता की त्यांचे रक्षण अल्लाह करील. भविष्यात मक्का शहर निर्माण होणाऱ्या या स्थानावर जेव्हा आई-मुलाजवळचे अन्नपाणी संपले तेव्हा लहान मूल भूक व तहानेने व्याकूळ झाले. त्याच्यासाङ्गी पाण्याचा शोध घेत इकडे-तिकडे धावत सुटली. याच काळात चमत्कारीकरित्या पाण्याचा झरा फुटला यालाच 'जम-जम' असे म्हणतात. इब्राहीम पैगंबर वेळोवेळी त्यांचे

क्षेम कुशल जाणून घेण्यासाठ्ठी जात असे. नंतर त्यांना त्यांचे पुत्र इस्माईल यांना सोबत घेऊन अल्लाहची इबादत (उपासना) करण्यासाठ्ठी अल्लाहने काबा निर्माण करण्याचे आदेश दिले. इब्राहीम पैगंबरांनी या आदेशाचे तंतोतंत पालन केले. जगातल्या इतिहासातील काबा म्हणजे पहिलीच मस्जिद होय. येथेच लोकांना हज करण्यासाठ्ठी निमंत्रित करण्यात आले. या शिवाय आपले पुत्र इस्माईल यांच्या बलीदानाच्या परीक्षेत सुद्धा इब्राहीम पैगंबरांनी अल्लाहच्या प्रती निष्ठ्ठा दाखवून सफलता मिळविली आणि या स्मरणार्थ कुरबानी करण्यात येते.

इब्राहीम पैगंबरांच्याच काळापासून हजची परंपरा सुरु झाली आणि ती आजपर्यंत व नेहमीसाठ्ठी कायम आहे. दुर्देवाने नंतरच्या काळात लोकांनी मूर्तीपूजा सुरु केली आणि अल्लाहच्या उपासनेसाठ्ठी तयार करण्यात आलेल्या जगातील पहिली मस्जिद 'काबा' मध्ये विविध मूर्त्या आणून स्थापित केल्या. मूर्ती पूजकांनी आपापल्या परिवाराचे प्रतिनिधित्व करणारी एक एक मूर्ती स्थापन केली. एका अल्लाहची उपासना करण्याऐवजी मूर्त्याचे पूजन, मदिरा सेवन आणि याबरोबरच अनेक अनैतिक कृत्यांसह उत्सव साजरा करण्यात येऊ लागला. मक्कावासियांसाठ्ठी हा उत्सव आर्थिकदृषा महत्वाचा ठ्ठरत होता. याच दोन वार्षिक उत्सवावर त्यांची आर्थिक व्यवस्था चालत असे. उत्तर (आफ्रिका आणि एशिया) आणि दक्षिण (सीरिया व बायजेंटाइन साम्राज्यातून इतर प्रदेश) कडे येणारे जाणारे काफिले येथे येत. त्याकाळी दांभिक धर्मगुरु अल्लाहतर्फे बोलत असण्याचा खोटा दावा करुन लोकांकडून भेट वस्तु स्वीकारीत असत. यातून त्यांच्या मोठ्ठ्या प्रमाणात तिजोऱ्या भरत होत्या.

हजारो वर्षापर्यंत इब्राहीम पैगंबरांचे सुपुत्र इस्माईल पैगंबर यांचे वंशज हेच करीत होते. मात्र याच वंशामध्ये अरबच्या एका प्रभावी कबिल्यात अर्थात कुरैश कबिल्यात इसवी सन ५७० मध्ये मुहम्मदांचा जन्म झाला. जन्मापूर्वी त्यांचे वडील आणि जन्माच्या काही अल्पकाळानंतरच त्यांचे आई या दोघांचे निधन झाले. अनाथ बालक मुहम्मदांचे पालनपोषण त्यांचे आजोबा अब्दुल मतललीब यांनी केले. काही काळातच त्यांचेही निधन झाले आणि नंतर त्यांचे काका अबुतालि ब यांनी त्यांचे पालनपोषण केले. तरुणावस्थेत येईपर्यंत आपल्या स्वच्छ चारित्र्य आणि नैतिक आचरणामुळे पूर्ण मक्का शहरात सर्वच अबालवृदधांत खूप लाडर्वे झाले. वयाच्या पंचेविसाव्या वर्षी एका गर्भश्रीमंत व्यापारी विधवा महिला खदीजा बरोबर त्यांचा विवाह झाला. खदीजांचे वय

४० वर्षे असताना मुहम्मदांचे उत्तम चारित्र्य पाहून तिने हा प्रस्ताव ङ्केवला होता. विवाहानंतर तब्बल अङ्गङ्गावीस वर्षापर्यंत हे एकपत्निक विवाहबंधन खदीजांच्या निधनानेच संपूष्टात आले.

मुहम्मदांनी अगदी लहानपणापासून मूर्तीपूजक मित्रांच्या कोणत्याही सोहळयात व मूर्तीपूजेत भाग घेतला नाही, कोणतेही गैरकृत्य केले नाही, कोणासही साधी इजा पोचविली नाही. चिंतन-मनन आणि अध्ययनात ध्यान धरण्यासाङ्गी ते मक्केतील एका पर्वताच्या गुहेत जात एके दिवशी ते या गुफेत ध्यान मग्न होते की अल्लाहचा फरिश्ता जिब्रील आला आणि अल्लाहच्या संदेशाबरोबरच कुरआनाचा एक अंश सुद्धा सादर केला, तो असा, ''वाचा आपल्या पालनकर्त्याच्या नावाने ज्याने निर्मिती केली, मानवाची निर्मिती केली चिकटणाऱ्या वस्तूने. वाचा, परिस्थिती अशी आहे की, तुमचा पालनकर्ता खूप उदार आहे, ज्याने लेखणीच्या माध्यमाने शिक्षण दिले, मनुष्यास असे ज्ञान प्रदान केले ज्याची त्यास माहिती नव्हती. (कुरआन, ९६, १-५) याबरोबरच मुहम्मदांवर कुरआन अवतरणाची सुरुवात झाली. ही घटना रमजानच्या महिन्यात 'कद्र' च्या रात्री घडली. या अचानक आणि विलक्षण अद्भूत घटनेने मुहम्मद पैगंबर खूप घाबरले. अते अक्षरशः थरथर करीतच घरी पोचले. त्यांची परिस्थिती पाहून त्यांच्या पत्नी खदीजा यांनी त्यांना धीर दिला, म्हणाल्या 'शपथ आहे त्याची, ज्याच्या ताब्यात माझे प्राण आहे, मी प्रार्थना करते की तुम्ही या राष्ट्राचे पैगंबर अर्थात प्रेषित असणार. आपण लोकांवर दया व कृपा करता, पाहुण्यांचा पाहुणचार करता, गरजुंची मदत करता आणि खरे बोलता, निश्चितच अल्लाह आपणास अपमानित होऊ देणार नाही.'

यानंतर जिब्रील फरिश्ता वारंवार मुहम्मद पैगंबरांच्या सेवेत हजर होत आणि ईश्वरी संदेश सादर करीत. सत्य स्थापन होईपर्यंत आणि इब्राहीम पैगंबरांच्या एके श्वरीय धर्माच्या पुनस्थापनेपर्यंत हे कार्य सुरु होते. याच संदेशावर मुहम्मद पैगंबरांचे आंदोलन सुरु होते आणि मक्केतील धनाढ्य व प्रभावशाली वर्गातील लोकांसहीत तेथील मूर्तीपूजकांनी या आंदोलनाचा तीव्र विरोध केला. कारण त्यांचे अस्तित्व व भांडवलशाही मूर्तीपूजकांकडून मिळणाऱ्या दानधर्मावरच आधारीत होती. या भांडवलशाला आणि धर्माच्या नावावर सुरु असलेल्या माफियागिरी व शोषणव्यवस्थेला मुहम्मदांच्या आंदोलनाने प्रचंड हादरा बसला. थब्बल तेरा वर्षापर्यंत मुहम्मद आणि त्यांच्या आंदोलनकर्त्यांनी विरोधकांच्या ना-ना यातनांचा मोङ्ग्या हिरीरीने सामना केला. विरोधकांतर्फे जगणे कङ्गिण

होण्याच्या कारवाईनंतर मुहम्मदांनी आपल्या आंदोलनकर्त्यांसह मक्का शहर सोडले आणि मदीना शहरी वास्तव्य केले. कुरआरनाच्या आदेशानुसार याप्रसंगी त्यांना आत्मरक्षणास्तव शत्रुपक्षाविरुद्ध सशस्त्र युद्ध करण्याची आज्ञा मिळाली होती. शेवटी मुहम्मदांनी मक्केवर विजय मिळविला आणि मुहम्मद व त्यांच्या आंदोलनकर्त्यांच्या जीवाचे वैरी झालेल्या कट्ट शत्रुंना सुद्धा अभय अगर सार्वजनिक माफी देण्यात आली. काबागृहात ङ्केवण्यात आलेल्या समस्त मूर्ती नष्ट करुन त्यास पवित्र करण्यात आले. अर्थातच दैवतीकरणाच्या व अनेक देवदेवतांना पूजण्याच्या शोषण व्यवस्थेचा समूळ नायनाट करुन एकाच अल्लाहच्या बंदगीवर आधारीत इस्लामी व्यवस्था स्थापित झाली. येथूनच निश्चित समयी हज निधीचा प्रारंभ झाला आणि यास इस्लामचा पाचवा स्तंभ अर्थात प्रत्येक सक्षम पुरुष व स्त्रीवर जीवनात निदान एका अनिवार्य करण्यात आले. मानवतेची पराकाष्ङ्गा आणि आस्थेच्या पावित्र्याबरोबर समस्त मानवपरिवारास एकाच माळेत गुंफण्यात आले. सर्वचजण एकाच अल्लाहची इबादत करण्यातून ऐक्य साध्य होण्याचे हे प्रत्यक्ष उदाहरण होय.

**इस्लामी नैतिकता :** इस्लामी नैतिकतेची तुलना ख्रीस्ती आणि ज्यू नैतिकतेशी करता येते. जी नौराह आणि इंजील मध्ये प्रस्तूत करण्यात आलेली आहे. नंतरच्या काळात या दोन्ही धर्माशी संबंधीत इब्राहिमी नैतिकतेत एवढया मोङ्ग्या पमाणात बदल करण्यात आला की त्या काळातील नैतिकता आज अनैतिकता झाली आणि त्याकाळातील अनैतिकता आज नैतिकता ङ्करविण्यात येत आहे. या वर्तमान अनैतिक कृत्यांना आज सुंदर नावे व घोषणांनी अलंकृत करण्यात आले. उदाहरणार्थ लव, गे, रिलेशनशिप, बॉयफ्रेंड, गर्ल फ्रेंड, लवर इत्यादी आपल्या दुष्कर्मावर पडदा टाकण्यासाङ्गी कदाचित अशां उपाधींचा वापर करण्यात आला.

अशां वेगवेगळया मुद्यांवर चर्चा करण्यापेक्षा आपण इस्लामी नैतिकतेच्या दोन प्रमुख स्त्रोतांवर चर्चा केलेली उचित ङ्करेल. ही दोन स्त्रोत कुरआन आणि हदीस असून याची काही उदाहरणे येथे सादर करीत आहोत. आपल्यापैकी अनेकजणांना आश्चर्याचा धक्का बसेल. कारण पाश्चिमात्य तथाकथित विद्वानांनी भांडवलशाहीच्या हितांसाङ्गी इस्लामच्या वास्तविक स्वरुपावर भ्रामक गोष्टींचा हेतूपुरस्सर पडदा टाकला आहे. यांत रेडियो, टी.व्ही. आणि वृत्त्माध्यमांचा सर्रास वापर करण्यात आला आहे. मात्र आमच्या प्रयत्नांना

सुद्धा यश मिळत असून जगातील असंख्य लोक इस्लामचे वास्तविक स्वरुप समजून घेत आहेत आणि आपले जीवन समृद्ध करीत आहेत.

इस्लामी नैतिकतेच्या आधारावर मानवाच्या जीवनाची व अधिकारांची सुरक्षा तर होतेच शिवाय अल्लाहच्या प्रतिनिधी या नात्याने आपले इतरांप्रती कर्तव्यांचे पालन करणारा माणुस घडविणे, हे मुख्य उद्‌दिष्ट होय याची कुरआन आणि हदीस ग्रंथांतून काही उदाहरणे देण्यात येताहेत.

**कुरआनाच्या शिकवणी :**

रहमान (दयाशील शक्ती) चे प्रिय बंदे तेच आहेत, जे जमिनीवर नम्रतापूर्वक चालतात आणि अज्ञानी जेव्हा त्यांच्याशी वाद घालतात, तेव्हा ते सलाम करुन त्यांना नजरअंदाज करतात. ते आपल्या पालनकर्त्यासमोर सजद्याच्या स्थितीत आणि उभे राहून (नमाजच्या स्थितीत) पूर्ण रात्र काढतात आणि याचना करतात की, हे आमच्या पालनकर्त्या ! नरकग्नीच्या यातनांतून मुक्ती दे. निश्चितच त्याची यातनां असह्य आहेत. ती जागा निवासाकरीता अतिशय वाईट आहे. ते जे काही खर्च करतात, त्यात ते अपव्यय ही करीत नाहीत आणि हात आखडतासुद्धा घेत नाहीत. थर ते मध्यममार्गाने जगतात. ते अल्लाहशिवाय इतर ईष्ट-पूज्यास साद घालत नाहीत, व कोणाचीही हत्या करीत नाहीत, जी अल्लाहने हराम ङ्खरविली आहे. तसेच ते व्यभिचारही करीत नाहीत. कारण असे कृत्य करणारा संकटात सापडणार आणि अंतिम निवाडयाच्या दिवशी त्याची यातना वाढत जाईल. तो अशाच परिस्थितीत नेहमीसाङ्गी अपमानास्पदरित्या येथेच राहणार. शिवाय जो दुष्कर्म त्याग करुन (सत्मार्गाकडे) परत येतो, अल्लाहवर ईमान ङ्खेवतो आणि चांगले आचरण करतो, अशा लोकांचे पाप क्षमा करुन ते पुण्यात रुपांतरीत करण्यात येतील. कारण अल्लाह अत्यंत क्षमाशील व दयावंत आहेच. मग ज्याने तौबा (दुष्कर्म वा पाप न करण्याची प्रतिज्ञा) केली आणि सदाचारी व्यवहार वा कर्म केले, तो निश्चितच अल्लाहकडे येतो. ङ्गो कोणत्याही असत्य आणि खोट्या बाबींत लिप्त होत नाही आणि व्यर्थ कृत्य न करता आपले सदाचार जपून वागतात आणि ज्यांना त्यांच्या पालनकर्त्यातर्फे आलेल्या आयतींचे (कुरआनाच्या शिकवणीचे) स्मरण करुन देण्यात येते तेव्हा ते अंधारसम व बहिऱ्यांसम वागत नाहीत१ आणि म्हणतात, ''हे आमच्या पालनकर्त्या ! आम्ळांस आमच्या भार्या आणि आमच्या संततीच्या माध्यमाने शांती प्रदान कर आणि आम्हास

तुझे भय बाळगून सन्मार्गावर चालणाऱ्यांचे सारथ्य प्रदान कर.'' (कुरआन, २५, ६३-७४) आपल्या पालनकर्त्याच्या क्षमाशीलतेकडे आणि आकाश व धरतीसम विस्तारित असलेल्या जन्नत (स्वर्ग) कडे वाटचाल करा ही त्या लोकासाङ्गी निर्माण करण्यात आलेली आहे जे अल्लाहचे भय बाळगून त्याच्या आदेशानुरुप वागतात. ते श्रीमंती असो की दारिद्रय असो, प्रत्येक परिस्थितीत खर्च करीत असतात आणि आपला राग नियंत्रित ङ्केवतात. इतरांशी दया व क्षमाशील वर्तन करतात, अल्लाहला असेच लोक प्रिय असतात जे उत्तमोत्तम कर्म करतात. शिवाय ज्यांची परिस्थिती अशी आहे की, जेव्हा ते उघड दुष्कर्म करतात अर्थात स्वतःवरच अन्याय करतात, तेव्हा त्यांना तात्काळ अल्लाहची आङ्गवण येते आणि आपल्या दुष्कर्मावर पश्चात्ताप करुन क्षमा याचना करताना म्हणतात, अल्लाहशिवाय कोण आहे जो आमच्या पापांना क्षमा करील आणि जाणून बूजून आपल्या पापांवर ङ्गाम राहण्याचे कृत्य करीत नाहीत, त्यांना निश्चितच अल्लाहकडून क्षमादान आहे आणि त्यांच्यासाङ्गी असे बागिचे तयार आहेत ज्यांत पाण्याच्या नहरी वाहत असतात. त्यांत हे सदैव राहणार. शत्कर्म करणाऱ्यांसाङ्गी किती उत्तम मोबदला आहे हा ! (कुरआन, ३, १३३-१३६)

**मुहम्मद पैगंबरांचे कथन**

जोपर्यंत तुम्ही आपल्या बांधवांसाङ्गी सुद्धा तेच पसंत करीत नाही, जे स्वतःसाङ्गी पसंत करतात, तो पर्यंत तुम्ही ईमानधारक होऊच शकत नाही.

दृष्कृत्य वा अन्याय पाहून आपल्यात सामर्थ्य असेल तर बलपूर्वक रोखावे, हे शक्य नसेल.

स्मरण करा जेव्हा लुकमान आपल्या पुत्राला उपदेश करीत होता तेव्हा तयाने सांगितले, ''पुत्रा! अल्लाहसमवेत कोणालाही सहभागी ङ्खरवू नकोस, सत्य असे आहे की, शिर्क (धर्मात अल्लाहसोबत कोणालाही सहभागी ङ्खरविणे) फार मोङ्गा अन्याय आहे.'' आणि ही वस्तुस्थिती आहे की आम्ही मानवाला आपल्या मातापित्यांचा हक्क ओळखण्याची स्वतः ताकीद केली आहे. त्याच्या आईने यातनामागून यातना सहन करुन त्याला आपल्या उदरात ङ्केवले आणि दोन वर्षे तिचे दूध सोडविण्यास लागले. (म्हणूनच आम्ही त्याला उपदेश दिला की) माझ्यापती कृतज्ञता दाखव आणि आपल्या मातापित्यांशी कृतज्ञ रहा, माझ्याकडेच तुला परतावयाचे आहे. परंतु जर त्यांनी तुझ्यावर दबाव आणला

की माझ्यासमवेत तू अशा एखाद्याला भागीदार ङ्करवावेस की ज्याला तू जाणत नाही तर त्यांचे म्हणणे अजिबात ऐकू नकोस. झगात त्यांच्याशी सद्व्यवहार करीत राहा परंतु अनुकरण त्या व्यक्तीच्या मार्गाचे कर जो माझ्याकडे रुजू झाला आहे. मग तुम्हा सर्वांना परतावयाचे माझ्याकडेच आहे, त्यावेळी मी तुम्हाला दाखवीन की तुम्ही कसली कृत्ये करीत होतात. (१३-१५)

(आणि लुकमानने सांगितले होते की) ''बेटा, कोणतीही वस्तू ती मोहरीच्या दाण्याबरोबर का असेना आणि कोणत्याही खडकात किंवा आकाशात अथवा पृथ्वीत कोङ्गेही लपलेली का असेना, अल्लाह ती काढून आणील. थो सूक्ष्मदर्शी व खबर राखणारा आहे. बेटा, नमाज कायम कर, सत्कृत्यांचा आदेश दे, दुष्कृत्यांची मनाई कर, आणि जी काही आपत्ती येईल त्यावर संयम राख. या त्या गोष्टी आहेत ज्यांची ताकीद दिली गेली आहे,...

आणि लोकांशी तोंड रिवून बोलू नकोस, पृथ्वीवर ऐटीत चालूदेखील नकोस, अल्लाह कोणत्याही अहंकारी व गर्व करणाऱ्या व्यक्तीला पसंत करीत नाही. आपल्या चालीत मध्यमपणा राख आणि आपला आवाज थोडा धिमा ङ्केव,ख सर्व आवाजांपेक्षा अधिक वाईट आवाज गाढवाचा असतो.'' (१६-१९)

तुमच्यापैकी जे लोक कृपाविभूशित व ऐपत बाळगणारे आहेत त्यांनी अशी शपथ घेऊ नये की आपल्या नातेवाईक,ख गोरगरीबि व अल्लाहच्या मार्गात हिजरत (देशत्याग) करणाऱ्या लोकांना मदत करणार नाही. त्यांना माफ केले पाहिजे आणि त्याकउे कानाडोळा केला पाहिजे, काय तुम्हाला आवडत नाही की अल्लाहने तुम्हाला माफ करावे ? आणि अल्लाहचा गुण असा आहे की तो क्षमाशील व दयाळू आहे.(२२)

जे लोक शीलवान, अजाण श्रध्दावंत स्त्रियांवर आळ घेतात त्यांचा इहलोक व परलोकात धिक्कार केला गेला आणि तयांच्यासाङ्गी मोङ्गा प्रकोप आहे. त्यांनी त्या दिवसाला विसरु नये की जेव्हा त्यांच्या स्वतःच्या जिभा, त्यांचे हात, पाय त्यांच्या कृत्यांची साक्ष देतील. त्या दिवशी अल्लाह तो बदला त्यांना पुरेपुर देईल ज्याला ते पात्र आहेत आणि त्यांना माहित होईल की अल्लाहच सत्य आहे, खऱ्याला खरे करुन दाखविणारा. (२३-२५)

ाचितच जे पुरुष आणि ज्या स्त्रिया मुस्लिम आहेत, श्रध्दावंत आहेत, आज्ञाधारक आहेत, सत्यनिष्ङ्क आहेत, संयमी आहेत, अल्लाहच्या समोर

झुकणारे आहेत,....

....दानधर्म करणारे आहेत, उपवास करणारे आहेत, आपल्या शीलांचे रक्षण करणारे आहेत, आणि मोङ्ग्या प्रमाणात अल्लाहचे स्मरण करणारे आहेत, अल्लाहने त्यांच्यासाङ्गी क्षमा आणि महान मोबदला तयार ङ्खेवला आहे. (३५)

सदाचार हा नव्हे कि तुम्ही आपले तोंड पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे करावे तर सदाचार हा आहे कि जे अल्लाहवर आणि अंतिम दिवसावर....

....ईमान धारण करतात तसेच सर्व दूतांवर, सर्व ग्रंथ आणि सर्व प्रेषितांवर ईमान धारण करतात ईश्वरी प्रेमापोटी आपल्याला प्रिय असलेली संपत्ती आपले नातेवाईक आणि अनाथ गरजवंत, वाटसरु व याचक तसेच गुलामांच्या मुक्ततेसाङ्गी खर्च करतात आणि नमाज कायम करतात व जकात अदा करतात तसेच दिलेल्या वचनांची पूर्तता करतात आणि अडचणी, संकटे आणि युध्दप्रसंगी देखील संयम राखतात हेच लोक सत्यशील आणि अल्लाहचे भय बाळगणारे आहेत. (१७७)

अल्लाह न्याय, भलाई आणि नातेवाईकांचे हक्क अदा करण्याची आज्ञा देतो, आणि दुष्कर्म आणि स्वैराचार आणि अन्याय व अत्याचाराची मनाई करतो, तो तुम्हाला उपदेश करतो जेणेकरुन तुम्ही बोध घ्यावा. अल्लाहचे करार पूर्ण करा जेव्हा तुम्ही त्याच्याशी एखादा करार केलेला असेल आणि आपल्या शपथा पक्क्या केल्यानंतर मोडून टाकू नका ज्याअर्थी तुम्ही अल्लाहला आपल्यावर साक्षीदार बनविले आहे. अल्लाहला तुमची सर्व कृत्ये माहित आहेत. तुमची स्थिती त्या स्त्रीसारखी होऊ नये जिने स्वतःच परिश्रमपूर्वक सूत कातले आणि मग स्वतःच त्याचे तुकडे तुकडे करुन टाकले. तुम्ही आपल्या शपथांना आपसातील व्यवहारात लुबाडण्याचे शस्त्र बनवितात...

....की जेणेकरुन एका समूहाने दुसऱ्या समूहापेक्षा जास्त लाभ उचलावा. वास्तविकपाहता अल्लाह या करारमदारांच्याव्दारे तुमची परीक्षा घेतो आणि निश्चितच तो पुनरुत्थानाच्या दिवशी तुमच्या तमाम मतभेदांची वास्तविकता तुमच्यावर उघड करील. झर अल्लाहचा हेतू असा असता (की तुमच्यात कोणतेही मतभेद होऊ नयेत) तर त्याने तुम्हा सर्वांना एकच समूह बनविले असते, परंतु तो ज्याला इच्छितो त्याला पथभ्रष्टतेत टाकतो व ज्याला इच्छितो त्याला सरळ मार्ग दाख्वावितो आणि निश्चितच तुमच्याकडे तुमच्या कृत्यासंबंधी विचारणा

झाल्याशिवाय राहणार नाही. (९०-९३)

अल्लाहने जी देणगी तुम्हाला प्रदान केली आहे, त्याची आङ्गवण ङ्केवा आणि त्या दृढवचनाला विसरु नका जे त्याने तुमच्याकडून घेतले आहे, म्हणजे तुमचे हे कथन की ''आम्ही ऐकिले व आज्ञाधारकता स्वीकारली.'' अल्लाहचे भय बाळगा, अल्लाह मनांतील रहस्य देखील जाणतो. हे श्रध्दावंतांनो, अल्लाहसाङ्गी सत्यावर अढळ राहणारे व न्यायाची ग्वारी देणारे बना. एखाद्या गटाच्या शत्रुत्वाने तुम्हाला इतके प्रक्षोभित करुनये की तुम्ही न्यायापासून विमुख व्हाल. न्याय करा, ख्हे ईशपरायणतेशी अधिक निकटवर्ती आहे. अल्लाहचे भय बाळगून कार्य करीत राहा. झे काही तुम्ही करता, अल्लाह त्याची पुरेपूर खबर ङ्केवणारा आहे. जे लोक श्रध्दा ङ्केवतील व सत्कृत्य करतील, अल्लाहने त्यांना वचन दिले आहे की, त्यांच्या चुका माफ केल्या जातील व त्यांना मोङ्गा मोबदला मिळेल. उरले ते लोक जे द्रोह करतील व अल्लाहची संकेतवचने खोटी ङ्करवतील, तर ते नरकात जाणारे आहेत. (७-१०)

तुझ्या पालनकर्त्याने निर्णय दिलेला आहे की तुम्ही लोकांनी इतर कोणाचीही भक्ती करु नये परंतु केवळ त्याची आई-वडिलांशी सद्वर्तन करा, जर तुमच्यापाशी त्यांच्यापैकी कोणी एक अथवा दोघे वृध्द होऊन राहिले तर त्यांच्यासाङ्गी 'ब्र' शब्ददेखील काढू नका व त्यांना झिडकारुन प्रत्युत्तरदेखील देऊ नका. थर त्यांच्याशी आदरपूर्वक बोला, आणि नरमी व दर्यार्द्रतेने त्यांच्यासमोर नमून रहा. आणि प्रार्थना करीत जा की, ''हे पालनकर्त्या, त्यांच्यावर दया कर ज्याप्रमाणे यांनी दया व सात्सल्याने बालपणी माझे संगोपन केले.'' तुमचा पालनकर्ता चांगल्या पकारे जाणतो की तुमच्या मनात काय आहे. जर तुम्ही सदाचारी बनून रहाल तर तो अशा सर्व लोकांना क्षमा करणारा आहे जे आपल्या अपराधासंबंधी सावध होऊन भक्तीच्या वर्तनाकडे परततील. नातेवाईकाला त्याचा हक्क द्या आणि गरीब व वाटसरुला त्याचा हक्क. वायफळ खर्च करु नका. वायफळ खर्च करणारे शैतानचे बंधू होत, आणि शैतान आपल्या पालनकर्त्याशी कृतघ्न आहे....

## मुहम्मद पैगंबरांची वचने

तुमच्या पैकी कोणतीही व्यक्ती तोपर्यंत ईमानधारक होऊ शकत नाही, जो पर्यंत ती आपल्या बांधवांसाङ्गी सुद्धा तेच पसंत करीत नाही, जे स्वतःसाङ्गी पसंत करते.

अन्याय व दुष्कर्म होत असताना दिसल्यास सामर्थ्य असल्यास बलपूर्वक रोखावे. ते शक्य नसेल तर त्यास उपदेश करुन,ख समजाऊन सांगून रोखावे आणि ते सुद्धा शक्य नसेल तर ते वाईट आहे असे समजावे. मात्र हे ईमानच्या सर्वांत खालच्या दर्जाची मात्र हा ईमानचा सर्वात खालचा दर्जा आहे.

अल्लाहने म्हटले, ''हे आदमच्या संतती, जेव्हा तुम्ही क्षमा याचना करता, तेव्हा मी तुमच्या अपराधांना नजरेआड करुन माफ करतो. हे आदमची संतती, आकाशात उङ्गलेल्या आभाळाएवढे जरी तुमचे पाप असेल तर ते मी माफ करेन, मात्र तुम्ही सच्चया मनाने तौबा (क्षमा मून परत चूक वा पाप न करण्याची शपथ) कराल. तसेच माझे अस्तित्व स्वीकार कराल मी तुम्हाला माफ करेन. अल्लाह तुमचा प्राण आणि संपत्ती पाहत नसून तुमचे अंतःकरण आणि कर्म पाहतो.

शमस्त मानव कंगव्याच्या दातांसम समान आहेत. तुम्हा सर्व आदमच्या द्वारे जन्मास घालण्यात आलेले असून आदमची निर्मिती मातीपासून करण्यात आलेली आहे. आणि म्हणूनच कोणताही गोरा कोणत्याही काळयापेक्षा श्रेष्ङ्ग नाही. कोणताही अरब कोणत्याही अरबेतरापेक्षा श्रेष्ङ्ग नाही.

मैदानावर आपल्या शत्रुला पराभूत करणाऱ्यापेक्षाही जास्त शक्तीशाली आपल्या क्रोधावर नियंत्रण मिळविणारा असतो.

एका तरुणाने मुहम्मद पैगंबरांना विचारले, जगामध्ये सदव्यवहाराचा सर्वप्रथम अधिकार कोणाचा आहे?'' तुझ्या मातेचा'', ''त्या नंतर ?'' ''तुझ्या मातेचा,

''त्यानंतर ?'' ''तुझ्या मातेचा''

''त्या नंतर ?' ''तुझ्या पित्याचा'' मुहम्मद उत्तरले.

तुमच्यापैकी सर्वांत जास्त श्रेष्ङ्ग लोक ते आहेत, जे पत्नींशी सद्व्यवर करतात आणि मी तुमच्यात यामुळेच सर्वश्रेष्ङ्ग आहे.

मुहम्मद पैगंबरांना एकदा एकाने प्रश्न केला,

''मुस्लिम भित्रा वा भ्याड असू शकतो का ?''

''होय, असु शकतो !'' प्रेषित मुहम्मद उत्तरले,

"मुस्लिम कंजूश असु शकतो का ?" पुन्हा प्रश्न,

"होय, असु शकतो !" प्रेषित मुहम्मद उत्तरले,

"मुस्लिम खोटारडा असु शकतो का ? पुन्हा प्रश्न,

"नाही ! मुळीच नसु शकतो. "मुहम्मद पैगंबरांनी उत्त्र दिले.

अतिशय जीवघेण्या उन्हांमध्ये एक व्यक्ति विहिरीजवळ तहाणेने व्याकूळ झालेल्या कुत्र्यास पाणी पाजत होता. अल्लाहने त्याचे सर्व पाप माफ करुन त्यास मोक्ष्च दिला.

अल्लाहने म्हटले, "जेव्हा माझा बंदा (उपासक) वितभर माझ्याकडे येतो, मी त्याच्याकडे एक हातभर वळतो. तो हातभर माझ्याकडे वळल्यास मी दहा हात त्याच्याकडे वळतो. तो चालत असल्यास मी त्याच्याकडे धावतच जातो.

खाही गरीब मुस्लिमांनी मुहम्मद पैगंबरांसमोर तक्रार केली की, "हे श्रीमंत पारलौकिक जीवनात प्रत्येक प्रकारचा अनुग्रह प्राप्त करणार. आमच्या प्रमाणेच नमाज, रोजा करुन अनुग्रह प्राप्त केल्यानंतर सुद्‌ध आपली संपत्ती गोरगरीबांवर खर्च करतात. त्यामुळे पुण्यकर्मात ते आमच्यापेक्षा पुढे आहेत (आम्ही त्यांच्यापेक्षा कमी असल्याची आम्हांस मोङ्गी खंत आहे) "तुम्हाला पुण्य मिळविण्यासाङ्गी अल्लाहने बऱ्यांच बाबी तयार केल्या आहेत. अल्लाहची प्रत्येक इबादत पुण्यासाङ्गीच आहे. त्याच्या प्रती कृतज्ञता व्यक्त करणे देखील पुण्य आहे. आपल्या पत्नीची शारीरिक तहाण भागविणे सुद्‌धा पुण्य आहे. चांगले कार्य करणे आणि वाईट कार्यापासून दूर राहणे सुद्‌धा पुण्य आहे. "आपल्या पत्नीशी समागम करण्यात पुण्य कसे?" लोकांनी आश्चर्याने विचारले. "जर अनैतिकरित्या तुम्ही कामेच्छा पूर्ण कराल तर पाप ङ्करेल आणि नैतिकरित्या म्हणजेच आपल्या पत्नीशी समागम कराल तर पुण्य ङ्करेल." मुहम्मद पैगंबर उत्तरले.

**संदर्भ**

११ पकरण पहिले, दुसरे व तिसरे पाहा.

१२ जर अल्लाह लोकांना एक दुसऱ्याच्या द्‌वारे परिवर्तित करीत नसला

असता तर मङ्ग, गिरजा आणि ज्यू प्रार्थना भवन तसेच मस्जिदी, ज्यांत अल्लाहचे जास्त नाव घेण्यात येते, सर्व तुटले असते. (कुरआन, २२-४०)

१३ अल मेहदी : अर्थात ज्याला मार्गदर्शन देण्यात आले, खरा नेतृत्वकर्ता, ज्यांच्या संबंधी हदीस (प्रषित वचन) आलेले आहे की, ते महाप्रलयापूर्वी जगात येतील आणि अस्तिकांचे नेतृत्व करुन त्यांना विजय मिळवून देतील.

# प्रकरण पाचवे
# जीवंत मुद्दे

इस्लाम एक व्यापक धर्म असून मानवीय जीवनाच्या प्रत्येक पैलुशी याचा प्रत्यक्ष्च संबंध आहे. या धर्मात केवळ नमाज आणि मस्जिदीच नसून सामाजिक व्यवहारांस व्यापक स्वरुपात इस्लामने परिपूर्ण मार्गदर्शन केले आहे. मुसलमान सुद्धा याच समाजाचा एक भाग आहे. साहजिकच ते सुद्धा आपली मूल्ये इतरांसोबत सामिल करीत समस्यांचे निराकरण करण्यात यावे, अशी अपेक्षा करण्यात येते.

या प्रकरणात आपण काही समसामायिक मुद्यांवर इस्लामी दृष्टीकोनावर चर्चा करुया. यासाठ्ठी काही निवडक उदाहरणांवर सैदधांतिक आणि अमूर्त विचार सादर करण्यापेक्षा दैनंदिन जीवनासंबंधी इस्लामी मुद्यांवर विचार करुया. यासाठ्ठी निम्नलिखित विषयांची निवड करण्यात आली आहे.

१. आधुनिक विश्व व्यवस्था,

२. जिहाद (धर्मयुद्ध),

३. परिवार आणि यौन क्रांती आणि

४. बायोमेडिकल (जैविक वैद्यकीय) नैतिकता, ज्यात अ) प्रत्यारोपण, ब) अंगदान आणि प्रत्यारोपण, क) मृत्यूची व्याख्या, ड) इच्छा मृत्यू आणि ई)जेनेटिक इंजिनीयरिंग.

**आधुनिक विश्व व्यवस्था**

साम्यवाद (कम्युनिझम) (विशेषतः रशिया मध्ये) संपुष्टात आला वा अयशस्वी ठ्ठरला. परिणामी एक नविन विश्वव्यवस्था अस्तित्वात आली. ख्वारे पाहता साम्यवादाची अशी गच्छंती होण्याची कोणी कल्पना सुद्धा केली नसेल. मात्र

गेल्या अनेक दशकांपासून इस्लामी साहित्यात साम्यवाद व भांडवलशाही या दोन्ही व्यवस्थांवर टीका करण्यात येत आहे. मुस्लिम विचारवंतांनी या दोन्ही व्यवस्थांचे वास्तविक मुल्यांकन करुन या दोहोंतील घातक ऋटया दाखवून दिल्या तसेच हे सुद्धा सिद्ध केले की या दोन्ही व्यवस्था सपशेल अपयशी असून इस्लामची व्यवस्थाच मानवतेला तारु शकते.

साम्यवादाचे अपयश म्हणजे भांडवलशाहीचे प्रबलीकरण असे समिकरण करता येते. या दोनही भौतिकवादी व्यवस्था त्रुटीपूर्ण आहेत. या दोघांच्या अपयशाचे प्रमुख कारण असे की, त्या विशिष्ट समुदायांसाङ्गीच मर्यादित असून भौतिकवादीी आहेत.  या दोन्ही विचारसरणी परस्पर भिन्न असून देखिल व्यक्ती आणि समाज परस्पर संघर्ष करीत असल्याचे या दोन्ही व्यवस्थांच्या दृष्टीत चुकीचे असल्याचे मान्य करण्यात येते. साम्यवादाने समाजासाङ्गी व्यक्तिचा बळी दिला. मुळात एकेक व्यक्ती जोडून तयार झालेले एकक म्हणजेच शेवटी समाज होय.  मात्र व्यक्तीच संपली तर संपूर्ण समाजच ध्वस्त  झाला.

ध्रुसरीकडे भांडवलशाही व्यक्तीस समाजाच्या आदर्शापासून विभक्त ङ्खेवते. परिणामी लोक स्वार्थी होतात, झाले आणि जेव्हा या भांडवलशाहीने संपूर्ण मानवतेला आपल्या सुंदर बाहूपाशात आवळले तेव्हा हिचे अनेक उग्र स्वरुप प्रकट होत गेले.  उदाहरणार्थ वर्ग वर्चस्ववाद, कारपोरेटवाद, राष्ट्रवाद, वर्णवाद, जातीवाद, श्रेष्ङ्कत्ववाद, प्रादेश्किवाद, गुलामी आणि साम्राज्यवाद वगैरे.  भांडवल हे अमर्याद वाढत जावे आणि स्थानिक बाजार कमी पडल्यास तिसऱ्या जगातील बाजारांचा शोध घेतला जावा, ही भांडवलशाहीची प्रमुख विचारसरणी वा तत्व होय.

भौतिकवादाचे प्रतिनिधित्व करणारी शक्ती म्हणजेच डॉलरच्या स्वरुपातील संपत्ती प्राप्त करण्याचा पिसाळपना हा मुळात मुलभूत गरजा पूर्ण करण्यासाङ्गी नसून स्वैराचार आणि विलासीत जीवन जगण्यासाङ्गी आहे. यासाङ्गी स्त्रोतांचे दहन करुन ते नष्ट करण्यात येतात. यात तिसऱ्या जगातील संसाधनांचे शोषण करण्याची मानसिकता असून विपुल प्रमाणात नैसर्गिक संपदेबरोबरच स्वस्त मजूर सुद्धा उपलब्ध असतात.  तिसऱ्या जगातून अधिकाधिक कच्चा माल स्वस्तात प्राप्त करुन यापासून तयार झालेले उत्पादन त्यांनाच अत्यंत महाग दराने विकण्याचा प्रयत्न करण्यात येतो. यासाङ्गी अत्यंत योजनाबद्ध

पद्धतीने अशी नीती तयार करण्यात येते की, त्यांना त्यांच्या स्वतःच्या कच्च्या मालापासून स्वतः निर्माण वा उत्पादन करणे शक्य होऊ नये. शिवाय पहिल्या जगातील या भांडवलदारांच्याच उत्पादनांवर निर्भर होण्यास बाध्य करण्यात येते. या शृंखला चक्रामध्ये अथवा चक्रव्यूहात कायमचे बंदिस्त ङ्केवण्याकरीता आणि त्यांची क्रय शक्ती नष्ट होऊ नये म्हणून त्यांना व्याजावर कर्जाच्या स्वरुपात नविन भांडवल देण्यात येते. दुःख या गोष्टीचे आहे की, कर्जस्वरुपातील हे भांडवल नावापुरतेच गरीबांच्या वाट्याला येते. यावर स्थानिक धनाढ्यंचा वर्ग आणि शासक वर्ग व सनदी अधिकाऱ्यांचा वर्गच डल्ला मारतो. सर्व स्त्रोत याच मूङ्गभर लोकांच्या ताब्यात असतात, एवढेच नव्हे तर यांवर यांचेच अधिपत्य असते. उग्र स्वरुप धारण करणारे भ्रष्टाचार आणि यासम बाबींविरुध्द सर्वसामान्यांत जाणिव निर्माण होऊ नये आणि अन्यायाविरुद्ध 'ब्र' काढणे सुद्धा पाप ङ्करावे अशी व्यवस्था व नियोजन यशस्वीरित्या राबविण्यात येते. शिवाय दोन पकारचे विरोधाभास यांत स्पष्ट होतात. प्रथम असे की, मध्यपूर्वेतील बऱ्यांच देशांत जेवढा पैसा ओतला जातो, तेवढेच ते कर्जबाजारी होतात. शिवाय जगातील मोङ्ग्या लोकशाही शक्ती या एकाधिकारशहाच्या समर्थनात एकजूट होतात. तेथील लोकशाही वातावरण त्या एकाधिकार शहांच्या समर्थनात निर्माण करण्यात येते. अशा परिस्थितीत स्वयायत्ततेसंबंधी सुरु असलेले प्रयत्न हानून पाडण्यासाङ्गी शक्यतेवढे प्रयत्न करण्यात येतात. वेळ प्रसंगी लष्कराचा वापर सुद्धा करण्यात येतो.

पाश्चिमात्य राष्ट्रे जेव्हा दखल देतात, तेव्हा याचा स्पष्ट उद्देश बाह्य भांडवलातील शोषण क्षमता अबाधित ङ्केवणे आणि तिसऱ्या जगातील लोकांना जास्त कर्ज देऊन त्यांच्यातील कर्ज फेडण्याची क्षमता नष्ट करुन वेङ्गीस धरणे, एवढाच असतो. याविषयी होणारी आंदोलने बलपूर्वक चिरण्यात येतात. पाश्चात्य देश अशा पकारे आंदोलने चिरडण्याची कृती न्यायपूर्ण ङ्करवितात. आंदोलनकारी स्वतःचे नुकसान करुन घेत असल्याचा जोरजोरात गवगवा करण्यात येतो. आजपर्यंत अशां आंदोलकांना साम्यवादी असण्याचे नाव देऊन केवळ नाकारण्यात येत असे, मात्र साम्यवादाच्या संपुष्टात आल्यानंतर अशां आंदोलनांना इस्लामी मूलतत्ववाद असे नांव देण्यात आले.

यासंबंधी अतिव्यापक प्रसारमाध्यमे ही मोङ्ग्या भांडवलदारांच्या हाती असून त्यांचा उपयोग जनभावना प्रभावित करण्यासाङ्गी करण्यात येत असतो. आजपर्यंत पाश्चिमात्य जनता हे प्रलोभन कोणतीही शंका न बाळगता घशाखाली

सोउत आणि यापुढे जाऊन आपल्या दिशाधोरण ङ्करविणाऱ्यांचे समर्थन करीत होती. मात्र ही बाब अजूनही त्यांच्या लक्षात येण्यास बराच उशीर होत आहे की, या भांडवलशाहीच्या क्रूर ध्येयधोरणामुळे केवळ तिसऱ्या जगातील लोकांनाच नव्हे तर त्यांना स्वतःला देखिल प्रचंड नुकसानाची झळ पोचत आहे, नव्हे अक्षरशः होरपळून निघत आहे. भांडवल अधिक वाढवित ङ्केवणे आणि डॉलर आणखीन वाढवित ङ्केवणे एवढाच एकमात्र या भांडवलशाहीचा उद्देश होय. यामुळे अमेरिकेत सुद्धा बेरोजगारीचे प्रमाण वाढतच आहे. कारण स्वस्तात मिळणारे मजूर ज्या ङ्गिकाणी असतील तेथे कारखाने स्थलांतरित करण्यात आले आहे. यामुळे त्यांचे उत्पन्नाचे दर कमी होऊन नफयाचे प्रमाण प्रचंड वाढत आहे. स्वतः अमेरिकेमध्येही या स्वस्त दरात तयार झालेला माल वा उत्पादन महागडया दरात विकण्यात येत आहे. शिवाय बेरोजगारांना तर हा माल घेण्याची ऐपत नसल्याने शोषणाने उग्र स्वरुप धारण केलेले आहे.

अशा पकारची बेलगाम आणि स्वैर भांडवलशाही कधीपर्यंत शोषण करीत राहणार, हे सांगता येत नाही. परिणामी एखाद्या दिवशी विध्वंसाचा विनाषकारी स्फोट होणे मात्र निश्चित. ही शक्यता आज तरी नजरेआड करण्यात येत आहे. सोन्याची अंडी देणारी कोंबडी म्हणजेच तिसरे जगत सुद्धा आटत चालले आहे. याचे भयानक परिणाम संपूर्ण जगालाच भोगावे लागत आहे.

यासाङ्गी केवळ वातावरण निर्मिती पुरेशी नसून हृद परिवर्तनाची नितांत गरज आहे. जोपर्यंत भौतिकवादाचा प्रभाव असेल तोपर्यंत साधारण उपचाराने काहीही होणार नाही. वेळ निघून जात आहे आणि उत्तर विरुद्ध दक्षिण, शोषक विरुद्ध शोषित, श्रीमंत विरुद्ध गरीब, धवल वर्णीय विरुद्ध कृष्णवर्णीय आणि मालक विरुदध नोकर असा संघर्ष पेटलेलाच असणार. अशा पेटत्या परिस्थितीत आणि हा संघर्ष संपेपर्यंत भविष्यातही कोणत्याही प्रकारची आशा बाळगता येत नाही. शेवटी संपणार तर सगळेच. या विनाषकारी वादळात गरीब-श्रीमत, लहान-मोङ्गा सर्वच संपून जातील.

म्हणे जागतिक स्तरावर राजनितिज्ञ आणि भांडवलदार स्वतःच्या भांडवलशाही धोरणांत अमूलाग्र बदल घडविण्यासाङ्गी आवश्यक दूरदृष्टी आणि विचार शक्ती बाळगतात. मात्र यात मुळीच तथ्य नसून यांची अंधळी लालसा आणि अहंकार मानवसतेस भस्म करुनच दम घेईल.

अशा परिस्थितीत इस्लामची भूमिका अत्यंत महत्वपूर्ण आहे. सर्व प्रथम

हा विचार मनातून काढून टाकावयास हवा की माध्यमांनी प्रत्येक इस्लामी विचारवंतावर चढविलेला आतंकवादाचा मुखोटा खरा आहे. इस्लामी विद्वान गेल्या अनेक दशकांपासून वर्तमान समस्यांवर समाधान काढण्याचा विचार करीत आहेत. हे समाधान केवळ मुस्लिमांसाङ्गीच नसून इसलामी तत्वांनुसार सर्वच मानवजातीसाङ्गी आहे. याची प्रमुख्वा तत्वे खाली देण्यात येताहेत.

## मानवांवरील अधिकार

मनुष्य हा स्वतः प्रधान नसून तो एका सर्वशक्तीमान व सर्वव्यापी अल्लाहसमोर उत्त्रदायी आहे. त्यास शेवटी आपल्या प्रत्येक कर्माचा जाब द्यावा लागणार आहे. दोस्तोवस्की याने म्हटले आहे की, जर अल्लाह समोर जाब देण्याची जाणिव नष्ट झाली तर प्रत्येक अनैतिक नैतिक होऊन बसेल. माणसास अल्लाहचा विसर पडल्यास तो स्वतःचीच उपासना करीत असतो. खरे पाहता मानव हा अल्लाहचा प्रतिनिधी असून त्याच्या आदेशाचे पालन करणे हा माणसातील स्वभावगुणधर्म आहे. याच आदेशानुसार या जगाचे नेतृत्व करावे आणि वागावे. आपल्या स्वैर इच्छांना जागा देऊ नये. विज्ञान अद्यापही अर्धवट असून अपरिपक्व आहे. यामुळे मानव आपली मनमानी करु शकत नाही.

## वस्तुंचे स्वामित्व

जगाचा निर्माता केवळ अल्लाह असून तोच समस्त सृष्टीचा मालक व स्वामी होय. आपली संपत्ती नैतिक आणि वैध स्वरुपात मिळविण्याची व बाळगण्याची आपणास मुभा असली तरी हे विसरता कामा नये की, यासाङ्गी देखील आपण जवाबदार आहोत. संपत्तीत वाढ होण्याबरोबरच ती समाजासाङ्गी खर्च होणे गरजेचे आहे व यासाङ्गी आपण उत्तरदायी आहोत. साम्यवाद आणि भांडवलवाद या दोन्हींच्या विचारसरणीनुसार व्यक्ती व समाजादरम्यान संघर्ष आहे. मात्र इस्लाम हे मान्य करीत नाही. येथे दोघांतील साम्य आणि न्यायादरम्यान संतुलन आहे. हे संतुलन बळाचा वापर करुन स्थापन करण्यात येत नसून अल्लाहची प्रसन्नता मिळविण्याच्या आंतरिक आस्थेने व प्रेरणेने वंशीभूत होऊन करण्यात येते. अल्लाहचे अस्तित्व अविनाशी असून भौतिकवादी दृष्टीकोनानुसार ही बाबच अर्थहिन आहे.

भांडवलवाद आणि साम्यवादाच्या ‘माणुस वा व्यक्ती आणि समाजात संघर्ष आहे’ या संयुक्त विचाराला इस्व्लाममध्ये मुळीच थारा नाही. यांत दोघांत

संतुलन कायम राखून समान रुपाने न्यायपूर्ण भूमिका घेण्यात आली आहे. हे संतुलन कायद्याचा बडगा उगारुन नव्हे, तर अल्लाहच्या प्रसन्नतेखातर कायम करण्यात येतो आणि यामुळे आंतरिक समाधान प्राप्त होते.

इस्लामची धार्मिक आस्था अशी आहे की, श्रीमंतांच्या संपत्तीत गोरगरीबांचा सुद्धा पूर्ण अधिकार आहे. कारण माणुस श्रीमंत असो की, गरीब असो, प्रत्येकजण परावलंबी व परस्पर निर्भरच असतो. समाज बांधणीचा हाच प्रमुख दुवा आहे. मात्र वासतविक मुल्यरहित, आदर्शविहिन शिकवणी व माध्यमलहरींनी प्रभावित द्विीय खलीफा उमर यांनी घोषणापत्र काढले होते की, जर एखादी व्यक्ती जर उपासमारीला बळी पडून मृत्युमुखी पडली तर त्या वसतीतून बळजबरी टॅक्स वसूल करण्यात येईल आणि असे गृहित धरण्यात येईल की, त्यास त्या वसतीतील सर्वांनी मिळून ङ्गार मारले. मुहम्मद पैगंबरांनी म्हटले की, संपूर्ण समाज एका शरीराप्रमाणे असून एखाद्या अवयवास क्षती पोचली तर पूर्ण शरीर तापाने फणफणते. प्रत्येकास जगण्याचा समान अधिकार असून किमान स्वतःचे भरण-पोषण सहजरित्या होण्यापुरती साधने प्राप्त होणे आवश्यक आहे. भिक्षा मागणे हे अतिशय वाईट असून रोजगार प्राप्ती व प्रत्येकाचा अधिकार असल्याचे इस्लामने म्हटले आहे. श्रम वाचविणारे तंत्र निश्चितच फायदेशीर असून यामुळे मजूरांच्या श्रमाची बचत सुद्धा होते. मात्र मजूर बेकार होण्यासारखी परिस्थिती निर्माण होण्याइतपत तंत्राचा वापर करता कामा नये. यासंबंधी सार्वजनिक कल्याणाची भूमिका घेणे अनिवार्य ङ्गरविण्यात आले आहे. मजूरांची आर्थिक शक्ती एवढी पबळ व्हावी की कंपनीचे शेयर्स वा अंश खरेदी करणे त्याच्यासाङ्गी शक्य व्हावे आणि यामुळे भांडवलाचे ध्रुवीकरण होता कामा नये.

इस्लामचे द्विीय तत्व असे की, प्रत्यक्ष पैशाने पैसा निर्माण न होता पैसा वृद्धीसाङ्गी तो उद्योगात निवेश करण्यात यावा. म्हणूनच व्याजाचा व्यवहार इसलामने सक्तीने निषिद्ध ङ्गरविले आहे. यावर बरेच प्रयत्न सुरु असून यूरोप आणि अमेरिकेसारख्या देशांत व्याजमुक्त बॅंका यशस्वीपणे चालविण्यात येत आहेत.

**शमता, स्वातंत्र्य आणि बंधुत्व**

जगाच्या पाङ्गीवरील सर्वच मानव एकाच माता-पित्याची (हव्वा आणि आदम) ची संतती असून ते परस्पर समान आहेत. अगदी लहानपणापासूनच हे तथ्य

मुलांना शिकविण्यात यावे आणि यातून सर्वजण जन्मतःच समान असण्याची जाणिव निर्माण करावी. दुर्दैवाची बाब अशी की, अमेरिकेमध्ये श्वेतवर्णीयांनी श्वेतवर्णीय श्रेष्ङ असल्याचे पुरावे तयार केले आहेत. हे पुरावे आणि पमाण आजच्या आधुनिक काळात निंदनीय आणि मानवाधिकार विरोधी असले तरी शिवाय यास कोणताही वैज्ञानिक वा तार्किकपुरावा नसला तरी गौरवर्णीय वा गोरे लोक यावरच आडून बसलेले आहेत. या पमाण व पुराव्यांना ते वारसा अधिकाराचा मुलामा देऊन त्यास धार्मिक किनार सुद्‌धा देण्यात आलेली आहे. ईसा पैगंबरांचे चित्र दाखवून ते गोरे होते व त्यांचे डोळे निळे होते, असा तर्क मांडून ते वर्णश्रेष्ङत्वाचे जोरजोरात नगारे बडवित आहेत. या उलट पॅलेस्टाइनी नागरीक हे गव्हाळ वर्णीयस असल्याने श्वेतवर्णीयांपेक्षा कनिष्ङ असल्याची भूमिका मांडण्यात येत आहे.

यूरोपात वर्ण व वंशवाद असून त्या विरोधात हवे तेवढे प्रयत्न होताना दिसत नाहीत. अमेरिकेत पूर्णपणे गुलामी संपलेली नाही. यामुळे प्रत्येक नागरीकास समान अधिकार प्राप्त नाहीत.

अमेरिकेत एखाद्या गोऱ्याने कोणया कृष्णवर्णीयाची माफी मागितलेली नाही. वर्णभेदामुळे गौरवर्णीयांची प्रचंड बदनामी होत असूनही ते जुमानत नाहीत. यामुळे प्रचंड तनाव निर्माण होत असून परिणामी लॉस एंजेल्स मध्ये दंगली उसळल्या. ज्या ज्या वेळी अमेरिकेत कृष्णवर्णीयांच्या समर्थनात एखादे आंदोलन उभे राहते, त्या त्या प्रसंगी पाहिजे तसे समर्थन न मिळाल्याने त्यास यश मिळत नाही. गोळीबार आणि डॉलरची सुबत्ता हा काही उपाय नसून वैचारिक परिवर्तनाशिवाय ते शक्य नाही.

प्रभावी परिवर्तनासाङ्गी नव उप-निवेशवादी राष्ट्रांना पुनर्शिक्षित करुन तिसऱ्या जगाच्या विकासाशी सांगड घालणे आवश्यक आहे. तिसऱ्या जगातील उपासमारी संपविण्यासाङ्गी आवश्यक असलेल्या राशीपेक्षा कितीतरी जास्त पटीने अमेरिकेत शेतकऱ्यांना अनुदान देण्यात येते. मात्र याकडे हेतूपुरस्सर दुर्लक्ष्च करण्यात येते.

## आत्मनिग्रहाची गरज

झागतिक स्तरावर माणसातील आत्मनिग्रहाची प्रवृत्ती तीव्रगतीने कमी होत आहे. माणुस आणि पशुमध्ये मोङ्ग्याप्रमाणात फरक असून सुद्‌धा माणसाची

मानसिक परिस्थिती अतिशय गंभीररित्या खालावली आहे. एकदा एका तरुणाने कार मधील लोकांना गोळया झाडून ङ्गार केले. त्याला अटक केल्यावर याचे कारण विचारले असता 'कोणास तरी ङ्गार करावे असेच वाटत होते', अशा शब्दांत त्याने उत्तर दिले. यासंबंधीचे हे काही एकच उदाहरण नाही. अशी बरीच उदाहरणे आहेत. अर्थात तेथील लोक विध्वंसक प्रवृत्तीकडे वळत आहेत. ङ्गोस मानवीय मुल्यांच्या अभावास्वरुपी समाजात निध्वंस माजलेला आहे.

शिक्षण आणि माध्यमांच्या सहकार्याने ही परिस्थिती बदलणे शक्य आहे. यासाङ्गी अल्लाहसमोर जाब देण्याची जाणिव असणे नितांत आवश्यक आहे. यातूनच हिंसा, रक्तपात,, मारामाऱ्या, अश्लिलता वगैरे बाबींना उत्तेजन देणाऱ्या माध्यमांवर देखील याची जवाबदारी असून व्यभिचार आणि दृष्कृत्यांप्रती चीड निर्माण करणे आवश्यक आहे.

दुर्देवाने काही देश आपल्या तरुण नागरीकांत अश्लिलतेचे आकर्षण निर्माण करुन सभ्यता आणि सुशीलतेचा बळी देत आहेत.

## युद्ध आणि शांती

इस्लामने युद्धाचे नियम अतिशय स्पष्टपणे दाखविण्यात आले आहेत. स्वतः मुहम्मद पैगंबरांनी या नियमांचे प्रत्यक्ष दर्शन घडविले आहे. या नियमांनुसार आत्मरक्षणात्मक युद्ध असो की अन्यायाचे दमन करणारे युद्ध असो, यांत निष्पाप वा शत्रुपक्षांत सामिल नसलेल्यांना तसेच पर्यावरणाला कोणत्याही प्रकारची क्ष्चाती पोचत नाही. अत्याचारांवर आळा घालण्याचा आदेश गुरआनात देण्यात आलेला आहे की, ''जरी तुमच्या आपसांत (ईमानधारकांत) दोन गटांत बिनसले असल्यास दोघां दरम्यान तडजोड घडवून आणावी. यानंतर जर एखादा गट वरचढपणा करीत वा अतिरेक करीत असेल तर त्याच्याशी तो न्यायाकडे वळेपर्यंत युद्ध करा आणि तडजोड करा. त्यांच्या दरम्यान न्याय करा. निश्चितच अल्लाह न्याय करणाऱ्यास पसंत करतो.'' (कुरआन, ४९, ०९)

बिंगरमुस्लिमांबरोबर सद्भावना आवश्यक असते, जशी मुहम्मद पैगंबरांनी मदीनेच्या ज्यूंबरोबर सलोखा निर्माण केला होता निश्चितच बाहेरील शक्तींविरुद्ध र्वांनीच एकजूट होणे आवश्यक आहे. इस्लामपूर्वीच्या

एका तडजोडीचे उदाहरण सुद्धा आहेच. मुहम्मद पैगंबरांनी तेथील काही कबिल्यांशी करार केला होता की आम्ही शोषितांच्या व उत्पीडीतांच्या सोबत राहणार. मुहम्मद पैगंबरांनी असे म्हटले होते की, नंतर देखील अशी परिस्थिती उद्भवल्यास आम्ही शोषितांबरोबरच उभे राहणार. त्यांनी लष्करास आदेश दिले होते की, केवळ लष्करी जवानांशीच युद्ध करावे महिला, मुले आणि वृद्धांना थोडा जरी त्रास झाला तर याची शिक्षा देण्यात येईल. जे बिगर मुस्लिम त्याच्या मङ्ग विहार वा धार्मिक स्थळात पूजापाङ्ग करीत असतील त्यांना देखिल त्रास देण्यात येणार नाही. वृक्ष आणि पिकांना जाळण्यात वा क्षती पोचविण्यात येणार नाही. वैध अन्न मिळविण्याच्या हेतुशिवाय कोणत्याही प्राण्यास साधी इजाही पोचविली जाणार नाही. या तत्वांची समीक्षा करताना सद्याच्या युद्धाच्या परिस्थितीवर रक्ताचे आश्रु गाळावे लागतात. तीसाच्या दशकातील स्पेनच्या गृहयुद्धात आणि नंतरच्या दुसऱ्या महायुद्धात तसेच कोरिया, विएतनाम आणि नागासाकी व हिरोशिमा संबंधी विचार केला तर शत्रुंपक्षांपेक्षा जास्त निष्पापांना प्राण गमवावे लागले व पर्यावरणाचे प्रचंड नुकसान झाले.

काही जणांना वाटते की, इस्लामी आदर्श म्हणजे केवळ कल्पनाविलास असून यास प्रत्यक्षात लागु करणे शक्य नाही. मात्र मुस्लिमजगत काही वेगळाच विचार करीत आहे. कारण युद्ध अत्यंत विनाशकारी झालेले असून युद्धाचा विचारच आता नष्ट व्हावयास हवा. ज्या प्रमाणे गुलामी प्रथेचे उन्मूलन करण्यात आले, नरबळी आणि सतीची प्रथा बंद करण्यात आली, त्याच प्रमाणे युद्धाविषयीचा मुद्दा देखिल इतिहासजमा व्हावा. नविन जागतिक व्यवस्थेची घोषणा सैनिकांच्या मोङ्ग्या प्रमाणातील संपाच्या काळात झाली.

आज एकेविसाव्या शतकात मानव अतिशय प्रगत झाला असून नविन जागतिक व्यवस्थेत युद्धला मुळीच स्थान नसावे आणि शांती स्थापनेसाङ्गी इतर अनेक प्रकारच्या उपाययोजना करता येतील. हे काही स्वप्न नसून निश्चितच शक्य आहे.

स्वतंत्र न्यायालयांमार्फत आंतर्राष्ट्रीय आंतरराष्ट्रीय स्तरांवरील सुरु असलेले वाद विवाद सोडविता येण्याची शक्यताही तपासून पाहता येईल. हे ही तेवढेच खरे आहे की, युद्धाध्ये चांगले आणि वाईट सर्वच बरोबर समजले जाते. आपली विध्वंसक, शक्तीच्या प्रदर्शनाशिवाय दुसरे काहीही नसते. युद्ध केवळ

आपल्या विध्वंसक शक्तीचे प्रदर्शन करीत असते. न्याय मिळविण्यासाङ्गी आधुनिक न्यायालयांची स्थापना करुन दोन समुदांतर्गत तंटा सोडविणे सुद्धा शक्य आहे. त्यात संयुक राष्ट्रसभा आणि सुरक्षा परिषदेचा अंतर्भाव नसावा. सभ्य राष्ट्रांनी अगोदर स्वतः सभ्यता स्वीकारावी, केवळ याच एकमेव कारणकेंद्राभोवती न्यायाच्या यशस्वतीतेची धुरा अवलंबून आहे. हे त्रिकारदर्शी सत्य आहे त्याच पमाणे या सत्याचा कोणीही विरोध करीत नाही. मात्र याचा विरोध प्रखरपणे होत असतो हे सुद्ध एक मोङ्गे उघड सत्य आहे. आणखीन एक सत्य असे की, सत्य हे मूल्य आहे आणि सध्याच्या राजकारणातील समस्त मुल्यांच्या अगदीच विरुद्ध आहे. आज आपल्यांसमोर सर्वात मोङ्गी समस्या हीच आहे.

न्यायप्राप्तीसाङ्गी ज्याची लाङ्गी, त्याची म्हैस, हा सिद्धांत स्वीकारावा का, हा देखिल प्रश्न पडतो. सैन्याबरोबर असलेल्या उद्योगांची आघाडी या निर्णयाचे औचित्य सिद्ध करण्यासाङ्गी आपल्या स्वार्थाचा बळी देइल का? जगातील संसाधनाचे स्त्रोत आपसांत वाटून घेण्यास न्यायसंगत असल्याचे मान्य करावे का ? यां सारख्या समस्त प्रश्नांची उत्त्रे 'नाही' असेच असतील. कारण यामुळे नविन विश्व व्यवस्थेच्या कर्णधारांची परिवर्तन घडून येईपर्यंत बदनामीच होणार. शिवाय असे परिवर्तन सामान्यजणांकडून घडून येत असतात.

धनाढय आणि गर्भ श्रीमंतांचा एकच उद्देश असतो. श्रीमंताने आणखीन खूप श्रीमंत होत जावे आणि गरीबाने आणखीन गरीब होत जावे. श्रीमंतांच्या प्रत्येक वैध अवैध गरजां आणि स्वैरइच्छा कोणाच्या रक्ताने का होईना, पूर्ण व्हावयास पाहिजे. स्वतःच्या क्षणिक आनंदासाङ्गी लोकांचे, सामान्यांचे मुडदे पडले तरी चालेल. या उद्दिष्टपूर्तीस्तव तयार करण्यात आलेल्या कारखान्यांचे जगत सामान्यांना जगण्यासाङ्गी आवश्यक परिस्थितीमध्ये अक्षरशः विष कालवित आहे. पर्यावरणासहित जगण्याच्या संधी पार नष्ट करीत आहे. हे सर्व विनाषकारी परिस्थिती अशा युगात अवतरलेली आहे, ज्या युगात विज्ञान आणि तंत्रज्ञान चंद्र आणि मंगळावर पाण्याचे झरे शोधत आहे. याचे भोग आपल्या येणाऱ्या अनेक पीढयांना भोगावे लागणार आहेत. या जुल्मी जोखडातून मुक्त होण्याचे मार्ग सुद्धा अनेक आहेत. मात्र शक्तीशाली आणि प्रबळ लोकांनी हे मार्ग बंद केले आहेत. या लोकांच्या स्वैर, लालसेने पिसाळलेल्या, निर्दयी, स्वार्थी, मारक आणि निबुद्ध भांडवलवादासंबंधी कुरआनाने म्हटले आहे, ''लोकांमध्ये कोणीतरी असा आहे, जो ऐहिक जीवनासंबंधी शिकवण

देतो आणि ती गोष्ट तुम्हाला खूप आवडते, ती गोष्ट खोटी असून सुद्धा तो अल्लाहला साक्षी ङ्खरवितो आणि भांडणाच्या वेळी तो खूप हट्टी असतो. मग यानंतर तो जगामध्ये बिघाड निर्माण करण्यासाङ्गी आणि शेती व वंश ध्वस्त करण्यासाङ्गी जे अल्लाहला मुळीच पसंत नाही, प्रयत्न करतो. (कुरआन, २, २०४-२०५)

प्रचंड प्रमाणात होत असलेल्या विरोधाला न जुमानता आज परिस्थिती सुधारण्याचे प्रयत्न होत आहेत. १९९० साली पृथ्वी दिनाचे औचित्य साधून जगातील ४० देशातील तब्बल शंभर कोटी लोकांनी पृथ्वीशी संबंधीत या मुद्यावर जबरदस्त प्रदर्शन केले. ही घटना राजकारण्यांसाङ्गी नजरेआड करण्यासारख्याी नसून हा मत घेण्याच्या राजकीय स्वार्थाशी निगडित असलेला मुद्दा होता. जगातील सर्वच देशांना सोबत घेऊन न्यायावर आधारीत परिस्थिती निर्माण करण्याची हीच नेमकी वेळ आहे.

**लोकसंख्याविषयी समस्या**

जगातील लोकसंख्या प्रचंड प्रमाणात वाढत आहे. हे प्रमाण उपलब्ध स्त्रोतांपेक्षा खूप जास्त असून ही चिंता भेडसावणारी आहे. तिसऱ्या जगातील लोकसंख्या जास्त असल्याने पाश्चात्य देश त्यांच्यावर बळजबरी करीत असतात. जे देश गरीब देशांना आर्थिक मदत करीत असतात ते त्यांच्यावर कारवाईचा बडगा उगारण्याचे समर्थन करीत असतात. एवढेच नव्हे तर त्यांच्या अर्थसहाय्यास जन्मासंबंधी कायद्याशी जोडण्याच्या मानसिकतेतून अमेरिका आपले धोरण ङ्खरवित आहे. डॉ.मार्टिन ने आपल्या ‘मेकियावेही डॉक्टर्स साङ्गी पाखंडीपेक्षा चांगले मार्गदर्शक होऊ शकते का ?‘ या लेखामध्ये लिहिले की तिसऱ्या जगात खूप अधिक प्रमाणात मुले जन्माला घालण्यात येत असल्याने नैसर्गिक स्त्रोतांचा खूपच अधिक वापर होत आहे. यामुळे दुष्काळसदृश परिस्थितीला सामोरे जावे लागत आहे. शिवाय त्यांच्यात बालमृत्यू दर कमी असल्याने सतत लोकसंख्या वाढत आहे.

जे कुटुंब स्वेच्छेने कुटुंब नियोजन करीत असेल, त्यावर कोणताही आक्षेप नाही. शिवाय लोकसंख्या वाढीचा आरोप केवळ तिसऱ्या जगावर ङ्केवणे तर्कसंगत होणार नसून ही समस्या सर्वव्यापी आहे. स्टॅनफोर्ड विद्यापीङ्गातील जैवविज्ञानाचे प्राध्यापक पॉल आणि एन. एलरिच यांनी नॅशनल जॉग्रफी मध्ये लिहिले की अमेरिकेत जन्मलेले मूळ बांगला देशासारख्या गरीब देशात

जन्मणाऱ्या शंभर मुलांपेक्षा जास्त स्त्रोतांचा वापर करतो. त्यांनी असेही म्हटले आहे की, एकीकडे वाढती लोकसंख्वया गरीब देशांना प्रगती करु देत नाही तर दुसरीकडे श्रीमंत देशांतील लोकसंख्या ही जगातील सभ्यता विकसित करण्याची क्षमता नष्ट करीत आहे.

बुखारेस्ट मध्ये १९७४ साली जगातील वाढत्या लोकसंख्येवर आयोजित परिषदेत तिसऱ्या जगातील लोकसंख्या दरवाढीवर चर्चा झाली. इतिहासाच्या अनुषंगाने यूरोपमध्ये जन्मदर खालावण्याची मारणमिमांसा करण्यात आली. प्रगतीच्या लालसेपोटी प्रजनन क्षमता कमी झाली मात्र या प्रभवामुळे जनमदर कमी होऊन सुद्धा प्रगती झाली नाही, असा एक सर्वसाधारण समज. तरी सुद्धा समृध्द राष्ट्रे आणि भांडवलशाह देश प्रजनन व्यवस्थेवर अंकुष लावण्याची प्रचंड धडपड करीत असतात, जे योग्य नाहीच मुळी.

शेवटी असा विचार करणे आवश्यक आहे की, अधिक समृद्ध राष्ट्रांनी आपल्या विलासवादी व चांगळवादी जीवन त्याग करावे आणि गरीब देशांच्या मूलभूत गरजां पूर्ण कराव्या.३ जग जवळ येत असून इतर राष्ट्रांतील अंतर कमी करुन आंतरिक आनंद मिळविण्यासाङ्गी हा सर्वोत्तम उपाय आहे. निश्चितच अल्लाह समाता प्रस्थापित करेल.

**जिंहाद :**

इस्लाम मध्ये जिहाद या शब्दाचा अर्थ धर्मयुद्ध्द, पवित्र युद्ध वगैरे असा काहीही नाही. सुरुवातीस पाश्चात्य माध्यमांनी हा जिहाद शब्द क्रूसेड वॉ रच्या प्रसंगी मुस्लिमांच्या विरुद्ध्द होत असलेल्या रक्तरंजित युद्ध्दा करीता वापरला होता. यास त्यांनी क्रूसेड वॉर व्यतिरिक्त होलीवॉर, पवित्र युद्ध्द आणि धर्मयुद्ध्द असेही शब्द वापरले होते, खरे पाहता इस्लामी शब्दावलीनुसार 'जिहाद' या इस्लामी शब्दाचा अर्थ 'संघर्ष' असा होतो.

जिंहाद म्हणजे 'संघर्ष', जो स्वतःतील दुष्प्रवृत्ती, दुर्गुण, वाइट वसयी वगैरे नष्ट करण्यासाङ्गी करण्यात येतो. एक मुस्लिम स्वतःमध्ये सुधारणा घडवून आणण्याकरीता आणि यासोबतच संपूर्ण समाज व देश आणि समस्त विश्वामध्ये सुधारणा घडवून आणण्यासाङ्गी जिहाद करतो आणि यास प्रत्येक राष्ट्राचे अनिवार्य कर्तव्य ङ्करविण्यात आले. नेकी आणि दुष्कृत्यापासून रोखणे अशी शिकवण कुरआनात (३, १०४) दिली आहे. हे कर्तव्य केवळ मुस्लिमांपुरते

मर्यादित नसून हे समस्त मानवजातीचे परम कर्तव्य आहे. कारण या जगामधील प्रत्येकजण अल्लाहचा प्रतिनिधी आहे. हे सत्कार्य जर मुस्लिमेतर समाजाने केले तरी मुस्लिमांना या कर्तव्यापासून मुळीच सूट नाही. आधुनिक जगातील समस्त वैधानिक, राजनीतिक, आर्थिक व समस्त संसाधनांचा वापर या सत्कार्यासाङ्गी करता येऊ शकतो.

घरज पडल्यास दुष्कृत्य रोखण्यासाङ्गी बळाचाही वापर करता येणे हे निषेधार्ह मुळीच नाही. आक्रमणकारींना रोखण्यासाङ्गी आणि शांती स्थापन करण्यासाङ्गी कुरआनाने मार्गदर्शक व्यवस्था प्रदान केली आहे ती याप्रमाणे, ''जर दोन ईमानधारक आपसांत लढत असतील आणि एक समुदाय प्रतिपक्षिय समुदायावर अत्याचार करीत असेल तर तुम्ही अत्याचार करणाऱ्या समुदायाविरुद्ध लढावे. येथपावेतो की तो अल्लाहच्या आदेशाकडे येत नाही.'' (कुरआन ४९-९) अर्थातच लष्कराचा वापर सामान्यांसाङ्गी मुळीच नसून ते बंडखोर गटाविरुद्ध असण्याचा नियम आहे. शिवाय मुहम्मद पैगंबर जव्हा लष्करी युद्ध करुन परतले तेव्हा आपल्या सोबत्यांना आज्ञा दिली की आपण छोटया जिहाद कडून मोङ्या जिहाद कडे (अर्थात स्वतःतील दुष्प्रवृत्तीं विरुद्ध युद्ध करणे) परतत आहोत.

माध्यमांनी गवगवा केल्याप्रमाणे जिहाद हे ख्रीस्ती आणि ज्यूंच्या विरुद्ध मुळीच नाही. राजकारण्यांच्या इशाऱ्यावर माध्यमांनी जिहादचे विकृतीकरण करुन दाखविले आहे. इस्लाम कधीही इतर धर्मीयांविरुद्ध युद्धाची शिकवण देत नाही. मग ख्रीस्ती आणि ज्यूं तर इब्राहीमी धर्माच्या पालनकर्त्यांत समाविष्ट असल्याने मुस्लिमांचे भाउबंद आहेत. तेव्हा त्यांच्या विरुद्ध लढण्याचा प्रश्नच नाही हे तीन्ही जागतिक धर्म असून एकाच अल्लाहची उपासना करतात.

एक न्याययुक्त संघर्ष (युद्ध) इस्लामी तत्वांनुसार व्हावयास पाहिजे मात्र वर्तमानकाळातील युद्धांत इसमी तत्वांचे पालन होत नाही आणि म्हणूनच युद्ध ऐवजी आता दुसरा पर्याय आवश्यक आहे. तो असा की जगातील समस्त राष्ट्रांनी एका सार्वजनिक विचारणीवर एकत्रित व्हावे आणि परस्पर सामंजस्याने न्यायपूर्ण भूमिका घेऊन परस्पर संबंध सुधारण्यात यावे. बळाचा वापर अंतिम साधन होऊ शकत नाही.

आज हे मान्य करावेच लागते की जगातील समसत राष्ट्रे, मग ती मुस्लिम असो, ख्रिस्ती असो की ज्यूं वा अन्य कोणीही असो, कोणीही आपल्या धर्मांच्या

तत्वांचा आदर करताना दिसत नाहीत. आपण सतत चुका करीत आहोत. याही पुढे जाऊन शक्तीशालींनी दुर्बलांचे प्रचंड प्रमाणात शोषण करीत ही शृंखला सुरुच ङ्केवण्याची व्यवस्था करुन ङ्केवली आहे. यामुळेच मानवतावादी व स्वातंत्र्यानुरुप चांगल्या, न्यायसंगत शिक्षणाची खूप गरज भासत आहे. याच्या माध्यमाने आर्थिक व राजकीय लालसांवर विजय प्राप्त करता येण्याची शक्यता आहे.

**परिवार आणि यौनक्रांती :**

मुहम्मद पैगंबरांनी म्हटले, माणुस हा एक स्त्री आणि एक पुरुष मिळून तयार झालेला असतो. दोघांच्या वैवाहिक बंधनातून परिवार तयार होते. ''पाण्याच्या एका थेंबात हायड्रोजन आणि ऑक्सिजन दोघे सोबत असतात. मुस्लिम, ज्यू आणि ख्रीस्ती धर्मीयांत अशीच समान मान्यता आहे.

वैवाहिक नाते हे पती-पत्नीच्या परस्पर विश्वास आणि प्रेमाचे नाते असते. यातूनच परिवार निर्माण होतो. यातून मुलांच्या जन्मास कायदेशीरन मान्यता प्राप्त होते. परिवार नावाच्या या संस्थे मार्फत मुलांचे भरण पोषण आणि शिक्षण प्रशिक्षण होत असते.

माता-पिता वृद्ध होतात तेव्हा ही मुले तरुण होतात आणि ते त्यांचा सांभाळ व सेवा करीत असतात. हे मुलांचे धार्मिक कर्तव्य असते. यानंतर ही मुले सुद्धा वृद्ध होतात व त्यांची मुले त्यांचा सांभाळ करतात आणि ही परंपरा अशीच सुरु असते.

इस्लाम मध्ये लग्न हे द्वीपैलु नाते आहे. प्रथम असे की हे दोन व्यक्तिंचे शारीरिक आणि आत्मिक मिलन आहे. कुरआनाने म्हटले आहे की ही बाब सुद्धा अल्लाहच्या निशानींपैकी असून तुम्ही दोघे परस्पर एकदुसऱ्यांच्या आनंद व शांती समाधानाकरीता आहात. तुम्हा दोघांत परस्पर प्रेम आणि दया निर्माण करण्यात आलेली आहे. (कुरआन, ३०, २१) या पवित्र बंधनाचा उद्देश संतती जन्मास घालणे असा आहे. कुरआनानुसार अल्लाहनेच तुमच्यासाङ्की सजातीय पत्नी तयार केल्या असून त्यांच्या पासून तुम्हांस पुत्र आणि पुत्री प्रदान केल्या. (कुरआन, १६, ७२)

विवाह हे कायदेशीर बंधन असून याव्यतिरिक्त अविवाहिक शारीरिक संबंध ङ्केवणे हे धार्मिकरित्या महापाप ङ्करविण्यात आले आहे. हे थांबविण्यासाङ्की

कडक शिक्षेची तरतूद करण्यात आलेली आहे.

गतकाळात यूरोप आणि अमेरिकेतही अवैध शारीरिक संबंध बेकायदेशीर होते. मात्र नंतर हे चित्र बदलले आस्तिकता नष्ट झाल्यावर ही परिस्थिती निर्माण झाली. आपण चर्च मध्ये अल्लाहची उपासना तर करतो मात्र आपल्या अटींवर ! आपण अल्लाहचे धार्मिक कायदे पाळायला तयार नसतो. यामुळे यौन क्रांतीने जनम घेतला आणि धर्माचे महात्म्य कमी झाले.

मुळात ही समजूत या मान्यताच चुकीची आहे. याची सुरुवात १९६० मध्ये झाली. समाजात परिवर्तन करण्यासाङ्गी आणि शास्त्रोक्त तांत्रिक क्षमता निर्माण करण्यासाङ्गी हा जुनाच नियोजित प्रयत्न होय. हे प्रयत्न यशस्वी करण्यासाङ्गी हळू हळू चर्चला बाहेरचा रस्ता दाखवून धर्मास सिंहासनावरुन पायउतार करण्यात आले आणि धार्मिक सिद्धांत निरर्थक व महत्वहिन करण्यात आले. या तारांबळीत त्यांना हे समजलेच नाही ही बाब मानवीय स्वभावाच्या विरुद्ध आहे. कुरआनात म्हटले आहे की, ''तुमचे ज्ञान अगदीच थोडे आहे''. (कुरआन, १७, ८५)

दुसऱ्या महायुद्धाप्रसंगी 'मोरॅलिटी विदाउट रिलीजन' सारख्या चळवळींमुळे अशी धारणा निर्माण झाली की धर्मामुळे माणसांत फुट पडते. यामुळे या धारणेच्या लोकांना वाटत होते की ते स्वतंत्र विचाराचे असून कोणत्याच नैतिकतेचे बंधन त्यांच्यावर नाही. कारण बायबल आणि विज्ञान हे परस्पर विरोधी आहेत, प्राचीन सिद्धांत आणि धारणा आता निरर्थक झालेल्या आहेत, यांत कोणत्याही प्रकारचे सामर्थ्य नसून दैवी शक्तीचे अस्तित्वच नाही. भौतिकवाद वाढत गेल्यामुळे लोकांत वैचारिक स्वैराचार फोफावला आणि स्वातंत्र्याच्या सुंदर रुपात अवतरलेल्या भौतिकवादाने अक्षरशः नग्नतांडवच सुरु केले.

धर्मापासून घेण्यात आलेल्या त्या फारकतीमुळे नैतिकतेस समाजाबाहेर हाकलून देऊन तिची नग्न धिंड काढण्यात आली. धर्ममार्तंड आणि पादरी सुद्धा यास बळी पडले. कौमार्यवृताचा त्यांनी सुद्धा सोयीचा अर्थ काढला की, लग्न न करता शरीर संबंध प्रस्थापित करता येतात. परिणामी व्यभिचाराने ऊग्र स्वरुप धारण केले आणि गतकाळातील पावित्र्य अबाधित ङ्केवण्याची धारणा सपरवानगी कामकिडेत परिवर्तीत झाली. यामुळे अवैध संतती फोफावत गेली आणि नवनविन अनारोग्य व आजारांचा फैलाव होत गेला.

णुस्लिमांत वैध काय आणि अवैध काय, यासंबंधी कोणत्याही प्रकारच्या गैरसमजास मुळीच स्थान नाही. कुरआन आपल्या मूळ रुपात सुरक्षित आहे. त्यातील नैतिक-अनैतिकतेची व्याख्या कधीच बदलत नाही. त्यात कोणत्याही प्रकारचे परिवर्तन कोणालाच शक्य नाही. कोणीही धर्माचारी, इस्लामी विद्‌वान कुरआनाचा अर्थ आपल्या सोयीनुसार काढु शकत नाही, त्यांना व कोणालाही त्याचा अधिकार सुद्‌धा नाही. ते शक्य सुद्‌धा नाही. जर कोणी मुस्लिम अपराध करीत असेल तर तो त्यास पुण्य समजून नव्हे तर पाप समजूनच करतो. त्याला तीव्र जाणिव असते की, पाप वा अपराध हे पापच असून त्याचे प्रायश्चित्त आणि क्षमायाचना होई पर्यंत ते संपणार नाही, माफ होणार नाही.

इस्लामी शासन नसलेल्या देशांत मुस्लिमांच्या मुलांना नैतिक संस्कार देण्यात मोङ्ग्या अडचणी येतात. कारण त्यांच्या नैतिक मुल्यांची तुलना इतरांच्या नैतिक मुल्यांशी करण्यात येते. हा प्रश्न केवळ मुस्लिमांचाच नसून ख्रीस्ती आणि ज्यू समुदायांकरीता निर्माण झालेला आहे. मुस्लिमांची अशीच धारणा आहे की खरे शासन तर अल्लाहचेच आहे आणि त्याच्याच आदेशाचे पालन व्हावे.

आपल्याबरोबर आपल्या मुलांतही अल्लाहच्या प्रती त्याच्या आदेशाच्या पालन करण्याची धारणा निर्माण होते. इतर समुदायाचे लोक अल्लाहवर विश्वास ङ्खेवतात नाही, याची मुस्लिमांना मुळीच चिंता करण्याची गरज नाही. इस्लामी धारणांचे संस्कार मुलांमध्ये न्याय आणि माणुसकी निर्माण करण्याची क्षमता आणि प्रेरणा निर्माण करतात. ते भविष्यात धुम्रपान, मदिरापान, मादक पदार्थांचे सेवन आणि यासारखे इतर अपराध करण्यापासून दोन पावले दूर असतात. कारण अशा वस्तु इस्लामनेच धार्मिकरित्या निषिद्‌ध अर्थात हराम ङ्खरविण्यात आलेल्या असतात.

कुमारवयातील संस्कार मुलांमध्ये अल्लाहच्या आदेशाचे पालन करण्याची पवित्र प्रेरणा निर्माण करतात. मुस्लिम आणि मुस्लिमेतरांत होणाऱ्या संवादाप्रसंगी स्त्री-पुरुषांत समानतेची धारणा असते. यामुळे न्यायपूर्ण वार्तालाप होत असतो. स्त्री-पुरुष संबंधाविषयी चर्चा होत असताना स्वैर संबंधांच्या दुष्परिणामांवर चर्चा होत असते. या दुष्परिणामांचा पहिला आघात बिचाऱ्या महिलेवरच होतो. पुरुषाचे तर काही नुकसान होत नाही. उलट तिला भोगून आनंदच त्याला मिळतो. मात्र महिलेस गर्भ धारणा होते. गर्भपात देखील अतिषय शारीरिक

व मानसिक आणि भावनिकरित्या महिलेसाङ्गीच प्रचंड त्रासदायक असते. मूल जन्मास आल्यावर ते पितृहिन ङ्खरते आणि हा सर्व प्रकार महिलेवर प्रचंड मोङ्गा अन्यायकारक आहे.

लैंगिक क्रांतीच्या बऱ्याच काळानंतर समलैंगिकतेची समस्या निर्माण झाली. खरे पाहता ही बाब पूर्वीपासूनच अस्तित्वात होती. मात्र नगण्यप्रमाणात होती. गेल्या दोन दशकांत याचा मोङ्गृया प्रमाणात प्रचार-प्रसार करण्यात आला. नंतर याची संमेलने भरवून गुदा मैथून अधिक सुरक्षित असल्याचे पटवून देण्यात येऊ लागले. याप्रसंगी मला यांच्या प्रामाणिकतेवर शंका आली. यानंतर अमेरिकी मनोवैज्ञानिक सभेने समलैंगिकतेस भयानक रोग असल्याचे जाहिर केले आणि नंतर जे घडले, ते सर्वांनाच माहित आहे.

यानंतर 'गे बॉवेल सिंड्रोम' संबंधी वैद्यकीय माध्यमांत प्रकाशित झाले की, एडस हा आजार समलैंगिक संबंधांचा परिणाम आहे. या समस्येने जागतिक स्तरावर अतिशय ऊग्र रुप धारण केले असून यापासून कंडोम सुद्धा सुरक्षित ङ्केवू शकत नाही. यासाङ्गी इस्लामी पावित्र्याशिवाय पर्याय नाही.

**जैव वैद्यकीय नैतिकता**

**प्रजननीय मुद्दे :**

प्रजनन नियम :- गर्भनिरोध, स्तनपान, अंतगर्भाशयी विधी (लूप), गर्भपात, वैध्याकरण.

वंधत्य आणि त्यावरील उपचार : कृत्रिम बिजारोपन, इनविट्रो, फर्टिलायझेशन, सरोगेट मातृत्व.

अवयव दान आणि प्रत्यारोपण :- मांसपेशींचे प्रत्यारोपण, मस्तिष्कविहिन भ्रूण, लैंगिक ग्रंथींचे प्रत्यारोपण.

मृत्यूची व्याख्या

इच्छा मृत्यू

झीन इंजिनीयरिंग

बायो एथिक्स हा यावेळचा गंभिर विषय असून या भागात आपण यातील

मुद्यांवर चर्चा करुया या संबंधी इस्लामी मार्गदर्शकतत्वे एकदम स्पष्ट आहेत.

**प्रजननीय मुद्दे :**

**गर्भनिरोध :** विवाहाच्या संतानोत्पत्तीवर वाईट प्रभाव न पडता गर्भनिरोधाची परवानगी इस्लामने दिली आहे. मुहम्मद पैगंबरांच्या काळापासूनच गर्भनिरोधासंबंधी कृत्य होत आलेले आहे. मात्र ही कृती पती-पत्नीच्या परस्पर संमतीनेच होईल. इस्लामने जसे वाढविण्याची शिकवण दिल्याचा एक सर्वसामान्य समज आहे. मात्र याचा अर्थ लोकसंख्या वाढविणे असा मुळीच नाही.

इस्लामी इतिहासात विद्वानांनी अगदी सुरुवातीपासूनच शारीरिक, सामाजिक आणि आर्थिक स्वास्थ्य व सुरक्षेच्या तसेच महिलांचे स्वास्थ्य व सौदर्य अबाधित ठेवण्यासाठी परिवार नियोजनाची मर्यादित परवानगी दिली आहे.

पाश्चात्य देशांनी तिसऱ्या जगासाठी ज्या योजना दिल्या आहेत, त्या केवळ त्यांची वा बहुजनांची लोकसंख्या कमी करण्याच्या उद्दिष्टपूर्तीस्तव आहेत. हे देखील सत्य आहे की, कुटुंब नियोजनाच्या ज्या साधनांवर पाश्चात्य देशांनी बंदी घातली आहे, तीच साधने इस्लामी देशांत व तिसऱ्या जगांत बिनधास्तपणे निर्यात करण्यात येत आहेत. यांत सुरक्षेस्तव आवश्यक उपाययोजनांचा सुद्धा विचार केला जात नाही. यात पाश्चात्य देश यासाठीही भांडवल लावतात की, तिसऱ्या जगातील लोक त्यांचे घरगुती उत्पादन व्हावे.

**स्तनपान** - इस्लामच्या शिकवणीमध्ये स्तनपानाला प्रोत्साहन देण्यात आले आहे. परंतू, कुटुंब नियोजनाच्या दृष्टिकोनातून स्तनपानाविषयी नापसंती दर्शविण्यात आली आहे. साधारणपणे जेथे स्तनपानाचा रिवाज आहे, तेथे जन्मदरामध्ये घट होते, असा निष्कर्ष काढण्यात आला आहे. कुराण शरीफनुसार मूल २ वर्षांचे होईपर्यंत स्तनपान करावे, अशी सूचना आहे.

इस्लामनुसार स्तनपान कुटुंब नियोजनाव्यतिरिक्त लहान बालकांसाठी पोषकतत्त्वे देण्याचा एक मार्ग म्हणूनही मानले गेले आहे. या गोष्टीला महत्वपूर्ण मानताना दाईलादेखील सन्मान देण्यात आला आहे. बाळाच्या खऱ्या आईव्यतिरिक्त जर दुसऱ्या एखाद्या स्त्रीने बाळास स्तनपान केले तर तिला 'दूध पाजणाऱ्या आईचा' दर्जा दिला जातो. याबाबत बऱ्याचशा न्यायव्यवस्थांनी स्तनपान करणाऱ्या स्त्रीला नैसर्गिक स्त्रीचा दर्जा दिला आहे. अशा प्रकारे

एकाच स्त्रीकरवी स्तनपान होणाऱ्या बाळांना एकमेकांची सख्खी भावंडे मानले जाते आणि त्यामुळे त्यांना एकमेकांशी विवाह करता येत नाही.

## अंतर्गर्भाशयी साधन (आययूडी म्हणजेच तांबी)

अंतर्गर्भाशयी साधन म्हणजेच तांबीचा वापर गर्भनिरोधनासाङ्गी होणार असेल तर योग्य आहे पण जर गर्भपातासाङ्गी त्याचा वापर अपेक्षित असेल तर त्याला मान्यता दिली जाणार नाही. सध्या जागतिक आरोग्य संघटनेने (डब्ल्यूएचओ) ने आययूडीला गर्भनिरोधक म्हणून मान्यता दिली आहे, पण गर्भपात करण्याचे साधन म्हणून नाही. सदर उपकरणामध्ये तांब्याशी एक पातळ तार असते जी गर्भाशयाच्या तोंडाशी बसविलेली असते. त्यामुळे गर्भाशयात शुक्राणूंचा प्रवेश होण्यास प्रतिबंध केला जातो. त्यामुळे आययूडीला गर्भनिरोधक म्हणून मान्यता मिळाली आहे.

**गर्भपात -** इस्लाममध्ये जीवनरक्षक किंवा स्वयंनिवड विचारधारा अस्तित्वात नाही. इस्लाम गर्भपातास गर्भनिरोधापेक्षा वेगळया प्रकारे पाहतो. गर्भपाताल ा मानवी जीवनाचा नाश मानले गेले आहे. इस्लाममध्ये गर्भाशयाच्या आत असलेल्या भ्रूणाच्याही अस्तित्वाला मान्यता आहे, ज्यास अपूर्ण जीव मानले गेले आहे. जरी 'जीव' म्हणून कायदेशीरदृष्ट्या अधिकार व कर्तव्ये अस्तित्वात असली तरी भ्रूणाला कोणतेही कर्तव्य लागू नसून खालीलप्रमाणे अधिकार मात्र आहेत -

१. गर्भवती महिलेच्या पतीच्या मृत्यू झाल्यास जन्माला येणाऱ्या बाळाला इतर उत्तराधिकाऱ्यांच्या प्रमाणात वाटणी मिळते पण गर्भातील बाळाची वाढ होईपर्यंत त्याची वाटणी वेगळी ङ्केवून उर्वरित उत्तराधिकाऱ्यांना त्यांची वाटणी दिली जाऊ शकते.

२. जर गर्भपात झाला असेल पण भ्रूणाला छातीचे ङ्कोके, हाल चाल जाणवत असतील किंवा खोकला होत असेल तर त्यालाही उत्तराधिकारी प्राप्त होतात, जसे गर्भाच्या सुरुवातीस होतात. अशा मृत भ्रूणाची वाटणी इतर उत्तराधिकाऱ्यांमध्ये प्रमाणानुसार वाटून दिली जाते.

३. एखाद्या स्त्रीने गुन्हा केला असेल व त्या गुन्ह्याची शिक्षा मृत्युदंड असेल आणि त्या वेळेस जर ती स्त्री गर्भवती असेल तर गर्भाची वाढ

होऊन प्रसूती होईपर्यंत व त्या नंतर बाळाला आवश्यक असलेले तिचे दूध संपेपर्यंत तिची शिक्षा लांबणीवर टाकण्यात यावी. गर्भधारणेचा कालावधी निश्चित नसल्याने गर्भाशयातील भ्रूणाच्या म्हणजेच मोङ्ग होत असलेल्या बाळाच्या अस्तित्वाला मान्यता आहे. एवढेच काय तर गर्भ अनैतिक संबंधातून निर्माण झाला असेल तरीही त्यास ही मान्यता राहील. विवाहबाह्य संबंधांमधून निर्माण होणाऱ्या गर्भालाही जीवनाचा अधिकार आहे. सर्व धार्मिक न्यायिक पंथ यास मान्यता देतात.

४. गर्भपात झाल्यास (जरी दुर्दैवाने झाला असला तरीही) आर्थिक दंड ङ्गोङ्गावला जातो, ज्याला 'घोरा' असे म्हटले जाते. जर जाणूनबुजून गर्भपात केला असेल तर त्या कृत्याला शिक्षा ङ्गोङ्गावली जाते. जीवनाच्या प्रारंभाबद्दल इस्लामी विद्वानांमध्ये वादविवाद होत आल ` आहेत कारण गर्भास जीवनाची सुरुवात मानले गेले आहे. प्राचीन काळातील न्यायदात्यांनी चार महिने किंवा सात आङ्गवड्यापर्यंतच्या गर्भाच्या गर्भपातास अनुमती देण्यामागील धारणा अशी होती की, तोपर्यंत गर्भामध्ये जीव निर्माणच झालेला नसतो. दहाव्या शतकातील विद्वान इमाम गजाली यांनी असे मांडले की, गर्भात जेव्हापासून काही हालचाल निर्माण होईल तेव्हापासून त्याचे जीवन खऱ्या अर्थी प्रारंभ झाले असे मानले जाईल. पण याविषयी संमेलनांमध्ये नवीन तंत्रज्ञानाच्या आधारे चर्चा होऊन खालील मुद्दे समोर आले -

(१) ही एक शुद्ध व व्याख्या असलेली बाब असावी.

(२) जी जीवनाच्या वृद्धीच्या पैलूची साक्ष देईल.

(३) जर भ्रूणाच्या वाढीस अटकाव केला नाही तर तो पूर्णपणे वाढेल.

(४) भ्रूणाने अशी अनुवांशिक आकृती प्राप्त करून घेतलेली असावी जी मानवासाङ्गी आवश्यक असेल, ज्यास एक व्यक्तिमत्व असेल.

(५) ज्यामध्ये आधी सांगितलेल्या पैलूंचा अभाव असावा, म्हणजेच ही बाब गर्भधारणेशी, बीजाच्या फलनाशी (फर्टिलायझेशनशी) संबंधित असावी.

गर्भधारणेमुळे जर आईच्या जीवाला धोका उत्पन्न होत असेल तर अशा परिस्थितीमध्ये गर्भपात करण्यास परवानगी आहे. शरीयतनुसार आईल ा प्रमुख मानले असून भ्रूणाला आईच्या गर्भातील एक उत्पत्ती मानले गेल े आहे. गर्भधारणेच्या पहिल्या चार महिन्यांमध्ये गर्भपात करण्यास मान्यता देण्यामागील भूमिका अशी आहे की, तोवर भ्रूणामध्ये जीव निर्माण झालेला नसतो.

**नसबंदी -** कोणत्याही वैद्यकीय कारणाशिवाय नसबंदी अयोग्य मानली जाते. जर एखाद्या महिलेस भरपूर अपत्ये झालेली असतील किंवा तिचा प्रजननकाल संपत आला असेल तरच नसबंदी करणे स्वीकार्य आहे. ही बाब संबंधित पती व पत्नी या दोघांच्या सहमतीनेच व्हावी व सदर बाबतीत एकदा घेतल ेल्या निर्णयामध्ये बदल होणार नाही, याची शाश्वती घेण्यात यावी. कोणतेही शासन कोणावरही नसबंदीची सक्ती करू शकत नाही. डॉक्टरांनादेखील अशीच सूचना आहे की, गर्भपाताची शस्त्रक्रिया रुग्णाच्या भल्यासाङ्गी असेल तरच करावी.

**वंध्यत्वाचा उपचार**

प्रत्येक व्यक्तीला गर्भ प्राप्त करण्याचा कायदेशीर अधिकार असल्याने शरीयतच्या विरुद्ध नसेल असे शक्य ते सर्व उपचार पीडित व्यक्ती करू शकते.

**कृत्रिम बीजारोपण**

याची परवानगी तेव्हाच दिली जाते जेव्हा शुक्राणू त्या स्त्रीच्या पतीचेच (ॅऊप) असतील. परक्या दात्याचे (ॅघ्ड) शुक्राणू वापरण्यास मनाई आहे कारण ही बाब विवाहबंधनाच्या विरुद्ध ङ्करेल.

**इन विट्रो फर्टिलाइजेशन** - या प्रक्रियेला सर्वसाधारणपणे 'टेस्ट ट्यूब' असे म्हटले जाते. इस्लाममध्ये या प्रक्रियेस तेव्हाच मान्यता मिळते जेव्हा त्यात पती व पत्नी दोघेही सहभागी असतात, थोडक्यात इथेही विवाहबंधनाचा दृष्टिकोन अंतर्भूत असला पाहिजे. विवाहाचा संबंध जीवनाशी असतो. त्यामुळे एखाद्या व्यक्तीचे शुक्राणू सांभाळून ङ्केवलेले असतील आणि त्याचा मृत्यू झाला तर त्या विधवा स्त्रीला आपल्या मृत पतीचे शुक्राणू वापरून गर्भधारणा करण्यास प्रतिबंध असेल. तसेच दुसऱ्या कुङ्गल्याही पुरुषाचे शुक्राणू वापरणेही निषिद्ध असेल, कारण तसे करणे विवाहबाह्य संबंध ङ्करेल. बाहेरील शुक्राणू, बाहेरील

स्त्रीबीज किंवा बाहेरील गर्भाशयदेखील वापरता येणार नाही.

**सरोगेट मातृत्व** - कुङ्गल्याही परपुरुषाचे शुक्राणू आपल्या गर्भाशयात घेऊन गर्भधारणा करण्यास इस्लाममध्ये अमान्य आहे. ही बाब विवाहबाह्य असल्यामुळे अनैतिक आहे. या प्रकारच्या सरोगसीबद्दल अमेरिकेमध्ये चर्चा झाल्या आहेत कारण अशा प्रकारे जन्माला येणाऱ्या बाळांना 'कमोडिटी' म्हणजेच 'विक्रीयोग्य वस्तू' मानले जाते, जे मानवतेच्या विरुद्ध आहे. कारण गर्भामध्ये वाढत असल ेले बाळ जन्मल्यावर दुसऱ्याला द्यायचे आधीपासूनच ङ्करलेले असते आणि त्याबद्दल मिळणारे भाडे किंवा मूल्यदेखील ङ्करलेले असते. त्यामुळे मातृत्वाल ा एका किंमतीबरोबरच मालमत्ता म्हणूनही मानले जाऊ शकते. जर अशा गोष्टींना प्रोत्साहन दिले गेले तर पुढे जाऊन याचे गंभीर परिणाम निदर्शनास येतील.

**अवयवदान व प्रत्यारोपण** - कुराणमध्ये असे सांगण्यात आले आहे की, जो कोणी अवयवदान करून एखाद्या व्यक्तीचे प्राण वाचवितो, त्याने जणू काही संपूर्ण मानवतेचे प्राणच वाचविले आहेत. निरुपयोगी झालेल्या अवयवांच्या जागी कोणीतरी दान केलेले सक्षम व सुदृढ अवयव लावले गेले तर त्याहून चांगली गोष्ट काय असू शकते? कुराणमध्ये सांगितल्या गेलेल्या नियमांवर गहन अभ्यास करून ही प्रक्रिया सुरु करण्यात आली आहे. मूलतः मानवी शरीराचे तुकडे करणे किंवा अवयव काढणे, हे इस्लामच्या धोरणांविरुद्ध आहे. कोणत्याही दात्याच्या शरीराची चिरफाड करून त्याचे अवयव काढून घेण्याची परवानगी दिली जाऊ शकत नाही. पण हे सर्व पुढील दोन न्यायिक तत्त्वांना एकत्रितपणे विचारात घेतल्यावर घडू शकले आहे - परिस्थितीनुरूप निर्माण झालेली गरज निषेधास रद्द करते आणि काही चांगले घडणार असेल तर थोडेसे वाईट झाले तरी ते स्वीकारले जाऊ शकते, जर दोघांनाही रद्द नाही करता आले तर. कारण एखाद्या जिवंत व्यक्तीचे प्राण वाचविणे हे मृत व्यक्तीचे शरीर वाचविण्यापेक्षा जास्त गरजेचे असते. एखाद्या जिवंत व्यक्तीचा मृत्यू होण्यापेक्षा एखाद्या दात्याच्या अवयव काढून घेणे कधीही चांगले. पण अशा वेळी हे लक्षात ङ्केवले पाहिजे की, असे करताना दात्याच्या जीविताला कोणताही धोका उत्पन्न होऊ नये. तसेच दात्याने याबाबत कोणत्याही दबावाला बळी न पडता स्वखुशीने अवयवदानाला व प्रत्यारोपणाला परवानगी दिली पाहिजे. जर दाता मृत असेल तर अशा वेळी याबाबत त्याच्या वारसाची संमती घेणे आवश्यक आहे. याच शर्तींवर इस्लाममध्ये अवयवदान व प्रत्यारोपण यांना परवानगी

देण्यात आली आहे.

**स्नायू व पेशींचे प्रत्यारोपण** - आधुनिक उपचारपद्धतींमुळे असे उमगले आहे की, या प्रकारच्या प्रत्यारोपणामुळे बऱ्याच रोगांवर उपचार करता येऊ शकतात. एखाद्या प्राण्याच्या किंवा माणसाच्या ड्रिनल ग्लॅन्ड मेड्युलाच्या भ्रूणाचा वापर तत्परतेने केला जाणे, कायदेशीर ङ्घरेल. एखाद्या जिवीत भ्रूणाची आहुती देणे बेकायदेशीर ङ्घरेल. आईचे प्राण वाचविण्याकरिता भ्रूणाच्या पेशींचा वापर केला जावा. अपूर्ण भ्रूण पाडण्यासाङ्गी नवीन भ्रूण जन्मास घालणे बेकायदेशीर आहे.

**मस्तिष्कविरहित भ्रूण** - जरी एखाद्या भ्रूणामध्ये पूर्णपणे विकसित न झाल `ले डोके असणे किंवा मेंदूचे भागच नसणे अशी जन्मजात वैगुण्ये असतील आणि जन्मताच त्याचा मृत्यू होणार आहे अशी अटकळ असेल; तरीही जोवर त्याच्यात जीव आहे तोवर त्याच्या अवयवांचे प्रत्यारोपण करण्यात येऊ नये. अशा भ्रुणाला कृत्रिम मृत्यू दिला जाऊ नये. जोवर त्याचा मेंदू पूर्णतः मृत किंवा निकामी होत नाही तोवर त्याला जिवंत ङ्खेवले पाहिजे.

**लैंगिक ग्रंथींचे प्रत्यारोपण** - जोवर लैंगिक ग्रंथींमध्ये शुक्राणू निर्माण करण्याची क्षमता असेल तोवर त्यांना इतर व्यक्तीस देण्यात येऊ नये. असे केल्यास त्यातून होणारी संतान उत्पत्ती अवयव घेणाऱ्या व्यक्तीची नसून त्या दात्याची असेल, असा निष्कर्ष निघतो. असे प्रत्यारोपण विवाहबाह्य संबंधातून झाल `ले असल्याने त्यास अवैध व अनैतिक मानले जाईल. सुप्तावस्थेतील लैंगिक ग्रंथींचा उपयोग वैद्यकीय अभ्यासासाङ्गी केला जाणार नाही.

**मृत्यूची व्याख्या** - वैद्यकीय संस्थांकरिता व अभ्यासाचा भाग म्हणून मृत्यूची व्याख्या करणे गरजेचे आहे. जसे की शरीरात प्राण नाहीत, हे सिद्ध झाल्यावर कृत्रिम अवयव काढून त्याचे प्रत्यारोपण केले जाईल किंवा (हृदयासारखे) एखादा महत्वाचा अवयव काढून घेतला जाईल. जेव्हा दोन व्यक्ती थोड्या फरकाने मृत पावतील तेव्हा अशा वेळी या बाबीचा प्रत्यक्ष प्रभाव कङ्गीण असेल. कारण अशा बाबतीत त्यांचा कायदेशीर उत्तराधिकारी ङ्घरविणे अतिशय कङ्गीण व किचकट असेल. जोवर एखाद्या विधवेची गर्भावस्था पूर्णपणे संपत नाही तोवर तिचे उत्तरदायित्व कोणाकडे असेल, हे ङ्घरविणे अशक्य होईल. अशा विधवेने पुढील ४ महिने १० दिवसांपर्यंत पुनर्विवाहदेखील करू नये.

सध्याच्या कायदेविषयक होणाऱ्या संमेलनांमधील परिसंवादांनुसार जर एखादी

व्यक्ती 'ब्रेन डेड' असताना, म्हणजेच तिचा मेंदू निकामी झालेला असताना तिचे अस्तित्व केवळ कृत्रिमरीत्या कार्यरत ङ्केवलेल्या इतर अवयवांच्या बळावर चालू असणे, ही बाब सदर व्यक्तीस मृत मानण्यास पुरेशी आहे. मृत्युबद्दलची सदर व्याख्या अनेक समानतांना गृहीत धरून एका प्राचीन न्यायिक नियमानुसार ङ्करवली जात आहे. ही बाब घातक आघातांबद्दलदेखील सविस्तरपणे सांगते. जर एखाद्या व्यक्तीच्या पोटात सुरा खुपसला गेल्याने त्याची आतडी बाहेर आल ेली आहे व तो तडफडत आहे आणि त्याचे हात पाय हालत आहेत, तरीही त्याल ा मृत मानले जाईल. नंतर जर दुसऱ्या हल्लेखोराने त्या जखमी व्यक्तीला मारून टाकून त्याच्या हालचाली संपूर्णपणे बंद केल्या तरीही हत्येचा आरोप पहिल्या हल्लेखोरावरच लागेल आणि दुसऱ्या हल्लेखोरावर इतर संबंधित आरोप ल ागतील. जेव्हा एखादी व्यक्ती ब्रेन डेड आहे आणि तिच्या इतर अवयवांना कृत्रिम व्यवस्थेद्वारे जिवंत ङ्केवण्यात आले आले, तेव्हा कृत्रिम व्यवस्था बंद करणे पाप नाही. तसेच अशा ब्रेन डेड अवस्थेत त्या व्यक्तीचे हृदय काढून दुसऱ्या व्यक्तीच्या शरीरात प्रत्यारोपण करणेही पाप नाही.

**इच्छामृत्यू -** हॉलंडमध्ये याला कायद्याने संमती देण्यात आली आहे. अमेरिकेतील दोन राज्यांमध्ये याबाबत जनमत चाचणी घेण्यात आली आणि ती असफल राहिली. तरीही इच्छामृत्यूची मागणी जोर धरत आहे. याबाबत इस्लामचे स्वतःचे ङ्गोस विचार आहेत.

**मानवी जीवन** - पैगंबर हजरत मूस (अ.), ईसा (अ.) व मोहम्मद (सल्ल) यांच्याही आधी इस्लाममध्ये मानवी जीवनाला पावित्र्य देण्यात आले आहे. आदमच्या एका मुलाने, हबीलने काबीलला मारून टाकले होते. त्यावर टिप्पणी करताना कुराणमध्ये लिहिले गेले आहे की - याच करणास्ताव आम्ही इस्राईल च्या संतानांसाङ्गी लिहून ङ्केवले होते की, कोणाच्यातरी खुनाचा बदल घेण्यासाङ्गी किंवा पृथ्वीवर स्तोम माजविण्याचा किंवा अशाच इतर कारणास्तव एखाद्या व्यक्तीची हत्या केली तर त्याने जगातील सर्व मानवजातीचीच हत्या केली, असा समज होतो. आणि ज्याने जीवनदान दिले त्याने संपूर्ण माववजातील ाच जीवनदान दिले. (कुराण ०५, ३२). कुराणमध्ये हेही सांगितले गेले आहे की, ' .... अल्लाहने आदरणीय ङ्करविलेल्या कोणत्याही प्राणिमात्रांची हत्या करू नका. ही बाब भिन्न आहे की, न्यायाचा परिणाम असाच व्हावा...' कुराण (०६, १५१, १७-३३). शरीयतमध्ये अशा प्रकारे कुङ्गल्याही व्यक्तीचे प्राण घेणे मान्य नाही. युद्ध असो वा शांती, त्यासाङ्गी कडक सूचना दिल्या गेल्या

आहेत, ज्या न पाळता कोणाचाही प्राण घेतले जाऊ शकत नाहीत.

**आत्महत्येचा मानवाला अधिकार आहे?** - इस्लाम आत्महत्येला अधिकार मानत नाही, उलट त्याला उल्लंघन मानतो. आपण स्वतःला निर्माण केलेल ` नाही, आपण आपल्या शरीराचे मालकदेखील नाही. हे शरीर आपल्याला सांभाळण्यासाङ्गी व सुरक्षित ङ्खेवण्यासाङ्गी दिले गेलेले आहे. ह्या शरीराचा माल क तर अल्लाह आहे, जो जीवन देतो व घेतो. याचे आपण उल्लंघन करू शकत नाही. त्यामुळे आत्महत्या करणे इस्लामनुसार गंभीर गुन्हा आहे. कुराणमध्ये सांगितले गेले आहे की, आपली आणखीन हत्या करू नका. निसंकोचपणे अल्ल ाहची तुमच्यावर अपार कृपादृष्टी आहे. कुराण (०४, २९) हजरत मोहम्मद (सल्ल.) ने आत्महत्येविरुद्ध फर्माविले की, जो स्वतःला एखाद्या हत्याराने मारतो तो त्या हत्याराला सोबत घेऊनच नरकात जातो. जो विषप्राशन करून मरतो त्याला नरकातही विष खात रहावे लागेल. जो उंच पर्वतावरून उडी मारून प्राण त्यागेल त्याला नरकात दऱ्यांमध्येच सदैव पडत रहावे लागेल.

**इच्छा मृत्यू** - दया मृत्यू? शरीयतमध्ये प्राण घेण्याच्या परिस्थिती व शर्ती लिहून ङ्खेवलेल्या आहेत. परंतू, साधारण नियमन अपवाद म्हणून आणि जीवनाच्या पावित्र्याचा विचार करता इस्लामनुसार इच्छा मृत्यूस अजिबात मान्यता नाही. मानवाचे जीवन बहुमूल्य आहे आणि त्याचा आदर केला पाहिजे. जगण्यास अयोग्य अशा कोणत्याच जीवनाचा इस्लाममध्ये उल्लेख नाही.

दुःख किंवा यातना यातून सुटका करून घेण्यासाङ्गी किंवा त्या थांबविण्यासाङ्गी स्वतःचे प्राण घेणे अमान्य आहे. हजरत मोहम्मद (सल्ल.) यांनी सांगितले की, प्राचीन काळी एक व्यक्ती होती. त्याची यातना अतिशय क्लेशदायक होती. त्याने यातना असहाय्य झाल्याने चाकूने स्वतःच्या मनगटावरील नाडी कापल ी आणि अतिरक्तस्रावामुळे त्याचा मृत्यू झाला. त्यावर अल्लाहने फर्माविले की, त्या व्यक्तीने स्वतःचे प्राण घेतले. मी त्याला स्वर्गात प्रवेश देऊ शकत नाही. अशाच प्रकारे एका युद्धात एका मुसलमान व्यक्तीस मारण्यात आले. सहाबा रदी (हजरत मोहम्मद सल्ल. यांचे साथी) त्या मृत व्यक्तीची प्रशंसा करीत राहिले की, तो खूप शूरवीर व बलवान होता. पण त्यावेळी आश्चर्यचकित झालेल्या मोहम्मद पैगंबर (सल्ल.) यांनी फर्माविले की, त्या व्यक्तीची जागा नरकातच आहे. याविषयी अधिक शोध घेतल्यावर सहाबा यांना समजले की, ती व्यक्ती खूपच घायाळ झाली होती. त्यावेळी त्याने स्वतःची तलवार छातीत

भोसकून आत्महत्या केली होती.

‘दी इस्लामिक कोड ऑफ मेडिकल एथिक्स२०’ने इस्लामिक औषधींवर आयोजित केलेल्या पहिल्या आंतरराष्ट्रीय परिषदेत सांगितले की, ‘दया मृत्यू आत्महत्येसारखा आहे.’ कोणत्याही यातनेतून सुटका होण्यापासून निरुपाय झाल्यास इच्छा मृत्यू मिळावा, या विचारधारेस खोडून काढण्यात आले. जगात असे कोणतेही दुखणे किंवा यातना नाही जी औषधोपचार किंवा चेतासंस्थेशी संबंधित शस्त्रक्रिया करून ङ्खीक करता येत नाही. ह्या परिषदेमध्ये सहभागी झालेल्या केवळ नास्तिक विचारसरणीच्या लोकांनीच दया मृत्यूचे समर्थन केले. असे करताना त्यांनी मत मांडले की, ‘ह्या पृथ्वीवर मानवाची निर्मिती शून्यातून झाली आहे.’

या परिषदेमध्ये पुढे असेही सांगितले गेले की, दुःख व यातना यांचे पारदर्शक पैलू असतात. बिकट प्रसंगी मनोधैर्य राखण्यास इस्लाममध्ये खूप सन्मान देण्यात आला आहे. त्यांना प्रलयाच्या दिवशीही इनाम दिले जाईल. ‘ज्या ल ोकांनी चांगले कार्य केले, त्यांच्यासाङ्गी ह्या जगात चांगुलपणा आहे, आणि अल्लाहची भूमी खूप विशाल आहे. टिकून राहणाऱ्यांना त्यांचा बदला न चुकता मिळणारच.’ कुराण (३९, १०)... आणि ‘तुझ्यावर संकटे कोसळली तरी त्यांचा धैर्याने सामना कर. निश्चितच हे अशा कार्यांपैकी आहे जे अटळ व दृढ निश्चयात कामी येतात.’ कुराण (३१, १७)

मोहम्मद पैगंबर (सल्ल.) यांनी म्हटले आहे की, अल्लाहवर श्रद्धा असणारी व्यक्ती जेव्हा दुःखाने वेढलेली असेल, ज्याला काटे टोचल्यावर जशा वेदना होतात, त्याहूनही अधिक वेदना होत असतील तर अल्लाह त्याचे सर्व अपराध माफ करेल आणि शिशिर ऋतूमध्ये ज्याप्रकारे पानगळ होते त्याप्रकारे त्याची पापेही गळून पडतील.

जेव्हा दुःखांना रोखण्याचे सर्व मार्ग निकामी होतात तेव्हा अल्लाहचे नामस्मरण करणारे त्याच्याकडे आकृष्ट होतात कारण त्यांना ङ्गाऊक असते की, या कष्टांच्या मोबदल्यात त्यांना मृत्यूनंतरच्या वास्तविक व अनंत जीवनामध्ये त्याचे चांगले फळ मिळणार आहे. अशा वेळी जे लोक त्याच्याकडे आकृष्ट होत नाहीत किंवा त्याला शरण जात नाहीत त्यांना तसेच सोडून दिले जाते आणि इच्छा मृत्यू घेणाऱ्यांसाङ्गी काहीही फलश्रुती होत नाही.

**आर्थिक कारण** - असे आजार किंवा रोग ज्यांचा उपचार आजीवन चालतो त्याच्या काळजीने आणि म्हातारपणाची चिंता भेडसावून इच्छा मृत्यूचे समर्थन करणारा समूह इच्छा मृत्यूचे समर्थन करून 'मृत्यूच्या कर्तव्याविषयी' बोलू ल ागेल. त्यांचे म्हणजे असते की, मानवी यंत्राचे उत्पादन चक्र पूर्ण झाले आहे आणि त्याला तसेच निरुपयोगी अवस्थेत ङ्केऊन समाजातील इतर उत्पादनकर्त्या घटकांवर अतिरिक्त बोजा बनवून त्याचे शरीर हळूहळू खंगत खंगत नष्ट होण्यापेक्षा त्याला मृत्यूच्या हवाली केलेले कधीही सयुक्तिक ङ्करते.२१

हा युक्तिवाद इस्लामला पूर्णपणे अमान्य आहे. मानवी मूल्ये आर्थिक सबबींपेक्षा अधिक महत्वाची असतात. वृद्ध व कमकुवत लोकांची मदत करणे, त्यांचा सांभाळ करणे हे अतिशय महत्वपूर्ण कार्य आहे, ज्यासाङ्गी लोकांनी स्वतःहून वेळ दिला पाहिजे. आपले प्रयत्न व संपत्तीदेखील या पुण्यकार्यात वापरली पाहिजे. अशा भावनांची सुरुवात आपल्या आई वडिलांची सुश्रुषा करण्यापासून होते. तुमच्या ईश्वराने असा निर्णय दिला आहे की, त्याच्याशिवाय आणखी कुणाची सेवा करू नका आणि आईवडिलांसोबत चांगले वर्तन करा.

जर त्यांच्यापैकी कुणीही किंवा दोघेही तुमच्या डोळयांसमोर वृद्धापकाळात पोहोचले असतील तर त्यांना काहीही वावगे बोलू नका आणि त्यांना झिडकारू नका. उलट त्यांच्याशी विनम्रतेने बोला आणि त्यांच्यासमोर दयाळूपणे विनयशीलतेची व मायेची वर्तणूक ङ्केवा आणि म्हणा की, 'हे ईश्वरा, लहानपणी त्यांनी जशी माझी काळजी घेतली, माझे संगोपन केले तशाच प्रकारे आता तू त्यांच्यावर कृपा कर.' तुमच्या मनातील भाव तुमच्या ईश्वराला नक्कीच चांगल्या प्रकारे कळतो. तुम्ही जर सज्जन व चांगले राहिलात तर तोही तुमच्याविषयी जरूर अतिशय क्षमाशील राहील. कुराण (१७, २३ - २५) आईवडिलांची सेवा केल्यास त्याचे चांगले फळ देव तुम्हांला या जगात असताना व त्यापश्चातही देणारच. अल्लाहवर विश्वास असणारे याला साधारण खर्च मानत नाहीत. त्यांच्यासाङ्गी ही एक फलदायी गुंतवणूक आहे जिचा लाभ त्यांना शेवटी मिळणारच आहे. हे तत्व व त्यामागील सत्य यांना भोगवादी व भौतिक सुखांचा प्रभाव असणाऱ्या समाजात काही स्थान नाही. पण नैतिक मूल्ये व आस्था बाळगणाऱ्या लोकांसाङ्गी या गोष्टींचे महत्व नक्कीच आहे.

वृद्धांच्या संरक्षणाचे कार्य जेव्हा व्यक्तिगत स्वरूपावर शक्य नसते तेव्हा इस्ल ामी शिकवणीनुसार हे कार्य संपूर्ण समाजाचे उत्तरदायित्व बनते. अशा प्रकारे

आर्थिक प्राधान्यामध्ये बदल करून ऐहिक सुखांमधून आनंद उपभोगण्याऐवजी नैतिक मूल्यांवर आधारित सेवा करून पुण्य कमविले जाऊ शकते. परंतू, हे सद्वर्तन सर्वांकडून घडण्याकरिता समाजाला पूर्णपणे नैतिक व आध्यात्मिक कर्तव्यांकडे आकृष्ट करावयास हवे.

**चिकित्साविषयक परिस्थिती** - इस्लामी व्यवस्थेमध्ये इच्छा मृत्यूला बिल कुल स्थान नाही. आणि असेल तरी त्याला रद्द केले जाते कारण ही बाब धार्मिकदृष्ट्या निषिद्ध आहे. अशा वेळी संबंधित व्यक्तीला त्याचे नातेवाईक, मित्रपरिवार यांच्यासमवेत धर्मगुरू व आध्यात्मिक व्यक्तींकडून मानसिक बळ दिले जाते. वैद्य, डॉक्टर्ससुद्धा यामध्ये सहभागी होतात आणि वेदनाशमनाचे कार्य करीत राहतात. डॉक्टरांकडून वेदनाशामक औषधे मर्यादित प्रमाणात देण्यावरून किंवा त्याचे प्रमाण धोकादायक असेल इतके जास्त देण्यावरून एक समस्या निर्माण होऊ शकते. औषधाचे प्रमाण वाढविल्याने रुग्णाचा जीव जाऊ शकतो. यामधून डॉक्टरचा खरा उद्देश्य समजून येत नाही. त्याला रुग्णाल ा वेदनेतून मुक्त करायचे होते की, औषधांद्वारे त्याला मृत्यूच्या दारी लोटायचे होते. धार्मिकदृष्ट्या डॉक्टरचा उद्देश्य गंभीर बाब आहे की, त्याला रुग्णाला वेदनेतून मुक्त करायचे होते की, औषधांच्याद्वारे मृत्यूच्या दारी लोटायचे होते?

कायद्याच्या आधारे डॉक्टरचा उद्देश्य कळू शकत नाही पण आपल्यावर सदैव पाळत ङ्केऊन असणाऱ्या अल्लाहपासून असे लोक वाचू शकत नाहीत. कुराणनुसार - 'तो ईश्वर नजरेच्या चोरीलाही जाणतो आणि जे मनात दडवून ङ्केवले आहे त्यालाही जाणतो.' कुराण (४०, १९) सिद्ध न होऊ शकणारे गुन्हे कायद्यानुसार भलेही अपराध नसतील पण अल्लाहसमोर त्यांचा हिशोब केल ा जाणार.

रोगांचा सुयोग्य उपचार इस्लाममध्ये बंधनकारक आहे. याबाबत हजरत मोहम्मद (सल्ल.) यांनी दोन गोष्टी सांगितल्या आहेत - 'प्रत्येक रोगावर औषध आहे आणि प्रत्येक रोगाचा इलाज करा. अल्लाहने प्रत्येक रोगाचा इलाजदेखील बनविला आहे.' आणि 'तुमच्या शरीराचा तुमच्यावर अधिकार आहे.' पण जेव्हा उपचाराचा रोगावर प्रभाव पडत नसेल तर त्याला सोडून द्या. शल्यक्रिया व औषधांचा उपयोग या दोन्ही पद्धतींवर ही बाब लागू होते, ज्याला बहुसंख्य इस्लामी विद्वान 'कृत्रिम सजावटी उपकरणे' असे म्हणतात. प्रत्येक जीवित व्यक्तीचा अधिकार दैनंदिन आवश्यकतेसंबंधित वस्तूंच्या उपयोगातून मांडल

ा गेला आहे. यामध्ये खाणे, पिणे, सर्वसाधारण देखभाल घेणे यांचा समावेश होतो, जे रुग्णाच्या मृत्यूपर्यंत थांबविता येत नाहीत. 'दी इस्लामिक कोड ऑफ मेडिकल एथिक्स' (पृष्ठ ६७) नुसार, 'पुरुष व स्त्री यांचे प्राण वाचविण्याचे प्रयत्न करताना डॉक्टरने आपली मर्यादा ओलांडता कामा नये. वैज्ञानिकदृष्ट्या हे सिद्ध आहे की, मृत्यूनंतर व्यक्तीला पुन्हा जिवंत करता येत नाही. त्यामुळे मृत व्यक्तीच्या देहाला गोङ्कवून किंवा अन्य कोणत्याही कृत्रिम पद्धतीने संरक्षित ङ्केवण्याचे तसेच जतन करण्याचे प्रयत्न केले जाऊ नयेत. डॉक्टरांचे कार्य जीवनचक्राला संरक्षित करणे आहे, मृत्यूला नाही. कोणत्याही परिस्थितीत रुग्नांचे आयुष्य संपविण्याच्या संदर्भात डॉक्टरने सकारात्मक भूमिका घेऊ नये.

**टीप**

इच्छा मृत्यूबद्दलची चर्चा कोणत्याही समाजाच्या किंवा समुदायाच्या वैचारिक परंपरेहून विलग होऊन करता येत नाही. एकाच अल्लाहला मानणारे व शरीयतचे पालन करणाऱ्या मुसलमानांमध्येही याबाबत विविध मतप्रवाह आहेत, ज्याप्रकारे अल्लाहला न मानणाऱ्या किंवा मर्यादित स्वरूपात मानणाऱ्या लोकांमध्ये आहेत.

हल्लीच्या ख्रिस्त धर्मामध्ये राज्यशासन व चर्च यांना एकमेकांपासून वेगवेगळे ङ्केवण्यामधील एक उद्देश्य अल्लाहला मानवाशी निगडित विषयांपासून दूर ङ्केवणे हाही आहे, जरी ह्या दोन्ही विचारधारा समान नाहीत.

उच्चस्तरीय चिकित्सा शास्त्रज्ञांनी हे मान्य केले आहे की, २० व्या शतकातील नाझी जर्मनी शिबिरांमधील इच्छा मृत्यूचा प्रयोग डोळे उघडणारा ङ्करला. आता एखादी व्यक्ती जिवंत राहण्यायोग्य नाही, याबद्दल मत व निर्णय झाला की, त्यानुसार मनुष्याला विविध प्रकारच्या पीडा आणि यातना भोगाव्या लागणारे निर्णय घेतले जातात. इच्छा मृत्यू समर्थक नेदरलँड्समध्ये संघटित होऊन युरोप व अमेरिकेला लक्ष्य करीत आहेत. याचा विरोधी पक्ष असा सवाल करीत आहे की, जे लोक असाध्य रोगांनी ग्रासलेले असल्याने भयंकर ताणतणाव सहन करीत आहेत, त्यांचे नातेवायिकदेखील यामुळे मानसिक व आर्थिकदृष्ट्या चिंताग्रस्त आहेत. अशा नाजूक प्रसंगी त्यांच्याकडून आपल्या नातेवाईकाला इच्छा मृत्यूचा अधिकार देण्याविषयी संमती घेणेदेखील एक प्रकारचा अन्यायच आहे. या दोन्ही पक्षांमध्ये आता युद्धरेखा आखली गेली आहे आणि याचा

परिणाम काय होतो हे पाहणे आता बाकी आहे. तथापि, इस्लाम आपल्या धार्मिक व आध्यात्मिक शक्तीच्या बळावर ह्या विवादापासून दूर आहे.

## जनुकीय अभियांत्रिकी

कुराणमध्ये असलेल्या 'अल्लाहची संरचना (मानवाकडून) बदलू शकते', ह्या वाक्यांशाच्या आधारावर जनुकीय अभियांत्रिकी हा विषय इस्लामी विद्वानांना प्रभावित करीत आहे. कुराणनुसार, सैतानाने आदम व हव्वा यांना निषिद्ध असल ेले फळ खाण्यास उद्युक्त केले. मग दोघांनी पश्चाताप व्यक्त केला, ज्याबद्दल अल्लाहच्या वतीने त्यांना क्षमा मिळाली. त्यांच्या पश्चातापाचा स्वीकार करून अल्लाहने त्यांना पृथ्वीवर आपल्या आज्ञाधारक मानवांची लोकवस्ती वसविण्याच्या मोहिमेवर धाडले. हे पाहून सैतान व्याकुळ झाला. मनुष्यजात खरोखर भरवसा ङ्केवण्याच्या योग्यतेची नाही, हे सिद्ध करण्यासाङ्गी सैतानाने अल्लाहकडे आणखीन एक संधी मागितली. मनुष्यजातीला फूस लावण्याची (इथे हे ध्यानात घ्यावे की, सैतान त्यांनाच फूस लावू शकतो जे त्याच्या मार्गावर चालत असतात.) परवानगी अल्लाहकडून मिळताच सैतानाने आपल्या काही योजना सांगितल्या, ज्यावर अल्लाहने ताशेरे ओढले आहेत.

सैतानाने सांगितले की, मी तुझ्या भक्तांपैकी एक हिस्सा जरूर माझ्या अधिपत्याखाली घेईन. त्यांना नक्कीच भरकटवेन, त्यांना वासनांमध्ये गुरफटून टाकेन आणि त्यांना आज्ञा देईन की, त्यांनी चतुष्पाद प्राण्यांचे कान कापावेत. तसेच मी त्यांना सल्ला देईन की, त्यांनी अल्लाहच्या संरचनेमध्ये बदल करावेत. कुराण (०४, ११८-११९). या विचारधारेने इस्लामी विद्वान व चिकित्सा शास्त्रज्ञांना जनुकीय अभियांत्रिकीसंबंधित मुद्द्यांवर खूप खोल वर प्रभावित केले. उदाहरणार्थ, लिंगपरिवर्तनासाङ्गी करण्यात येणाऱ्या शस्त्रक्रियेकडेही याचा अंगुलीनिर्देश आहे. या शस्त्रक्रियेद्वारे पुरुष स्वतःला स्त्री व स्त्री स्वतःला पुरुष रूपात बदलविण्याचा प्रयत्न करतात. ही विचारधारा एकीकडे जनुकीय अभियांत्रिकीचे एका प्रकारे समर्थन करते, मात्र यावर बंदी घालण्याबाबत कोणताही कङ्गोर निर्णय सुनावित नाही.

जनुकीय अभियांत्रिकीच्या विकासासोबत याच्याशी निगडित विविध नैतिक मुद्देही उपस्थित केले जात आहेत. डीएनएच्या संयोगाने विषाणूंची निर्मिती व युद्धात त्यांचा उपयोग असे गंभीर मुद्दे सत्तरीच्या दशकात चर्चेत येत राहिल े. याप्रकारचे प्रयोग पूर्णतः अयोग्यच होते. जनुकीय रोगांचा शोध लावणे,

त्यातून रुग्णांना बरे करणे आणि त्या रोगांचा प्रतिबंध करणे, हे कार्य केवळ मान्यच नाही तर त्याचे समर्थन करून त्यास प्रोत्साहन दिले गेले पाहिजे. अवयव प्रत्यारोपण शस्त्रक्रियेसाङ्गी जनुकीय प्रत्यारोपण आवश्यक आहे. जनुकीय अभियांत्रिकीमध्ये पुष्कळ रोगांसाङ्गी औषधनिर्मितीच्या अशा शक्यता दडलेल्या आहेत, ज्यांच्यामुळे अत्यंत विस्मयकारक परिणाम साध्य होऊ शकतात. यासोबतच कृषी व पशुपालन या क्ष्रेत्रांमध्येही यासंबंधित अनंत शक्यता आहेत.

या तंत्रज्ञानापासून प्राप्त झालेले अनपेक्षित परिणाम काळजीचे केंद्रबिंदू आहेत. केवळ कायिक (सोमॅटीक) पेशींमध्येच नव्हे तर अंकुर पेशींमधील नवीन जनुकांचे प्रत्यारोपण आगामी पिढ्यांवर परिणाम करू शकेल. ही इतकी गंभीर बाब आहे की, कधी कधी आण्विक किरणोत्सर्जनाचे दुष्परिणामही याच्यापुढे सौम्य वाटू शकतात.

एका प्रजातीचे जनुक दुसऱ्या प्रजातीमध्ये समाविष्ट करणे, म्हणजेच त्यांचे संकरण करणे, याचा अर्थ दोन्ही प्रजातींमधील लक्षणे व गुणधर्म एकत्र आणून एका नव्या प्रजातीची निर्मिती करणे, असा होतो. यामध्ये जरादेखील चूक झाली तर त्याचे गंभीर परिणाम होतील. उदाहरणार्थ, अशा प्रयोगांमधून अशा नव्या अपरिचित वस्तूंची निर्मिती होऊ शकते, ज्यांना अजून ओळखले गेलेल ` नाही. मानवजातीचा सामना अशा जिवाशी होऊ शकतो, ज्याला अजूनही भौतिक स्वरूपात जाणून घेतलेले नाही.

अशा वेळी वैज्ञानिक जरी विचार करीत असतील की, परिस्थिती नियंत्रणाखाली आहे, पण असे होणार नाही. मानवी संततीबाबत असे बदल आजारपणावरील उपायांबरोबरच पुढे जाऊन शारीरिक रूपात हवे तसे बदल करण्याकडे जाईल ज्यानुसार श्रीमंत लोक स्वतःमध्ये हवे तसे बदल करून घेतील. त्याहून अधिक वाईट असे होईल की, जनुकांच्या माध्यमातून हे लोक स्वतःच्या व्यवहारामध्ये बदल करून घेतील, जे खूप भयावह असेल. मानवी व्यक्तिमत्वात व व्यक्तिगत स्वरूपात उत्तरदायित्व सांभाळण्याच्या क्षमतेशी छेडछाड करण्याच्या कृतीचे इस्लाम निर्भत्सना करतो.

जनुकीय अभियांत्रिकीच्या तंत्रज्ञानामध्ये मोङ्ग्या प्रमाणावर आर्थिक गुंतवणूक करावी लागते. त्यामुळे गुंतवणूकदारही मुबलक नफा मिळविण्यास उत्सुक असतील. या माध्यमातून आजवर कित्येक वैज्ञानिकांनी त्यांची साधी घरे

सोन्याची करून टाकली आहेत. ही प्रक्रिया अविरतपणे चालूच आहे आणि व्यावसायिक गोपनीयतेच्या परोपकारी विचारासोबत जीवनाच्या विविध स्वरूपाचे पेटंट करून घेतील. कदाचित हीच वेळ आहे जनमानसात चर्चा घडवून आणण्याची व यासंबंधित नैतिक नियमावली तयार करण्याची. एका मोङ्ग्या कहाणीची आता प्रतीक्षा आहे, कारण आता तर कुङ्के सुरुवात झाल ी आहे.

**संदर्भः**


१४. एप्रिल १९९२

१५. वर्ल्ड हेल्थ फोरम, अंक १४, १९९३, पृष्ठ क्र. १०५

१६. मायकल हेंडरसन द्वारा उद्धरण झालेले, होप फॉर ए चेंज (विक्रेताः ग्रोसवेनर बुक्स, १९९१), २४

१७. नॅशनल अर्काइव्हस, नॅशनल सिक्युरिटी स्टडी मेमोरँडम २०० ची फाईल, आर जी २७३.

१८. तिसऱ्या जगतातील देशातील लोकांचे सामान्य चित्रण, जिथे लोकसंख्येतील एक मोङ्गा भाग तरुण आहे, जन्मदर अधिक आहे आणि विकसित देशांच्या तुल नेत दुय्यम दर्जाचे जीवन जगण्याची नामुष्की आहे. (सं.)

१९. कीथ एल वुडवर्ड एट एल, 'गेज इन दी कलर्जी.', न्यूज वीक, २३ फेब्रुवारी १९८७, पृ. ५८.

२०. दी इस्लामिक कोड ऑफ मेडिकल एथिक्स (कुवेतः इस्लामिक ऑर्गनायझेशन ऑफ मेडिकल सायन्स. १९८१), पृ. ६५.

२१. अटाली जैकस, ला मेडिसिन इम एज्युकेशन. मायकल सोलोमनने पॅरिसहून सन १९८१ मध्ये प्रकाशित झालेले 'एल' अवेनीर डी ला वाईमध्ये प्रकाशित केल े. पृ. २७३ - २७५.

# परिशिष्ठ

इतर पुस्तकांप्रमाणे हेही पुस्तक वाचून झाल्यावर बाजूला ङ्क्वले गेले तर ते लज्जास्पद असेल, पण सद्विवेकी वाचकांनी मी लिहिलेला प्रत्येक शब्द जरी ग्रहण केला तरीही मी माझ्या उद्देश्यामध्ये असफलच राहीन. या पुस्तकाच्या माध्यमातून जर काही विचार, काही संवेदना जागृत झाल्या नाहीत, वर्तणुकीमध्ये काही चांगले बदल झाले नाहीत तर माझी संपूर्ण मेहनत व्यर्थ गेली, असे मला वाटेल. जोवर ज्ञानाची ही श्रृंखला निरंतरपणे पुढे चालू राहणार नाही, तोवर माझे ध्येय अपूर्णच राहील.

मनातील पोकळी मनाला मानवत नाही. मन कायम प्रेमाने व्यापलेले असले पाहिजे. आयुष्यभर जे काही शिकलो त्यानंतर या वृद्धावस्थेत इस्लामिक आस्था व अंतर्ज्ञान यांमुळे माझे मन प्रेमाने ओतप्रोत भरले आहे. हे निर्लेप प्रेम कोणा एका विशेष व्यक्तीप्रती नसून मला प्रेम झाले आहे ते मानवजातीशी, पशुपक्ष्यांशी, झाडावेलींशी, वस्तूंशी, निसर्गाशी, ह्या धरतीशी, ब्रह्माण्डाशी, जिथे आपण राहतो. आणि मनापासून मला वाटते की, समस्त सृष्टीमध्ये ह्या प्रेमाचे संक्रमण व्हावे. राजनीती, अर्थशास्त्र, उद्योग, व्यवस्थापन, मजुरी, व्यापार, इतकेच काय तर युद्धदेखील प्रेमात बदल करू शकत नाही. पण लोकांचे कर्म नेहमी त्यांच्या वर्तणुकीवर आधारित असते. त्यामुळे व्यक्तिगत व आंतरराष्ट्रीय स्वरूपात लोकांची मने सदैव स्वार्थ, लोभ, जातिधर्मभेद व असंवेदनशीलता या गोष्टींनी भरलेली असतात. या विचारधारेत जर काही बदल झाला तर सर्वांना आनंद होईल; अशांनाही ज्यांनी सर्वांना पाहून आपल्या जेवणशैलीचेही बलिदान दिले आहे.

प्रेमाच्या दर्शनशास्त्रामध्ये आंतरिक प्रेरणा कोणती नवीन बाब नाही. पण आपल्या काळातील बहुतांश लोक याला सहजासहजी स्वीकारत नाहीत. ही धर्म व जातीच्या बंधनापलीकडील गोष्ट आहे.

त्यामुळे ह्या सर्व जातिधर्मांच्या अनुयायांनी बाहेर पडून एकमेकांना सोबत घेऊन पुढे जाणे खूप महत्वाचे आहे. जर चांगुलपणाच्या वाटेवर सर्वांची पाऊल

` एकत्रितपणे अशीच पुढेपुढे पडत गेली तर ह्या प्रेमपंथीयांची संख्या कमीकमी होत गेली तरी फरक पडणार नाही. भौतिकवादी विचार व नास्तिकतेचा छळ यांचा लोकांना उबग आला आहे. आध्यात्मिकतेप्रती लोकांची जी ओढ वाढत आहे, तिला तृप्त केले गेले पाहिजे. जीवनात चांगुलपणा व शालीनतेसाङ्गी जर काही लोक भरपूर परिश्रम घेण्यास तयार असतील तर एक पाऊल उचल ायचा उशीर; सगळया समूहांच्या एकत्रित येण्याने निश्चितच त्यांचा मोङ्गा कळप बनेल. आपण ह्या संसाराला बदलू शकतो पण हे कर्मङ्ग व निस्वार्थी भावनेशिवाय बदलणार नाही.

# शब्दावली

**अल्लाह** - ईश्वराचे अरबी नाव. या ब्रह्माण्डाचा रचयिता व स्वामी. आदाम, नूह, इब्राहिम, मुसा, ईसा (अ.), मोहम्मद आणि इतर तमाम पैगंबरांचे आराध्य दैवत.

**अल्लाहू अकबर** - अल्लाह संसारातील सर्व वस्तूंपेक्षा महान आहे. आझानमध्ये विशेष रूपाने म्हटला जाणारा आणि अल्लाहचे स्मरण करण्यासाङ्गीही वापरल ा जाणारा शब्दप्रयोग.

**ईद** - इस्लामचे वार्षिक सण. मुसलमानांना दोन ईद देण्यात आल्या आहेत. पहिली ईद रमझानचे रोजे पूर्ण केल्याच्या आनंदात साजरी केली जाते तर दुसरी ईद दुसरे पैगंबर हजरत इब्राहिम (अ.) यांच्याकडून अल्लाहच्या आदेशांचे पाल न करण्याच्या आङ्गवणीप्रित्यर्थ साजरी केली जाते. या दोन्ही ईद साजऱ्या करताना विशेष पूजा व प्रार्थना यांचे आयोजन केले जाते. दानधर्मासारखे पुण्यकार्य केले जाते तसेच नातेवाईक, मित्रपरिवार यांच्यासमवेत उत्सव साजरा केला जातो.

**हदीस** - पैगंबर हजरत मोहम्मद (सल्ल.) यांचे प्रामाणिक कथन आणि कार्य ज्याला त्यांच्या सहकाऱ्यांनी स्मरून त्याचे लिखित स्वरूपात जतन केले. नंतर त्याचे बरच खंड प्रकाशित झाले. त्यातील 'सही बुखारी' व 'मुस्लिम' अधिक प्रामाणिक आहेत. यांव्यतिरिक्त इतर प्रामाणिक संग्रहांमध्ये 'मुवत्ता', 'अन-निसाई', 'इब्ने माजा', 'तिरमिजी' व 'अबू दाऊद' यांचा समावेश होतो. परंपरेच्या कारणास्तव सादर केला जाणारा 'हदीस' हा ग्रंथ इस्लामी विधी सांगणारा कुराणनंतरचा दुसरा महत्वाचा स्रोत आहे. हदीसला वैज्ञानिक आधारावर सतत शोधकार्य करून जमा केले गेले आहे. याची जबाबदारी त्यांची असते ज्यांनी हदीस हा ग्रंथ प्रस्तुत केला आहे.

**हज** - तीर्थयात्रा. 'जिलहिज्ज' या इस्लामी महिन्यामध्ये केली जाणारी यात्रा. सौदी अरेबियामधील 'मक्का' या शहरातील 'काबा' आणि आसपासच्या क्षेत्रात हज यात्रा संपन्न होते. जगातील सर्वात पहिले प्रार्थनास्थळ असलेल्या काब्याची

निर्मिती हजरत इब्राहिम (अ.) व त्यांचे पुत्र हजरत इस्माईल (अ.) यांनी केल ी होती. बलिदानाचा सण (ईदुज्जुहा) च्या सामूहिक मेजवान्यांसह हज यात्रा साजरी केली जाते. आर्थिक व शारीरिकदृष्ट्या सक्षम व सबळ असणाऱ्या प्रत्येक मुसलमानासाङ्गी आयुष्यात एकदातरी हज यात्रा करणे अनिवार्य आहे.

**इजतिहाद** - (साहित्यिक). कोणत्यातरी अशा एकदम नवीन समस्येबाबत सखोल विचार करून त्यावर मार्ग शोधणे ज्याबाबत इस्लामचे आधारस्त्रोत कुराण व सुन्नत यांमध्ये स्पष्ट मार्गदर्शन नाही.

**इमाम** - सामूहिक प्रार्थना, विशेषतः नमाजाचे नेतृत्व करणारी व्यक्ती, नमाज वाचणारी व्यक्ती. एखाद्या समूहाचा निवडलेला नेता.

**इंजील** - अल्लाहकडून इस्त्राईलच्या संतानांसाङ्गी जीसस (हजरत ईसा अ.) यांच्यावर लिहिले गेलेले मार्गदर्शनपर पुस्तक. हे पुस्तक त्याच्या मूळ स्वरूपात आता शिल्लक नाही. कदाचित यातील काही मूळ भाग गोस्पेल्समध्ये सुरक्षित असू शकेल.

**इस्लाम (सा.)** - पूर्ण समर्पण, हत्यारे-शस्त्रे समर्पित करणे. इस्लामचा अर्थ आदेशांचे पालन आणि अल्लाहसमोर पूर्ण समर्पण असा होतो. इस्लामचा अर्थ 'शांती' असाही आहे. वास्तविक अल्लाहच्या आदेशांचे पालन करूनच मनुष्य आत्मशांती व ब्रह्माण्डातील इतर वस्तूंच्या समवेत शांती प्राप्त करू शकतो. इस्लामला मानणारे मुस्लिम व मुसलमान आहेत. कुराणमध्ये सांगितल्यानूसार मानवाच्या निर्मितीनंतर आलेले अल्लाहचे सारे पैगंबर मुस्लिम होते. त्यांनी मानवजातीला इस्लामचे, दुसऱ्या शब्दात सांगायचे झाले तर, शांतीचे व अल्ल ाहचे आदेश मानायचा संदेश दिला.

**जिहाद** - (संघर्ष). अल्लाहने दर्शविलेल्या मार्गावर संघर्ष करणे. मग तो थेट कुणाच्या नैतिक किंवा चारित्रिक सुधारणेसाङ्गी असो किंवा समाजात पसरणाऱ्या सैतानी कामांना रोखण्यासाङ्गी व चांगुलपणाचा प्रसार करण्यासाङ्गी केलेला विस्तृत संघर्ष असो. अल्लाहच्या संदेशाचा सर्वत्र प्रसार करण्यासाङ्गी हा संघर्ष शांततापूर्वक व सुंदर पद्धतीने केला जावा पण समाजातील दुर्बल घटक व गरीब जनतेवरील अत्याचाराविरुद्ध शक्तीबळाचा प्रयोगदेखील केला जाऊ शकतो. मानवाधिकाराची पायमल्ली, विचार, श्रद्धा आणि अभिव्यक्ती स्वातंत्र्य यांची पायमल्ली होत असेल तर त्याविरुद्ध करावयाचा संघष.

**काबा** (सा.) - मक्कामध्ये हजरत इब्राहिम (अ.) व इस्माईल (अ.) यांनी उभारलेली जगातील पहिली मशीद. अल्लाहच्या प्रार्थनेसाङ्गी बनविण्यात आल ेली एक घनाकार इमारत.

**कुराण** - समस्त मनुष्यजातीच्या कल्याणासाङ्गी अल्लाहकडून रचण्यात आल ेला मार्गदर्शनपर अंतिम ग्रंथ आणि त्याची विशेष कृपा. हा ग्रंथ अल्लाहच्या अस्तित्वाची पुष्टी करून त्याला प्रामाणिक स्वरूपात सादर करतो. अल्ल ाहची प्रार्थना कशी करावी याचे मार्गदर्शन करणारा व समस्त मनुष्यजातील ा माणुसकीच्या संदेशाचा नैसर्गिक मार्ग दर्शविणारा ग्रंथ. पृथ्वीवर माणसाच्या जीवनाचे वास्तविक स्वरूप आणि पृथ्वीवर आपल्या आगमनाचे उद्देश्य समजावून सांगणारा महान ग्रंथ. हजरत मोहम्मद (सल्ल.) यांच्यावर अल्लाहची कृपा होऊन अल्लाहचे दूत जिब्रईल यांच्या माध्यमातून २३ वर्षांच्या कालावधीत कुराण अस्तित्वात आले.

**रमजान** - इस्लामी दिनदर्शिकेत नववा महिना. रमजानच्या महिन्यात प्रौढ व निरोगी मुसलमान अल्लाहच्या आदेशानुसार रोजे (म्हणजेच उपवादाचे व्रत) करतात. या काळात सूर्योदय ते सूर्यास्तादरम्यान अन्नपाणी घेणे किंवा शरीरसंबंध ङ्केवणे यांस मनाई आहे. पूर्वेकडील किंवा पश्चिमेकडील देशातील लोकांना नेहमीच (दिवसाच्या कालमानानुसार) मोङ्गे किंवा छोटे रोजे ङ्केवावयास लागू नयेत म्हणून अल्लाहच्या कृपेने दरवर्षी रमजान आधीच्या वर्षापेक्षा ११ दिवस आधी येतो.

**नमाज** - इस्लाममध्ये दिवसातून पाचवेळा नमाज पढणे अनिवार्य आहे. यामध्ये मुसलमान कुराणमधील काही भाग वाचतात, ईश्वरासमोर विनम्रपणे झुकतात आणि जमिनीवर डोके टेकवून आपली सेवा अर्पण करतात. नमाजाच्या माध्यमातून मुसलमान दररोज सृष्टीच्या त्या निर्मात्याशी संवाद साधतात. तसेच नमाजामुळे त्यांना स्वतःच्या अत्युच्च नैतिकतेचे व जीवनाच्या आध्यात्मिक ध्येयाचे सदैव भान राहते.

**रोजा** - रमजानच्या महिन्यामध्ये मुसलमानांनी रोजे (उपवास) ङ्केवणे अनिवार्य आहे आणि वर्षातील इतर वेळी तसे करणे स्वेच्छेवर अवलंबून आहे. रोजे मुसल मानांना अल्लाहच्या आदेशाचे व शिकवणुकीचे पालन करण्यासाङ्गी समर्थ बनवितात. या माध्यमातून ते बिकट प्रसंगी संयम ङ्केवण्याचे शिकतात व गरिबांचे दैन्य-दुःख समजून घेतात. पूजेच्या रूपातून रोजा हा एक उत्कट

अनुभव आहे ज्याद्वारे कर्तव्यनिष्ठ मुसलमानांना अल्लाहशी असलेले त्यांचे नाते आणखी घट्ट करण्यास मदत होते.

**शहादत (कलमा)** - आपल्या श्रद्धेची घोषणा. अल्लाहशिवाय दुसरे कोणीही पुज्यनीय नाही आणि हजरत मोहम्मद (सल्ल.) अल्लाहचे भक्त व त्याचे पैगंबर आहेत असे वक्तव्य. मुसलमान होण्यासाङ्गी खऱ्या शुद्ध मनापासून कलमा वाचून त्याचा स्वीकार करणे आवश्यक आहे.

**शरीयत** - म्हणजे कुराण व हजरत मोहम्मद (सल्ल.) यांच्या उपदेशांवर आधारित एक इस्लामिक विधी आहे. आधुनिक युगातील कोणत्याही समस्येवर तोडगा या दोन्हीमध्ये सापडला नाही तर 'इजतिहाद' (नवाचार) चा मार्गही शरीयतमध्ये उपलब्ध आहे.

**शिया** (सा.) - आपल्या विचारांचे कट्टर समर्थक. हा मुसलमानांचा अल्पसंख्यांक समूह आहे ज्याचे मानणे आहे की, पैगंबरसाहेबांचे खरे वारस इस्लामचे पहिल `खलिफा हजरत अबू बक्र (रदि.) किंवा आणखीन कुणी नसून पैगंबर हजरत मोहम्मद (सल्ल.) यांचे चुलत भाऊ आणि जावई हजरत अली (रदिअल्लाहु तआला अन्हू) हेच होते. बाकी इतर सर्व आधारभूत तत्त्वांमध्ये मुसलमानांशी साधर्म्य राखूनही या समूहाने आपली ओळख एका वेगळया धार्मिक समूहाच्या रूपाने कायम राखली आहे.

**शूरा** - सल्लागार परिषद. कुराणमध्ये मुसलमानांना सांगितले गेले आहे की, त्यांनी आपले निर्णय शूराच्या माध्यमातून घ्यावेत. सर्वसामान्य जनतेशी सल्ल ामसलत करून शूरासाङ्गी नेता निवडण्यात यावा आणि त्या नेत्याने त्याल ा निर्वाचित करणाऱ्यांच्या अधिकारांचे रक्षण करावे. शूराद्वारे घेतल्या गेल `ल्या निर्णयांचे पालन मुस्लिम शासनांकडून होणे आवश्यक आहे. इस्लाममध्ये हुकूमशाहीस बिलकुल स्थान नाही.

**सुन्नत** (सा.) - 'अभ्यास' किंवा 'उदाहरण'. हजरत मोहम्मद (सल्ल.) यांचे कार्य व कथन. इस्लामिक न्यायाचा (शरीयतचा) प्रमुख स्रोत.

**वजू** - प्रत्येक नमाज मुसलमानांसाङ्गी अल्लाहशी होत असलेला थेट संवाद आहे. ह्या पवित्र क्रियेची तयारी या अर्थी नमाजापूर्वी वजू करून ते शारीरिक व मानसिक स्वरूपात पवित्र होतात. वजूमध्ये कोपरापर्यंत हात, चेहरा व पाय धुतले जातात, तसेच मस्तक व मान ओल्या हातांनी स्वच्छ केली जाते.

**जकात (सा.)** - पवित्रता आणि वृद्धी. आपली आवश्यकतेहून अधिक धन जवळ बाळगणाऱ्या मुसलमानांसाङ्गी जकात देणे अनिवार्य आहे. त्यांना दरवर्षी आपल्या उत्पन्नातील किंवा संपत्तीतील अडीच टक्के (२.५) हिस्सा गरिबांसाङ्गी काढून द्यावयाचा असतो.

# परिचय

जागतिक स्तरावर स्थापित धारणां बदलण्यासाङ्गी काही तरी तुरळक प्रमाणात एखादे पुस्तक येत असते, तेही एका वेळी एखादेच, 'मुस्लिम मानसिकतेचे अध्ययन' हे सुद्धा असेच एक पुस्तक आहे. लेखकर डॉ.हस्सान हतहूत यांनी या पुस्तकाची सुरुवात सामान्य परिचयाने केली. बहुसांस्कृतिक परिवेशात (इजिप्त मध्ये जन्म, इंग्लंड मध्ये निवासानंतर अमेरिकेत एका दशकापेक्षा जास्त काळ निवास) जीवान व्यतित करणारे व्यवसायाने फिजिशियन असलेले लेखक, पाश्चात्य देशात इस्लामची जी ओळख आहे, मुळात इस्लाम तसा नाही, अशी त्यांची अनुभवांती भूमिका होय.

इन्सायक्लोपीडीयाई व्यक्मित्व असलेले (डॉक्टर ऑफ मेडिसीन,ख विचारक, वक्ते व कवि) डॉ.हतहूत यांनी त्यांच्या या पुस्तकांच्या माध्यमातून इस्ल ामचा उत्तमरित्या सहज व सोप्या भाषेते परिचय करुन दिला. या माहितीपूर्ण व आनंददायी लेखन प्रवासात त्यांी इस्लामी जीवनाचे अत्यंत सूक्षमतेने निनिक्षण नोंदवून सुंदर प्रतिमा सादर केली. यात त्यांनी पारदर्शकतेबरोबर मुस्लीम शरीयत अर्थात इस्लामी विधी मानवाची अशी सेवा करते की याला दुसरा पर्याय शक्यच नाही. अंतर्मनाचे चित्रांकन करीत त्यांची मानसिकता, तर्क आणि अल्लाहच्या प्रती त्यांची धारणा विषद करण्यात ते सफल झाले.

ज्यूडो-क्रिश्चियन-इस्लामी जगताच्या परिकल्पनेशी सहमत असलेले डॉ. हतहूत यांचे कार्य व लेखन प्रवास मुस्लिमेतर बांधवांकरीता आकर्षक आणि विचारोत्तेजक सिद्ध ङ्करेल. मुस्लिमांसाङ्गी त्यांच्या आस्थेला दुबळे करणाऱ्या प्रश्नांची उत्तरे सविस्तरपणे देण्याचा यात प्रयत्न करण्यात आलेला आहे.

'मुस्लिम मानसिकतेचे अध्ययन' या ग्रंथात इस्लामी परिप्रेक्षात तत्कालीन महत्वपूर्ण मुद्यांवर प्रकाशझोत टाकण्यात आलेला आहे. स्वार्थ, सूक्ष्म धार्मिकता आणि नास्तिकतेच्या या विद्यमान काळात डॉ.हतहूत यांनी गंभिर आणि प्रेरणादायी कार्य केले आहे. आशेने भरपूर ओतप्रोत असलेल्या आपल्या संदेशात त्यांनी आपले विचार व्यक्त केले आहेत की, त्यांच्या या प्रयत्नांतून जर थोडे फार लोक जरी जागृत झाले तर परिवर्तनाची शक्यता आहे.

डॉ.हतहूत यांनी स्पष्ट केले की, कोणतीही बाब वस्तुतः तशीच दिसते, जसा तिचा परिचय करुन देण्यात येतो. याच न्यायाच्या अनुषंगाने इस्लामचा वास्तविक परिचय करुन देण्यात आलेला आहे. पुस्तकाचे गांभिर्य आणि त्यातील परखडपणा पाहून अमेरिकावासी निश्चितच सकारात्मक प्रतिसाद देतील. हे पुस्तक अनेकदा आपल्याला विचार करण्यास प्रोत्साहित करते.

-फ्रेंक वोगल, हार्वर्ड लॉ स्कूल

धार्मिक अध्ययनाच्या दर्जात (माझ्यासाङ्गी सुद्धा) हे पुस्तक महत्वपूर्ण भूमिका निभावेल अशी पूर्ण शाश्वती आहे.

-क्रियर डगलस, धार्मिक अध्ययन विभाग, केलिफोर्निया स्टेट यूनिर्व्हसिटी, नाथरीज.

डॉ.हतहूत यांनी जीवंत विषयावर चर्चा केली असून हे विषय कोणत्याही धर्माचा अनुयायी टाळू शकत नाही. महान इस्लामी विद्वा इनाम गझाली यांच्या प्रमाणेच त्यांनी वाचकांना बौद्धिक विवेचनासाङ्गी प्रोत्साहीत केले.१

- सुलैमान न्यांग, हॉवर्ड यूनिव्हर्सिटी

Al American Trust Publications